सोदाहरण विवेचन मीं वर्णप्रक्रियेच्या व प्रत्ययप्रक्रियेच्या भागांत केलें आहे. तसेंच ह्या द्विवचनाचें राजवाडे एकच उदाहरण देतात त्याचीं आणखी दहापांच तरी मी पुढें महानुभाव-ग्रंथांतून दिलीं आहेत. त्यावरून द्विवचनाची अति धुसट जाणीव तेव्हां असावी असें वाटतें. प्रत्ययी विभक्तीचा हळूहळू लोप होत असतां सामासिक विभक्ति कशी तयार होत होती तेंहि महानुभावी भाषेवरून अधिक स्पष्ट दिसतें. कांहीं शब्दयोगीसुद्धां काळाच्या ओघांत प्रत्यय बनल्यावर नवीन शब्दयोगींची वाण भासते व ती पुरीहि होते, हा भाषिक उत्क्रांतीचा नियम महानुभावीय भाषेंत सिद्ध झालेला दिसेल. याचीहि चर्चा पुढें आहेच.

आणखी एक तौलनिक दृष्टि आहे. तिनें ज्ञानेश्वरींतील कांही शब्दांचा पडताळा महानुभावीय मराठींत मिळेल व अर्थ, व्युत्पत्ति ही स्पष्ट होतील खालील उदाहरणें बघा......

(१) **सुरवाड**...हा शब्द 'सुखाड' असा राजवाडे मानतात[२]. याविषयीं वादहि पुष्कळ झाले. हा शब्द वास्तविक 'सुरवाड' असाच आहे हें खालील ओव्यांतील यमक पाहिल्यास दिसेल.

ज्ञानेश्वरी—

"तेया बोलाचा हान पाडु। कां रसवृत्तीचा निवाडु।
जेणें श्रोतेया होईल सुरवाडु। श्रवणसुखाचा"॥ ३–२७०
"ऐसी निजपुण्याची जोडी। वाढिनली सर्व सुखाची कुलवाडी।
तिए जन्मे तो सुरवाडी। योगच्युतु"॥ ६–४४६
"तेंवि आवडे तैसा सांकडु। आचरतां जऱ्ही दुवाडु।
तऱ्ही स्वधर्मेचि सुरवाडु। पारत्रिकिं"॥ ३–२२०

महानुभावीय ग्रंथांतील—

"या काजां देओ नेणता जाला। तवं ब्रह्मा निजभुवना गेला।
गोपवासरुवां सुरवाडु केला। राउळींची भणौनि"॥
[वच्छ० २६४]

---

१ माझा पुढील निबंध पहा "Linguistic Importance of Mahanubhava Literature",..............10th Oriental Conference, Tirupathi.

२ ज्ञानेश्वरी-प्रस्तावना, पा० ८९.

( २ ) दोसें...हें अव्यय ' करितां, साठीं, उद्देशें ' या अर्थी ज्ञानेश्वरींत येतें. उदा०—

" तेंहिं करावेया दोसें । मंज सामर्थ्य असे ।
कीं नाही हें ऐसें । न पांत करी " ॥ १८-६१८

" हें एकैक ऐसें । नानापरि भाषावसें ।
स्तोत्र करुनि तुजदोसें । निर्विशेषा " ॥ १८-११

महानुभावीय ग्रंथांत—

" सौरभ्ये गिवसावेआ दोसें । गर्भ सुमनाचा । " ( ऋ० ४४ )
" श्रीकृष्ण पावावेआं दोसें । मुनी षट्पदु जाले । " (वच्छ०१६१)
" कीं दी असता तारा न दिसे । तें उणें फेडावेआं दोसें ।
वनश्रिया वेढिलें जैसें । अंबरू नक्षत्रेसीं ॥ " ( वच्छ० १३३ )

( ३ ) श्लेष ...या अलंकाराचें नांव ज्ञानेश्वरीत येतें, पण ते प्रचलित रूढार्थानें नव्हे. कारण श्लेषाची अनेकार्थता ज्ञानेश्वरींत कोठेंही दिसत नाही. खालील उल्लेख पहा—

" म्हणौनि आखरीं सुभेदीं । उपमाश्लेषकोंदाकोंदीं ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासि । " ( ज्ञा० १३-११५८ )
" तेवि भेदबुद्धिचिये तुळें । घालूनि सूर्यश्लेषाचें कांटाळे । "
( ज्ञा० १६-२८ )

महानुभावीय ग्रंथांतील—

" उपमा श्लेषवर्णकं । तिही रंजउं सकळैक लोक । "(वच्छ० १४)

" वस्त्रें बाह्ये पाघुरता । तरि हा श्लेषु घडतां । " ( ऋ० ४२७ )

म्हणजे " श्लेष " हा शब्द रूढार्थी नसून, त्याचा सादृश्याशीं संबंध असावा. याला महानुभावीय वाङ्मयांतील साती ग्रंथाच्या टीपग्रंथांवरून पुष्टि मिळते. ' वच्छहरण ' काव्यांतील १४ व्या ओवीवर अशी टीप आहे—

" उपमा देउनि वीटमनेला नाहीं : श्लेष मणिजे... " ।

---

१ ह० मा० नेने : " श्लेष शब्दाच्या अर्थावर नवीन प्रकाश "
( भारत इतिहाससंशोधक मंडळ, त्रैमासिक, व्हॉ० १९, अं० १ )

आणखी एक टीप अशी—

“ उपमा देउनि दूषिजे आणि पदार्थ निर्धारिजे तो श्लेष ”। प्रसिद्ध संस्कृत साहित्यशास्त्रज्ञ “ काव्यालंकार ” कर्ता भामह याची “ श्लेषा ” ची व्याख्या वरील अर्थास किंचित् पोषक ठरते.

“ उपमानेन यत्तत्त्वमुपमेयस्य साध्यते ।
गुणक्रियाभ्या नाम्ना च श्लिष्टं तदभिधीयते ॥ ” ३-१४

भामहाची ही व्याख्या यादवकालीन “ श्लेष ” शब्दाच्या अर्थाशीं जवळ येते हें महानुभावीय टीग्रंथांवरून दिसेल.

व्युत्पत्तीच्या आणि अर्थाच्या दृष्टीनें असा तौलनिक अभ्यास महत्त्वाचा होय. याशिवाय, महानुभावीय गद्य हें लौकिक असल्यानें त्यांत ज्ञानेश्वरी-सारख्या “ नागर-प्रबंधांत ” न आढळणारे असे कितीतरी भाषेचे वाक्‌प्रचार दिसतील. द्विरुक्त शब्द, सादशब्द, प्रतिशब्द अशा शब्दसिद्धीच्या अनेक लकबा आढळतील. नवीन निपात वापरले जाऊन काव्यांतील रूढ निपातांचा नवाच वापर केला जाईल. अर्थबदल, अर्थविकास वगैरे अर्थासंबंधी अनेक बाबी अधिक स्पष्ट होतील व भाषेच्या शिष्ट, नागर स्वरूपाबरोबरच लौकिक, रूढ स्वरूपाचाही प्रत्यय येईल. या दृष्टीनें, वरील बाबींचा उल्लेख मीं त्या त्या प्रकरणीं केला आहे. शिवाय गद्य महानुभावीय ग्रंथांतून तत्कालीन अनेक वाक्‌प्रचार, वाक्यप्रयोगांच्या लकबी, शब्दविशेष यांची माहिती मिळते. म्हणजे शिष्ट काव्यांत भाषेच्या स्वरूपाचा जो एक भाग दिसूं शकत नाही तो महानुभावीय ग्रंथांतून पहावयास सांपडेल.

## § ५ आजपर्यंतचें एतत् प्रकरणीं संशोधन

मुख्य विषयाकडे वळण्यापूर्वी, मराठी भाषेच्या अभ्यासकांचा व त्यांच्या तद्विषयक प्रयत्नांचा आढावा घेणें अवश्य आहे. पूर्वाचार्यांचा मागोवा घेत व भाषाशास्त्रज्ञांना वाट पुसतच पुढील मार्ग आक्रमिला पाहिजे. मराठी भाषेच्या आरंभीं आरंभींच्या अभ्यासकांत डॉ० ग्रीयरसन, बीम्स, होर्न्ले, प्रो० स्टेन कोनौ व डॉ० भांडारकर हीं नांवें प्रमुख होत. पैकीं डॉ० ग्रीयरसन यांच्या ग्रंथांतून संपूर्ण भाषाशास्त्रीय अभ्यास न आढळला तरी

मराठीच्या प्रांतिक भेदातील सूक्ष्म धाग्याचें विवेचन आढळतें. डॉ० ग्रीयरसन याचे ग्रंथेतर लेखही मराठीच्या दृष्टीनें विशेषतः आघातप्रकरणीं मननीय आहेत. बीम्स व होर्न्ले यांचा प्राकृत भाषाचा अभ्यास विशेष नसल्यानें त्याच्या ग्रंथात अपुरेपणा येऊन त्याना ऐतिहासिक दृष्टि राहिलेली नाही. आर्य भाषाची परपरा लक्षात न घेतल्यानें त्याची विधाने बऱ्याच ठिकाणी निराधार दिसतात. ही उणीव प्रो० स्टेन कोनौ याच्यात नाही. त्याच्या " महाराष्ट्री व मराठी " या प्रबंधाचा उपयोग ऐतिहासिक व्याकरणाला फार आहे. परंतु शास्त्रीय दृष्टि प्रथम कोठें आढळत असेल तर ती डॉ० भांडारकराच्या " वुइलसन फिलॉलॉजिकल लेक्चर्स " मध्यें. बीम्स–होर्न्ले यांच्या तौलनिक अभ्यासाचा भाव व त्याच्या अनैतिहासिक दृष्टीचा अभाव या दोन्ही गुणांचे मीलन डॉ० भाडारकर याच्या लेखांत दिसतें. त्यांनीं पाली–प्राकृत–अपभ्रंश यांचें स्वतंत्र भाषाशास्त्रीय विवेचन केल्यानें त्यांच्या अर्वाचीन आर्य भाषांच्या अभ्यासाला ऐतिहासिक दृष्टीचा लाभ झालेला आहे. संस्कृतांतून पालींत, पालींतून प्राकृत–अपभ्रंशांत आणि शेवटीं मराठींत भाषेच्या कोणत्या बाबी गळाल्या, कोणत्या नवीन आल्या हें डॉ० भाडारकरानी शास्त्रीय व ऐतिहासिक दृष्टीनें पाहिल्यानें त्यांचा ग्रंथ आधारभूत झाला आहे. प्रो० दिवेटिया यांचीं " वुइलसन फिलॉलॉजिकल लेक्चर्स " डॉ० भाडारकराच्याच धर्तीवर परंतु गुजरातीपुरतीं मर्यादित आहेत. तौलनिक अभ्यासाला त्यांचा उपयोग होईल.

वरील अभ्यासकांत डॉ० भांडारकर, स्टेन कोनौ यांचा उपयोग फार हें खरें; परंतु मराठी भाषेची घडण पहाणारानें इतर सर्व सोडून प्रथम ज्ञानेश्वरीकडे पाहिलें पाहिजे तें वरील विद्वानानीं पाहिलेलें दिसत नाहीं. डॉ० भांडारकर आपल्या व्याख्यानांत ज्ञानेश्वरींतील उदाहरणें देतात, परंतु फार क्वचित्. त्यांचें लक्ष जुन्या मराठीपेक्षां आधुनिक भाषांकडेच विशेष आहे. ही उणीव प्रथम वि० का० राजवाडे यांनीं दूर केली. इ० स० १९०९ त प्रसिद्ध झालेलें त्यांचें " ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण " भाषा-शास्त्राला केवळ अमोल होय. त्यांची ज्ञानेश्वरीची प्रत मान्य होवो वा न

१ " The stress accent in Modern Indo–Aryan Vernaculars "
J. R. A. S. 1895, p.p. 139

होतो, त्यांच्या व्याकरणाचें महत्त्व हें मानलेंच पाहिजे. डॉ० भांडारकरांच्या नंतर एका श्लोकवांचून शास्त्रीय दृष्टीनें पहाणारा मराठीचा भाषाशास्त्रज्ञ राजवाड्यांच्या खेरीज दुसरा नाही. राजवाड्यांनीं ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेची प्रत्येक बाब ऐतिहासिक दृष्ट्या विवेचून तिची परंपरा लाविली आहे. बीम्स व होर्न्ले याची प्राकृतभाषाभ्यासाची उणीव अर्थातच राजवाड्यांत नाहीं. पाणिनीय परिभाषा, शास्त्रीय दृष्टि व ऐतिहासिक उपपत्ति या गुणत्रयीमुळें राजवाड्याच्या ग्रंथाला अधिकारवाणी म्हणावें लागेल. मात्र राजवाड्यांची अलौकिक बुद्धिमत्ता मान्य करून त्याच्या लेखातील दोषापासून सावध असलें पाहिजे. त्याचे गुणविशेष आहेत तसे दोषविशेषहि आहेत. एक तर, सबंध ज्ञानेश्वरीच्या व्याकरणात मूळातील संदर्भ पाचापेक्षां अधिक नाहीत. प्रत्यक्ष प्रमाण दिल्याखेरीज कोणतेहि म्हणणे साधार आहे हें कशावरून समजावयाचें? राजवाडे उदाहरणें व तीहि ससंदर्भ, देत नाहीत ही त्याच्यातील मोठीच उणीव आहे. या कामात पाश्चात्य संशोधकाची पद्धतिच योग्य होय. दुसरें असें, कीं आपण कोणत्या अपभ्रंशाशी वा अपभ्रंश-ग्रंथांतील भाषेशीं मराठीचा दुवा जोडत आहोंत, हें राजवाड्यानीं लिहिलेलें नाही. असें वाटतें, कीं त्यांच्यापुढें वररुचि व हेमचंद्र याचीं प्राकृत व्याकरणेंच तेवढीं असावीत व त्यांवरूनच त्यानी परंपरा दाखविली असावी. अपभ्रंशाखेरीज मराठीची घडण नीट उकलणार नाहीं शिवाय असे, की राजवाड्याच्या आग्रही वृत्तीला शास्त्राची मर्यादा क्वचितच पडते. ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें रूपन् रूप, प्रत्ययन् प्रत्यय पाणिनीय संस्कृतापासूनच व्युत्पादिला पाहिजे हा त्यांचा आग्रह दिसतो, व यामुळें प्राकृत व अपभ्रंश या मधल्या पायऱ्या गाळून खुशाल ते पाणिनीवरून ज्ञानेश्वरावर उतरू शकतात. संस्कृतांतील लुङ्, लिट् व लुट् हे वास्तविक पूर्वीच लोपले असताना ते ज्ञानेश्वरीत आहेत असें राजवाडे मानतात तें यामुळेंच होय. मराठीच्या प्रत्येक बाबीची परंपरा थेट पाणिनीपर्यंत लावावयाची या कल्पनेमुळें राजवाड्याची बरीचशी उपपत्ति काल्पनिक ठरते. जी गोष्ट त्यांच्या व्याकरणाची तीच व्युत्पत्तीची. संस्कृत विष्ठा या शब्दापासून ते विठ्ठल शब्द व्युत्पादितात व एकाच शब्दाला

१ भा० इ० सं० मं०, त्रैमासिक, वर्ष ३

विविध ठिकाणी विविध व्युत्पत्ति सुचवितात. त्यांच्या मराठी धातुपाठांत याची उदाहरणें अनेक आहेत. प्रो० कुलकर्णी यांनी त्यांचें कितीहि समर्थन केलें तरी राजवाड्याच्या संशोधनातील कल्पनेचा अंश नाकबूल करता येणार नाही. आता या कल्पनेलाच कांहीं विद्वान् 'सिद्धप्राय सिद्धान्त' किंवा Brilliant Hypothesis मानतात हें निराळें. परंतु हे सारे दोष जमेस धरूनहि राजवाड्यांचें भाषाशास्त्रातील स्थान अढळ आहे. त्यानीं पुढील संशोधनाचा पाया रचून ठेविला हें केव्हाहि खरेंच होय. अनुक्रम सोडून येथेंच राजवाडे संप्रदायातील इतराविषयीं थोडक्यांत लिहितों. या मंडळींत प्रमुख नाव श्री० कृ० पा० कुलकर्णी याचें. त्याच्या 'मराठी भाषा-उद्गम-विकास' या ग्रंथानें मराठी भाषेवर लिहिण्याची दिशा दाखवून कांहीं स्वतंत्र विवेचनहि केलें आहे. राजवाडे धातुपाठाची त्याची प्रस्तावना आख्यातविभक्तिप्रकरणी उपयोगी आहे. श्री० गो० कृ० मोडक यांनी भारत इतिहाससंशोधक मंडळाच्या त्रैमासिकातून ज्ञानेश्वरीच्या राजवाडे प्रतीसंबंधीं काही मूलगामी चर्चा केली आहे व ज्ञानेश्वर–मराठीचे काही व्याकरणविशेषहि सागितले आहेत. परंतु श्री० मोडकाचें लक्ष प्राकृत अपभ्रंशाकडे नाही. संस्कृतावरून ते थेट मराठीवर येतात. उलट, श्री० ह० ना० नेने प्राकृत-अपभ्रंशातील रूपें दिल्याशिवाय मराठीसंबंधींची विधानें सहसा करीत नाहीत. या दृष्टीनें श्री० नेने याचे यादव-मराठीवरील लेख भाषाशास्त्राला बहुमोल आहेत. शिवाय, ते ज्ञानेश्वरीबरोबर महानुभाव वाङ्मयाकडेहि पहात असल्यानें तुलनेला अवसर झालेला दिसतो.

परंतु वरील सर्वांहून प्रो० ज्यूल ब्लोक याच्या ग्रंथाचें महत्त्व विशेषच आहे. आपल्या पहिल्या ग्रंथात त्यानी एकंदर आर्य भाषांविषयीं लिहिलें असून दुसऱ्यात मराठीचाच केवळ प्रपंच केला आहे. भाषाशास्त्राच्या आधुनिक तत्त्वांच्या रोखानें प्रो० ब्लोक मराठीची परीक्षा करितात. बीम्स, होर्न्ले याचें लक्ष प्राचीन मराठीकडे नाहीं. ब्लोक ज्ञानेश्वरी-मराठी संबंधींही अनुषंगानें लिहितात. प्राकृत-अपभ्रंशद्वारा मराठी भाषा निघाली इकडे त्याचें अवधान

१ राजवाडे मराठी धातुपाठ, प्रस्तावना.
२ J. Bloch : L'Indo aryen.
३ J. Bloch : Formation de la langue Marathe.

एकसारखें आहे व त्यांचीं सर्व विधाने ससंदर्भ आहेत. तात्पर्य, शास्त्रीय दृष्टि, आधुनिक भाषाशास्त्रीय तत्त्वें, आणि ससंदर्भत्व यामुळें ब्लोक यांचें विवेचन शास्त्रशुद्ध झालें आहे. त्याच्याच विवेचनपद्धतीचा अवलंब बंगाली भाषेवर लिहिणारे डॉ० सुनीतिकुमार चतर्जी व कोकणीचे अभ्यासक डॉ० कात्रे हे करितात. ही पद्धति आता शास्त्रीय म्हणून सर्वमान्य असून तिचाच अवलंब मी प्रस्तुत प्रबंधात करीत आहें. प्रो. ब्लोक याच्या वरील ग्रंथाचे " मराठी भाषेचा विकास " हें भाषांतर प्रसिद्ध करून प्रो० वा० गो० पराजपे यांनी मराठीच्या अभ्यासकावर उपकार करून ठेवले आहेत. प्रो० परांजप्यानी आपलें भाषातर नुकतेंच ( इ० स० १९४१ फेब्रुआरी ) प्रसिद्ध केलें आहे.

तात्पर्य, डॉ० भांडारकर, इतिहासाचार्य राजवाडे व प्रो० ब्लोक हे मराठी भाषेवर लिहिणाराचे प्रमुख आधार होत. यांखेरीज इतर काही ग्रंथांचा उपयोग एतत्प्रकरणीं बराच आहे. त्याचा येथें उल्लेख मात्र करतों. डॉडेरेटनें[१] ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण लिहिलें आहे तिकडे अद्यापि महाराष्ट्रीय विद्वानांचें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. राजवाड्याचें व्याकरण प्रसिद्ध झाल्यानंतर तें अवलोकून मगच डॉडेरेट् लिहीत असल्यानें त्याच्या या निबंधाचें विशेषच महत्त्व आहे. डॉडेरेट कांही नवीन सागतो असें नाहीं, परंतु त्यानें प्रो० ब्लोक याच्या शास्त्रीय पद्धतीनें विचार केल्यामुळें त्याच्या व्याकरणाचा उपयोग थोडासा तरी आहे. प्रो० टर्नर[२] यांचा नेपाळी भाषेचा तौलनिक व्युत्पत्तिकोश आर्यभाषाच्या प्रत्येक अभ्यासकाला अत्यवश्य आहे. या पद्धतीचा शास्त्रीय कोश नेपाळीखेरीज दुसऱ्या भाषेचा नाही. प्रो० टर्नर यांनीं शेवटीं व्युत्पत्तिदर्शक सूची दिल्यानें तौलनिक अभ्यासाची मोठीच उणीव दूर झाली आहे. असो. यादव-कालीन मराठीवर कानडी भाषेची छाया असल्याचें मीं पुढें दाखविलेंच आहे. द्राविडी भाषेचा मराठीवरील परिणाम अजमाविण्याच्या दृष्टीनें डॉ० किटेल यांच्या कानडी-इंग्रजी शब्दकोशाचें व डॉ० काल्डवेल यांच्या द्राविडी भाषांच्या तौलनिक व्याकरणाचें

१ W. Doderet: B. S. O. S. (London) Vol. IV (A Grammar of Jnyanesvari)

२ R. L. Turner: "A Comparative and Etymological Dictionary of Nepali Language," (Kegan Paul, London, 1931)

महत्त्व फार आहे. प्रो० जागिरदार यांनीं यासंबंधी " प्राचीन मराठीवरील कानडीचा परिणाम "[1] हा निबंध लिहिला आहे त्यात संशोधनपर चर्चा केली असून ती मूलगामी आहे. श्री० विठ्ठल रामजी शिंदे याचें " कानडी आणि मराठी " हे पुस्तक विशेषसे उपयुक्त नाही. प्रो० जोशी यांनी द्राविडी पंडिताच्या साहाय्याने ज्ञानेश्वरीतील कानडी शब्दाची केलेली यादी यथार्थ नसली तरी सूचक खचित आहे. वरील सर्व लेखात एका गोष्टीस फार जपले पाहिजे. कानडीचा मराठीवरील परिणाम पाहताना त्या त्या विद्वानास मराठीतील प्रत्येक बावीत द्राविडी अंश दिसूं लागतो, व क्वचित् ठिकाणीं डॉ० काल्डवेल व प्रो० जागिरदार याची शास्त्रीय दृष्टि लोपून त्यात आग्रहीपणा येतो, आणि त्याचे विवेचन पक्षाभिनिवेशाने दूषित झालेसे वाटूं लागतें. उदा० वस्तुतः मराठीतील सामासिक नामविभक्ति आणि कृदंत-पद्धति ही कोणत्याहि आर्य भाषेच्या रक्तात भिनलेली आहे, आनुवंशिक आहे. असें असताना मराठीने ती कानडीपासून घेतली असें प्रो० जागिरदार प्रभृति सिद्ध करूं पाहतात. अतएव, या प्रश्नाकडे निरंगी दृष्टीने पहाणे अवश्य आहे. राजवाड्याचे ' सुबंत ' व ' तिङन्त ' प्रकरणावरील विचार ध्यानी घेणें जरूर असले तरी त्याचीहि बुद्धि या ठिकाणीं आग्रही झालेली दिसते हे नाकबूल करून चालणार नाही. एकंदरींतच, राजवाड्याचें विधान मान्य करण्यापूर्वी तें नीट तपासावें हे योग्य.

वर, मराठी भाषेच्या सागाड्यासबंधी आजवर जे शास्त्रीय दृष्टीने लिहिलें गेले त्याचा विचार झाला. इतर अनेक प्रयत्न झालेले दिसतात. परंतु ते अशास्त्रीय असल्याने विनाकारण यादी वाढविण्यात अर्थ नाहीं. बऱ्यावाईट कसल्याहि संदर्भग्रंथाची लाबलचक मालिका देण्याची पद्धति जर्मन पंडिताची असली तरी ती त्याज्यच होय. व्याकरणविषयक ग्रंथांसंबंधीं मी वर लिहिले नाहीं हें खरें; परंतु तसें लिहिण्याची जरूरहि नाही. प्रस्तुतचा प्रबंध जुन्या मराठीच्या व्याकरणावरील नसून भाषास्वरूपावरील आहे. भाषाशास्त्र आणि व्याकरण यातील भेद स्पष्टच असल्यानें येथे त्याचा विस्तार करीत नाही. इतकेच लिहितों, की भाषाशास्त्रीय अभ्यास अधिक व्यापक

---

१ " Kanarese Influence on old Marathi " —( Annals of B. O.

स्वरूपाचा असल्याने त्याच्या पोटांत व्याकरणाचा समावेश होतो. म्हणूनच वैयाकरणांची वेगळी चर्चा देण्याचे प्रयोजन नाही.

## § ६ यादव-मराठी आणि अपभ्रंश

येथवर मराठीसंबंधी भाषाशास्त्रीय दृष्टीने ज्यानी लिहिलें आहे त्याची चर्चा झाली. त्यांच्या प्रबंधात सर्वसामान्य अशी एक उणीव आहे, आणि ती म्हणजे अपभ्रंशाकडील दुर्लक्ष. परंतु हा दोष त्याचा नव्हे. डॉ० भांडारकर, राजवाडे आणि ब्लोक याच्या वेळी अपभ्रंश भाषेतील वाङ्मय विशेषसे उपलब्ध नव्हतें व जे थोडेंसें होते त्याचा उपयोग राजवाड्यानी केलेला दिसत नाही. डॉ० भांडारकराचीं "वुइलसन फिलॉलॉजिकल लेक्चर्स" इ० स० १९१४ त व प्रो० ब्लोक याचा मराठीवरील ग्रंथ इ० स० १९२० त प्रसिद्ध झाल्याने त्यासंबंधी प्रश्नच उरत नाही. राजवाड्याचे ज्ञानेश्वरीचे व्याकरण इ० स० १९०९ त निघालें असले तरी पुढे अनेक वर्षे ते या विषयावर लिहीत असत. ज्या अपभ्रंशासंबंधी ते चर्चा करतात व जो इ० स० नंतर ५ व्या शतकात मृत झाला असे मानतात, तो अपभ्रंश कोणता याविषयी त्यानी लिहिले नाही. अपभ्रंश ग्रंथातूनहि रूपाची वा उच्चारप्रक्रियेची उदाहरणे त्यांनी दिलेली नाहीत. अर्थात् राजवाडे अपभ्रंशासंबंधाने कल्पनेनेच बोलत असावेत असे वाटते.

परंतु आता अशी कल्पना करण्याचे कारण नाही. अलीकडे अमरावतीचे प्रो० हिरालाल जैन यानी अपभ्रंश भाषेतील काही ग्रंथ छापून काढले आहेत. त्याची व प्रो० याकोबी वगैरेनी संपादिलेल्या अपभ्रंश ग्रंथाची यादी पुढें देतों——

१ भविसयत्तकहा ( धनपाल ) : डॉ० गुणे-दलाल
२ सनत्कुमारचरित ( हरिभद्र ) : प्रो० हर्मान याकोबी १९२१
३ भावनासंधिप्रकरण ( जयदेव मुनि ) : मोदी १९३०
४ णायकुमारचरिउ ( पुष्पदंत ) : प्रो० जैन १९३३
५ सावयधम्मदोहा ( देवसेन ) : प्रो० जैन १९३२
६ जसहारचरिउ ( पुष्पदंत ) : डॉ० वैद्य.
७ करकंडचरिउ ( मुनि कनकामर ) : प्रो० जैन १९३४
८ भविसयत्तकहा : प्रो० याकोबी.

वरील ग्रंथांतून साधारण १० व्या शतकातील ग्राथिक अपभ्रंश भाषा आढळते व ती अर्वाचीन आर्य भाषाच्या अलीकडील पायरी होय यांत संशय नाही. यादव-मराठीची वर्णप्रक्रिया व प्रत्ययप्रक्रिया या वरील अपभ्रंश भाषेंतून उत्क्रांत झालेल्या दिसतात. म्हणजेच यादव-मराठी ही अपभ्रंशापासून उत्पन्न झाली. मराठीची जन्मदात्री भाषा म्हणून वरील ग्राथिक अपभ्रंशाला विशेष महत्त्व असून त्याचा अभ्यास होणे अत्यवश्य आहे. अपभ्रंशाचा सागाडा नीट तपासल्याशिवाय यादव-मराठीतील कित्येक बाबीचा उलगडा होणार नाही. एवढ्याच करिता, वरीलपैकी काही ग्रंथातील भाषा अभ्यासून मराठीचा दुवा अपभ्रशाशी जोडण्याचा मी यत्न केला आहे. तो जुळविला असता अपभ्रंशापासून साक्षात् मराठी निघाली हे सिद्ध होतें. मराठीतील काही बाबी अपभ्रंशात न आढळता महाराष्ट्रीत व काही थोड्या मागधी-शौरसेनीत आढळतात. तेवढ्यापुरते मराठीने अपभ्रशाला सोडले असलें तरी मुख्यत: अपभ्रंशाचाच सागाडा जशाचा तसा यादव-मराठीत उतरला हें निश्चित. मराठी ही अनेक भाषांपासून निघाली असा सिद्धान्त कित्येक प्रतिपादितात, तसे नसून ती अपभ्रशापासूनच निघाली हे माझें मुख्य म्हणणे आहे.

## § ७ महाराष्ट्री, अपभ्रंश आणि यादव-मराठी

संस्कृतापासून प्राकृत भाषा कशा निघाल्या, किंवा त्या मूळांतच संस्कृतबरोबर बोली-भाषा म्हणून रूढ होत्या, त्या आहेत किती, त्याचे प्रांत कोणते, प्रातिक प्राकृतांतील वैशिष्ट्यें कोणती, प्राकृत या शब्दाची व्युत्पत्ति व त्या भाषांचे उत्पत्तिकाल, वगैरे प्रश्न इंडो–आर्यन भाषेच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत खरे; परंतु ते प्रस्तुत प्रबंधाच्या कक्षेंत न येता प्राकृत भाषेवरील ग्रंथांतच येऊं शकतात. प्राकृतांतील व विशेषत: महाराष्ट्रीतील वर्णप्रक्रिय आणि प्रत्ययप्रक्रिया यांचाहि विचार येथे कर्तव्य नाही. वररुचि आणि हेमचंद्र यांच्या प्राकृत व्याकरणांवरून अनेकांनीं ही चर्चा केली आहे. सर्वसाधारण प्राकृत भाषाचा उगम, त्यांचा काल व त्यांचे प्रांतिक भेद यांसंबंधींहि प्रो० ब्लोक यानीं आपल्या प्रस्तावनेंत, राजवाड्यांनीं ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत, प्रो० कृ० पां० कुळकर्ण्यांनीं ‘मराठीची पूर्वपीठिका’ या

प्रकरणांत, आणि चिं० वि० वैद्यांनीं आपल्या निबंधांत विस्तारानें चर्चा केली आहे. या पंडितांत मतैक्य नसलें तरी प्राकृत भाषांचें सम्यग् ज्ञान होण्यास ती चर्चा उपयुक्त आहे. पुढे मी महाराष्ट्री–अपभ्रंशाशी यादव-मराठीचा दुवा जोडून दाखविणार आहें, तेव्हां त्या दृष्टीने महाराष्ट्री आणि तिचा अपभ्रंश यासंबंधी पुढें कांहीं प्रास्ताविक चर्चा करितों.

आर्य लोक विंध्याच्या दक्षिणेस साधारणतः इ० स० पूर्वी ६०० च्या सुमारास येऊं लागले व त्यांनीं गोपराष्ट्र, मल्लराष्ट्र, पाडुराष्ट्र, कोंकण, विदर्भ व अश्मक हीं मुख्य राष्ट्रें स्थापित केली. या सर्व राष्ट्रातून आर्य जी भाषा तत्कालीं बोलत ती महाराष्ट्री प्राकृत. म्हणजे महाराष्ट्रीचा आरंभकाल साधारणतः इ० स० पूर्वी ६०० हा मानला पाहिजे. महाराष्ट्र या शब्दाच्या अनेक व्युत्पत्ति सुचविल्या गेल्या आहेत. " महा + राष्ट्र [ मोठें राष्ट्र ]; महा+रट्ट; मल्लराष्ट्र; महार राष्ट्र " अशा अनेक कल्पना विद्वान् पुढे माडतात[1] पैकीं विंध्यापलीकडील महारण्याचें बनविलेले म्हणून महाराष्ट्र, मोठें राष्ट्र हीच व्युत्पति अधिक पटते. तें कसेंहि असले, तरी इ० स० पूर्वी ६०० च्या सुमारास महाराष्ट्राचें स्वतंत्र अस्तित्व होतें हे निश्चित. जुन्नरजवळच्या नाणेघाटांतील शिलालेखांत **महारठिगनकहिरो** असा महाराष्ट्रिकांचा उल्लेख येतो. नाणेघाटांतील या लेखांत महरट्टांना ' गण ' हे उपपद लाविलें आहे. महाराष्ट्रिकांचा, रट्टांचा, किंवा महरट्टाचा जो जमाव किंवा संघ तो ' महारठिगन ' होय. महाराष्ट्र देश, वसाहत आणि लोक यांसंबंधी ' महाराष्ट्र शब्दकोशा 'च्या प्रस्तावनेंत ( खंड ३ मध्यें ) विस्तृत विवेचन केलेलें आहे. असो.

या महाराष्ट्रांतील महारठी लोक इ० स० पूर्वी साधारण ६००–७०० पासून महाराष्ट्री भाषा बोलत. ती संस्कृतची उघड उघड अपभ्रष्ट प्रतिकृति होती. डॉ[2] ग्रीयरसन व प्रो. स्टेन कोनौ[3] यांनीं " महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः " । ( दंडी काव्यादर्श १. ३४ ) या प्राकृत विद्वानांच्या मतास पुष्टिच दिली आहे. " सेतुबंध,

१ महाराष्ट्र शब्दकोश, प्रस्तावना, खंड ३, पान ४

२ प्रो० पां० वा० काणे ( वि० विस्तार, वर्ष ४९ )

३ *Sten Konow: Maharastri and Marathi.*

सप्तशती, कर्पूरमंजरी " हे महाराष्ट्रींतील प्रमुख ग्रंथ होत. प्राकृत या शब्दाच्याहि अनेक व्याख्या आढळतात. "प्रकृतिः संस्कृतं तत्र भवं ततः आगतं वा प्राकृतम्" (हेमचंद्रः) "प्रकृतिः संस्कृतं तत्र भवं प्राकृतमुच्यते"। (वररुचि) या केवळ पंडिती व्याख्या सोडल्या तर, "प्रकृत्या सिद्धं प्राकृतम्" आणि "प्रकृतीनां इदं प्राकृतम्" या व्युत्पत्तींवरून महाराष्ट्री वा इतर प्राकृत या सामान्य जनसमूहाच्या भाषा होत्या हें कळते. त्यात महाराष्ट्री व अर्धमागधी या अत्यंत निकट आहेत. स्वरांतर्गत व्यंजनाची प्रक्रिया आणि विभक्तिप्रत्यय या दोन बाबतीत महाराष्ट्री व अर्धमागधी यात पुष्कळच साम्य आहे. सर्व प्राकृत भाषात आद्य स्थान महाराष्ट्रीस देतात. वररुचि आपल्या 'प्राकृतप्रकाशा'त शौरसेनीचे व्याकरण सागत असताना त्या भाषेचे कांही विशेष देऊन पुढें 'शेषं महाराष्ट्रीवत्' हें सूत्र देतो व हेमचंद्र तर प्राकृत व्याकरण म्हणजे महाराष्ट्रीचेच समजतो. अर्धमागधीचे महाराष्ट्रीशी बरेच साम्य दिसते याचें कारण असें, कीं चंद्रगुप्ताच्या राजवटीत मगध देशांत जे मोठें अवर्षण झालें त्या वेळी जैन मुनि दक्षिणेंत समुद्रतीरी वास्तव्य करण्यास गेले व कोंकण–महाराष्ट्र प्रांती संचार करणाऱ्या जैन मुनीच्या भाषेवर महाराष्ट्रीचा परिणाम झाला. पुढें, जैनअपभ्रंश आणि महाराष्ट्री-अपभ्रंश दोन्ही एकरूप दिसतात याचें कारण हेच होय.

## § ८ महाराष्ट्री–अपभ्रंश

इ० स० ४०० च्या सुमारास महाराष्ट्रीचा अत होऊन अपभ्रंश कां सुरू झाला या प्रश्नाचे निश्चित उत्तर देणें कठिण आहे. मात्र राजवाडे मानतात त्याप्रमाणे याचे कारण बाह्य नसावे. परप्रातांतील नाग लोकांशीं मिश्रण होऊन अपभ्रश तयार झाला असें मत राजवाड्यांनी मांडिलें आहे. परंतु त्याला आधार नाही. शिवाय महाराष्ट्री लुप्त झाली याची मीमांसा भाषेच्या आंतर स्वभावातच सापडूं शकेल. कोणत्याहि भाषेचें पंडिती व्याकरण झालें म्हणजे ती भाषा जशी पूर्णतेस पोहोंचते त्याप्रमाणेंच तेथे तिची वाढहि खुंटते. पाणिनीय व्याकरणानंतर संस्कृतची वाढ खुंटली, तिला स्थिरत्व आलें.

१ राधामाधवविलासचंपू...प्रस्तावना, भाग ३

वररुचीचा ‘ प्राकृतप्रकाश ’ झाल्यावर महाराष्ट्रीची व इतर प्राकृत भाषांची ग्रांथिक वाढ स्थगित होऊन सामान्य जनसमूहाच्या बोलीत मात्र त्यांच्या ज्या काही प्रक्रिया व्हावयाच्या त्या चालूच राहिल्या. पुढे हेमचंद्र आपल्या प्राकृत व्याकरणांत अपभ्रंश-भाषेचे स्वरूप सागतो. परंतु ते जिवंतपेक्षा मृत अपभ्रंशाचेच स्वरूप वाटते. म्हणजे हेमचद्राच्या वेळी अपभ्रंश लुप्त होऊन आधुनिक आर्यभाषांना आरंभ झाला होता. तात्पर्य, अपभ्रंशाचा काळ साधारण इ० स० ५०० ते १००० असा मानण्यास हरकत नाही.

परतु हा अपभ्रंश कोणत्या भाषेचा ? हा प्रश्न मराठीच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. अपभ्रंश याचा धात्वर्थच पाहिला तर ‘ विकृति ’ असा होईल. आणि याच अर्थाने संस्कृत वैयाकरण हा शब्द वापरीत. पतंजलीने आपल्या महाभाष्यात एकाच शब्दाचे अनेक अपभ्रंश होतात असे सांगितले आहे. पहा—

“ एकैकस्य हि शब्दस्य बहवोऽपभ्रशाः ” ( महाभाष्य १. १. १ )

दंडी आपल्या काव्यादर्शात आभीराची भाषा अपभ्रश असून शास्त्रांत सर्व संस्कृतभिन्न भाषास अपभ्रशच म्हणतात असे सागतो. पहा—

“ आभीरादिगिरः काव्ये अपभ्रश इति स्मृताः ।
शास्त्रे तु संस्कृतादन्यदपभ्रंशतयोदितम् ”। ( काव्यादर्श १. ३६ )

तेव्हां अपभ्रशाचा संस्कृत पडितांचा अर्थ प्रस्तुत प्रकरणी लागू नाही.

प्राकृत भाषांचे वैयाकरण मात्र अपभ्रंश हा एक भाषाभेद मानतात आणि तेंच योग्य आहे. संस्कृत भाषेप्रमाणेच प्राकृत भाषा जेव्हा ग्रांथिक स्वरूपांत व व्याकरणनियमांनी बद्ध झाल्या तेव्हां सामान्य लोकांच्या बोलीस जें रूप प्राप्त झालें तें अपभ्रंशाचें होय. प्रत्येक प्राकृत भाषेची एकेक अपभ्रंश भाषा त्या त्या प्राकृताच्या प्रांतांत रूढ झाली; व अशा रीतीने आपणास महाराष्ट्री-अपभ्रंश, शौरसेनी-अपभ्रंश, मागधी-अपभ्रंश आणि पैशाची-अपभ्रंश मानावे लागतात. त्यांचा काळ साधारण इ० स० ५०० धरावा. प्रो० हर्मान याकोबी हे मात्र “ पउमचरिय ” या ग्रंथावरून अपभ्रंशाचा काळ आणखी २०० वर्षें मागें नेण्याचा यत्न करितात.

अपभ्रंशाचे २७ उपभेद 'प्राकृतचंद्रिकें'त दिले आहेत. तेच आपल्या 'प्राकृतसर्वस्वांत' उद्धृत करून मार्कंडेय त्यांवर टीका लिहितो. अपभ्रंशाचे हे २७ उपभेद असे:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ व्राचड, | २ लाट, | ३ वैदर्भ, | ४ उपनागर |
| ५ नागर, | ६ ? | ७ बार्बर, | ८ आवंत्य, |
| ९ पाचाल, | १० टक्क, | ११ मालव, | १२ कैकय, |
| १३ गौड, | १४ औढ्र, | १५ पाश्चात्य | १६ पाड्य, |
| १७ कौंतल, | १८ सैंहल | १९ कालिंग, | २० प्राच्य, |
| २१ कार्णाट, | २२ कांच्य, | २३ द्राविड, | २४ गौर्जर. |
| २५ आभीर, | २६ मध्यदेशीय | २७ वैताल, | |

परंतु या सर्वांत ग्रंथरचना नाही. शिवाय ही नुसती प्रातिक बोलीची यादी असावी. मार्कंडेय स्वतःच पुढें हे २७ उपभेद सोडून 'नागर, व्राचड, आणि उपनागर' असे तीन महत्त्वाचे भेद करतो. पुरुषोत्तमानें आपल्या 'प्राकृतानुशासना'त मार्कंडेयासारखेंच वर्गीकरण केले आहे. विद्यापतीनें आपल्या 'कीर्तिलते'तं "अवहट्ट" असा शब्द वापरला असून, 'संनेहय रासय' या अबदुर्रहमान याच्या ग्रथातहि[४] अवहट्ट भाषेचा अवलंब केल्याचे दिसतें.

तेव्हा अपभ्रंश भाषेचे नागर, उपनागर व व्राचड असे तीन मुख्य भेद दिसतात. पैकी हेमचंद्राचा अपभ्रंश व मार्कंडेयाचा नागर अपभ्रंश हे एकच असे मत प्रो० कुळकर्णी[५] प्रतिपादितात. परंतु वरील तीन प्रकारच्या अपभ्रंशातील अमक्या अपभ्रंशाहून अमकी आधुनिक भाषा निघाली असे सिद्ध करण्यास पुरावा नाही. तेव्हा ही नावे आणि आधुनिक आर्यभाषा याचे संबंध जोडण्यांत

१ "Names of Prakrit Languages"–S. M. Katre (Volume of Studies Presented to Prof. Ross.)

२ "प्राकृतानुशासन" – पुरुषोत्तम, (संपा० निटिडॉल्की, पॅरिस, १९३८)

३ Edited by Dr. Baburam Saksena.

४ "A Muslim Contribution to Apabhramsa Literature" —S. M. Katre (Karnatak Hist. Review. Vol. IV)

५ मराठी भाषा—उद्गम व विकास, पा. ११५.

अर्थ नाहीं. प्राकृतवैयाकरणांचा व त्यांच्या व्याकरणांचा जो इतिहास मॅ० लुगिया निटिडॉल्की यांनीं लिहिला आहे, त्यामुळे प्राकृतावर बराच प्रकाश पडला तरी अपभ्रंशाचे भेद नीट उकलतां येत नाहीत. वैदिकपासून पाणिनीय संस्कृत, संस्कृतापासून प्राकृत व प्राकृतापासून अपभ्रंश, येथवर दुवे नीट जुळतात. परंतु पुढे अमक्या अपभ्रंशापासून मराठी असे विधान निदान प्राकृत वैयाकरणाच्या अपभ्रंशनामांवरून तरी करतां येत नाही आणि म्हणूनच मराठीच्या उत्पत्तीबाबत मतमतान्तरे दृष्टीस पडतात. कोणी महाराष्ट्रीपासून साक्षात्, कोणी नागर-अपभ्रंशापासून, कोणी अर्धमागधीपासून, तर कोणी सर्व प्राकृत भाषांपासून मराठीची उपपत्ति लावितो. याऐवजी नागर, उपनागर व व्राचड अपभ्रंश ही नांवे सोडून, महाराष्ट्रात महाराष्ट्रीचा जो अपभ्रंश इ० स० ५०० च्या सुमारास रूढ झाला त्याचे अवशेष जर यादव-मराठीत दिसले तर मराठी ही महाराष्ट्री-अपभ्रंशापासून निघाली असे कां म्हणूं नये ? एतत्प्रकरणी वि० का० राजवाडे याचीच मीमासा बरोबर वाटते. त्यांचें म्हणणें थोडक्यांत असे—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| संस्कृत > प्राकृत : | महाराष्ट्री | मागधी | शौरसेनी | पैशाची |
| | \| | \| | \| | \| |
| > अपभ्रंश : | महाराष्ट्री अपभ्रंश | मागधी अपभ्रंश | शौरसेनी अपभ्रंश | पैशाची अपभ्रंश |

प्रत्येक प्राकृताची एकेक स्वतंत्र अपभ्रष्ट भाषा इ० स० ५०० च्या सुमारास रूढ झाली होती व त्यांपासून पुढें आधुनिक आर्य भाषा जन्मल्या. अशा रीतीनें मराठीचा दुवा महाराष्ट्री-अपभ्रंशाशीच सांधूं शकेल. या प्रकरणीं आधार जैन लेखकांनीं लिहिलेल्या अपभ्रंश-ग्रंथांचा आहे. इ० स० ५०० पासून १००० पर्यंतचा काळ अपभ्रंश-भाषाच्या भरभराटीचा होता. त्यांत " पउमचरिउ, भविसयत्तकहा, करकंडचरिउ, संणकुमारचरिउ, णायकुमारचरिउ, सावयधम्मदोहा, जसहारचरिउ, भावनासंधिप्रकरण " वगैरे उत्तम ग्रंथ झाले. त्यांतील भाषा महाराष्ट्री प्राकृत होय. तिलाच जैन महाराष्ट्री ही संज्ञा अलीकडे मिळते, ती केवळ जातिवाचक होय. वस्तुतः महाराष्ट्री-

१ Mme. Luigia Nitti-Dolci: "Les Grammariens Prakrits," 1938
२ ज्ञानेश्वरीची प्रस्तावना, पा० ५४–५६

अपभ्रंश व जैन महाराष्ट्री या एकच होत. जैन महाराष्ट्री हे नांव प्राकृत व्याकरणांतून आढळत नाहीं. अर्थात् ते नव्या छापाचे आहे. जैन मुनींनीं मगध प्रांतांतून महाराष्ट्रात येऊन ग्रंथ केले हे मान्य आहे व जैनांनीं जो अपभ्रंश वापरला तो महाराष्ट्रीचा असून केवळ धर्मामुळें त्यास ' जैन महाराष्ट्री ' हे नाव अलीकडे मिळाले. अर्धमागधीच्या काही खुणा यादव-मराठीत आढळतात याचे कारण हेच होय. प्रो० हिरालाल जैन हे अपभ्रंश-ग्रंथाचे विद्वान् संपादक यासंबंधी म्हणतात—

" Apabhramsa has been regarded as one of the Prakrit Bhasas which include all the ancient languages other than Sanskrit. The most simple meaning of the word seems to be " The Natural language ", i. e. the language of the people unrefined by any rigid rules of grammar and rhetorics."

( णायकुमार० Intro. p. 46 )

तसेंच ' सावयधम्मदोहा ' च्या प्रस्तावनेत ( पान २० ) ते लिहितात—

" जैन भंडारो की सूचियो मे इस भाषा के ग्रथ प्रायः मागधी भाषा के नाम से दर्ज किये हुये मिलते है; किंतु यह भाषा न तो मागधी है और न अन्य शौरसेनी आदि प्राचीन प्राकृत। किंतु इन प्राकृतों ने प्रचलित देशी भाषाओ के पूर्व जो रूप धारण किया था वही इन ग्रंथों मे पाया जाता है। यह उनका विकसित या अपभ्रष्ट रूप है और इसी से इस भाषा का नाम अपभ्रंश या अवहट्टा पडा। १० वी ११ वीं शताब्दि के लगभग यही भाषा समस्त उत्तर भारत मे प्रचलित थी, किंतु देशभेद के अनुसार उसमे भेद थे।"

वरील दोन उताऱ्यावरून अपभ्रंशाचे इंडो-आर्यन मधील स्थान ध्यानात येईल. वररुचीच्या प्राकृत व्याकरणांमुळे स्थगित झालेल्या प्राकृतांचा अपभ्रंश भारताच्या निरनिराळ्या भागांत भिन्नभिन्न रूपांनी रूढ झाला. महाराष्ट्रांत तो महाराष्ट्री-अपभ्रंश किंवा उपलब्ध ग्रंथांवरूनच बोलावयाचें तर जैन महाराष्ट्री ( अपभ्रंश ) म्हणून होता व त्यापासूनच साक्षात् यादव-मराठी निघाली. उपलब्ध अपभ्रंश-ग्रथांची चर्चा डॉ. गुणे यांनीं केली

आहेचे. तीवरून व अलीकडे प्रो० हर्मान याकोबी आणि प्रो० हिरालाल जैन यांनी काही अपभ्रंश ग्रंथ संपादित केले आहेत त्यावरून मुख्यत: यादव मराठीचा तत्पूर्व अपभ्रंशाशी दुवा जोडण्याचे काम प्रस्तुत प्रबंधाचे आहे. असा दुवा जोडला गेला म्हणजे यादव-मराठी ही साक्षात् अपभ्रंशापासून निघाली असे सिद्ध झाले, तरच तिचे इंडो-आर्यन भाषाच्या इतिहासांतील स्थान निश्चित करता येईल. तस्मात्, पुढे प्रथम यादव-मराठीची वर्णप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, शब्दसिद्धि, वाक्प्रयोग यासंबंधी प्रबधाच्या मुख्य भागांचा आढावा घेऊन व नतर यादवपूर्व अपभ्रंशाचे स्वरूप सागून, शेवटी दोहोंचा मेळ घालण्याचे किंवा दुवा जोडण्याचे काम मी करीन. तो जोडला गेला म्हणजे यादव-मराठी संबंधीचे मुख्य-प्रमेय वा सिद्धान्त मांडता येईल. तत्पूर्वी तिची वर्णप्रक्रिया व प्रत्ययप्रक्रिया सागतो.

## § ९ यादव-मराठीची वर्णप्रक्रिया

यादव-मराठींतील उच्चारापैकी ' ऐ, औ ' हे संयुक्तस्वर, ' च, छ, ज, झ ' याचे दंत्यतालव्य उच्चार आणि ' ळ ' हे मूर्धन्य, एवढे भाग चर्च्य आहेत. मराठीची वर्णप्रक्रिया अपभ्रंशापासूनच झालेली असून अपभ्रंशातील सर्व उच्चार तींत आढळतात. या परंपरागत उच्चाराखेरीज इतर काही यादव-मराठीने स्वतंत्रपणे सिद्ध केले. ' ऋ ' या स्वराची अपभ्रंशात ' अ, इ, उ, ए, अर, रि ' अशी रूपान्तरे होत. यादव-मराठीतहि तीं सर्व होऊन शिवाय भाषेचे संस्कृतीकरण होत असल्याने तत्सम शब्दात मूळ ' ऋ ' कायम राहिलेला दिसतो.

**संयुक्त स्वर**—प्राचीन इंडो-आर्यनमधील ' ऐ ' व ' औ ' हे संयुक्त स्वर मध्य-इंडो-आर्यन-कालीच लोपून त्याच्या जागी अनुक्रमें ' ए-ओ ' किंवा ' इ-उ ' येऊं लागले. हीच परंपरा मराठींतहि दिसते. उदा० मोती ( मौक्तिकम् ); सेवाळ ( शैवाल ); विआही ( वैवाहिक ); तेल ( तैल ); जोवण ( यौवन ). म्हणजे प्राचीन इंडो-आर्यनमधील संयुक्त स्वर प्राकृत-अपभ्रंशांत नाहींत, तसे मराठींतहि नाहींत. यादव-मराठींत संयुक्तस्वर

१ " Apabhramsa Literature and its Importance to Philology " –Dr. P. D. Gune ( Ist Oriental Conference, Poona, 1919 )

दिसतात ते संस्कृतजन्य नसून, अपभ्रंशातील स्वरातर्गत व्यंजनलोपामुळें उत्पन्न झालेल्या स्वराच्या संयोगानें सिद्ध होतात. अ + इ = ई, आणि अ + उ = ऊ अशा संयोगामुळें संयुक्त स्वर अनुक्रमें 'ऐ' व 'औ' हे निघाले. उदा०

| संस्कृत | प्राकृत–अपभ्रंश | मराठी |
|---|---|---|
| प्रतिज्ञा | पइज्जा | पैज [अ+इ] |
| मलिन | मइल | मैल [अ+इ] |
| प्रविष्ट | पइठ्ठ | पैठ [अ+इ] |
| प्रतिष्ठान | पइठ्ठाण | पैठण [अ+इ] |
| जतुगृह | जउघर | जौहर [अ+उ] |
| चतुर्थ | चउत्थ | चौथ [अ+उ] |
| चतुष्क | चउक्क | चौक [अ+उ] |
| जय | जइ | जै [अ+इ] |

तात्पर्य, अपभ्रंशातील भिन्न स्वराच्या संयोगानें मराठीतील 'ऐ–औ' हे संयुक्त स्वर बनले आहेत.

**च, छ, ज, झ :** संस्कृतातील या व्यंजनाच्या शुद्ध तालव्य उच्चाराखेरीज त्याचे दत्यतालव्य उच्चार यादव-मराठीत आहेत. हे उच्चार कोठून आले हा एक प्रश्न आहे. या बाबतीत गुजराती मराठीशी समधर्म आहे. यादव-मराठीत तत्सम शब्दात या वर्णाचा उच्चार शुद्ध तालव्य होतो. परतु तद्भव आणि देशी शब्दात, 'इ–ए' हे स्वर पुढें नसताना, याच वर्णाचा उच्चार दत्यतालव्य होतो. [ उदा० चेओ, छेदणें जेहीं, जिणौनि, झिडिकाय–शुद्ध तालव्य ]. याशिवाय, "तद्भव शब्दातील 'ज्, झ्,' हे वर्ण ज्या वेळी सस्कृत 'य्' ह्या वर्णापासून उत्पन्न झालेले असतात त्या वेळींहि त्याचा उच्चार शुद्ध तालव्य होतो" असा नियम प्रो० कृ० पा० कुळकर्णी[2] देतात, तो अयोग्य होय. उदा० "जुझ" (सं० युध्) यांतील उच्चार दंत्यतालव्यच आहेत, शुद्ध तालव्य नाहींत. असो. हे

१ राजवाडे [ ज्ञा० व्या० पा० ३ ] म्हणतात त्याप्रमाणे मराठीतील संयुक्त स्वर म्हणजे संस्कृताचें पुनरुज्जीवन नव्हे. सर्व वर्तमान इंडो-आर्यन भाषांमधील संयुक्त स्वरांची उपपत्ति भिन्नस्वरसंयोगानेंच लागते.

२ मराठी भाषा–उद्गम व विकास, पा० ३२२

दंत्यतालव्य उच्चार कसे आले यासंबंधी मतभेद आहेत. मोगली भाषेचा हा परिणाम असावा असें प्रो० दिवेटिया[1] मानतात. प्रो० ब्लोक[2] याचा संबंध द्राविडीशीं जोडतात.

यादव-मराठीतील दंत्यतालव्य उच्चारासंबंधीची प्रक्रिया पाहता, 'इ-ए' हे स्वर पुढे नसताना, तद्भव शब्दात वरील उच्चार आढळतात. संस्कृत 'य्' ह्या वर्णापासून 'ज, झ' आले असता त्याचे उच्चार शुद्ध तालव्य होतात असा नियम गुजरातीपुरता देऊन प्रो० दिवेटिया त्याला अपवादहि सांगतात. प्रो० कुळकर्ण्यांनी दिवेटियांचाच अनुकार मराठीसंबंधी केला असावा. परंतु ते अपवाद मात्र देत नाहीत. वस्तुतः मराठीत जुआरी [द्यूतकार]; सांझ [संध्या]; काज [ कार्य ]; वाझ [ वध्या ]; वीज [ विद्युत् ] असे कितीतरी दंत्यतालव्य उच्चार संस्कृत 'य्' पासून निघालेल्या वर्णांचे होतात. तेव्हा हा उच्चार संस्कृतावर अवलंबून नसून मराठीतीलच त्या वर्णांच्या निकटवर्ती स्वरावर अवलंबून आहे.

महाराष्ट्री व अपभ्रंश यांत हा उच्चारभेद सुरू झाला. तो मराठी, गुजराती, बंगाली, मारवाडी या भाषात आहे. सिंधींत आणि हिंदीत मात्र नाहीं. काश्मिरी भाषेंत 'त्स' असा एक विशिष्ट उच्चार असून 'चौर' शब्द 'त्सूर' असा उच्चारिलेला आहे. भूतानी भाषेंत 'च' चा 'त्स' असाच उच्चार आहे. ब्रह्मी भाषेंत 'चंद्र'चे 'संदा' असें रूप होते. सिंहलींतही 'च' चा 'स' होतो.[4]

संस्कृतात हा उच्चारभेद नसून महाराष्ट्रीत तो नव्यानेच आला. डॉ० ग्रीयरसन यानी या विषयाचा संपूर्ण अभ्यास करून स्वतःचा सिद्धान्त मांडिला आहे. त्यांच्या मतें शुद्ध तालव्यांचा दंत्यतालव्य उच्चार चंद्रगुप्ताच्या

१ Wilson Philological Lectures, p. 349

२ La langue Marathe, p. 33

३ Dr. Grierson: Manual of Kashmiri Language, Vol. I, p. 14

४ Childer's Pali Dictionary.

५ Dr. Grierson: "Prakrit Palatals"— J. R. A. S. (1913) Pp. 391 ff.

महाराष्ट्रींत व शौरसेनीत सुरू झाला. एतत्प्रकरणीं ते वररुचीच्या पुढील सूत्राचा आधार देतात......

'चवर्गस्य स्पष्टता तथोच्चारण:'। -प्राकृतप्रकाश ९.५ [मागधीसंबंधीं] परंतु या सूत्रातील 'स्पष्टता' या पाठाबद्दल व या शब्दाच्या अर्थाबद्दल मतैक्य नाही आणि स्पष्ट अर्थ निश्चित झाल्यावाचून हें सूत्र आधारभूत होऊं शकत नाही. मात्र महाराष्ट्री आणि मागधी यातील 'च' वर्गाच्या उच्चारांत फरक होता एवढे मात्र खचित. मार्कंडेय या प्राकृत वैयाकरणाची पुढील सूत्रें या दृष्टीनें महत्त्वाची आहेत. पहा—

"चजयोरुपरि य: स्यात्। य्चिरं। य्चिअ"। १२-२१
"श्चिण्टो य्चिश इत्येके। य्चिशादि"। १३-३
"चजोरुपरि यो भवेत्। य्चलइ। य्जलइ"। १८-२
"चवर्गस्योपरिष्टाद्य:। य्छले"। २०-४

म्हणजे मार्कंडेयाच्या मते मागधी व वायव्येकडील व्राचड-अपभ्रंश यात शुद्ध तालव्य उच्चार होई. तात्पर्य, प्राकृत वैयाकरणांच्या मतें 'च, छ, ज, झ' हे दंत्यतालव्य म्हणजे 'अस्पष्ट' आणि 'य्च, य्छ, य्ज, य्झ' हे शुद्ध तालव्य म्हणजे 'स्पष्ट' उच्चार दिसतात व महाराष्ट्री शौरसेनींत यापैकी स्पष्ट व मागधींत अस्पष्ट उच्चार आहेत. ही विभागणी सोडली तरी एकाच वर्णाचे दोन भिन्न उच्चार महाराष्ट्रीत होते हें खरें. 'य' या तालव्य अर्धस्वराने चवर्गाचे हे दोन उच्चारभेद दाखविण्याची मार्कंडेयाची प्रथा डॉ. ग्रियरसन यानी प्रकाशात आणिली. त्याच्या विधानाला पुरावा भारतीय नांवांचीं जी ग्रीक रूपान्तरें केलेलीं आढळतात त्यांत मिळतो. त्यांवरून महाराष्ट्रींत चवर्गाचे दंत्यतालव्य उच्चार चंद्रगुप्त राजाच्या पूर्वकालापासून आहेत हें स्पष्ट होतें. डॉ. ग्रियरसन यांनी पुढील ग्रीक रूपान्तरांची उदाहरणें दिलीं आहेत...

| | | | |
|---|---|---|---|
| चंद्रगुप्त | Sandrokuptos | पंचाल | Passaloi |
| चंदन | Tzandanon | चष्टन | Tiastanes |
| उज्जयिनी | Ozena | जमुना | Diamouna |

१ "प्राकृतसर्वस्व"

म्हणजे तत्कालीन प्राकृतांत—पालींत—चवर्ग दत्यतालव्यासारखा उच्चारिला जात असल्याखेरीज त्याचे रूपान्तर ग्रीकमध्यें दंत्यवर्णाने होतें ना. तात्पर्य, इ० स० ३२२ मध्यें हिंदुस्थानातील प्राकृतात हा उच्चारभेद होता. तो पुढे महाराष्ट्री-अपभ्रंश, यादवमराठी, यात दिसतो. प्रो० दिवेटिया यानी हा उच्चारभेद प्रथम चंद्रगुप्ताच्या काळाच्या मागे व नंतर वेदकालाच्याहि मागे नेण्याचा यत्न केला आहे. तो सोडला तरी ही दंत्यतालव्य उच्चाराची प्रथा मोगली भाषांतून आली असावी हा त्याचा तर्क अयोग्य ठरतो. कारण, एक तर हिंदी व सिंधी भाषातून तो दिसत नाही व उलट सिहली भाषेत नित्य दिसतो. तेव्हा बीम्स व प्रो० ब्लोक याच्या म्हणण्याप्रमाणे हा द्राविडी भाषाचा परिणाम होय हेच खरे. इतकेच, की तो पाली-प्राकृता-पासून दृश्यमान होतो.[1]

'**ळ**'— ज्ञानेश्वरीच्या राजवाडे प्रतीत 'ळ' हा वर्ण नाहीं. त्याऐवजी सर्वत्र 'ल' आहे. परंतु ही लेखकाची वैयक्तिक वा प्रांतिक लकब होय. कारण, राजवाडेच स्वत: कबूल करतात की तत्पश्चात्क मराठीत व तदितर तत्समकालीन शिलालेखात 'ळ' आहे. पंढरपूरच्या इ० स० १२७३ च्या व नागावच्या इ० स० १३६७ च्या शिलालेखात 'ळ' दिसतो. माडगावकरी ज्ञानेश्वरींत [पैठण प्रत इ० स० १६२९] तो आहे. महानुभाव प्रथाचा आधार या प्रकरणीं सबळ आहे. महानुभावी जुन्या पोथ्यातून सर्वत्र 'ळ' आढळतो. एवढेंच नव्हे तर त्यातील साकेतिक लिपीत 'ग' व 'ळ' याना अनुक्रमे 'ळ' व 'ल' असे संकेत बसविले आहेत. श्री० ह० ना० नेने हे महानुभाव वाङ्मयाचे संशोधक 'सकळ' व 'सुंदरी' या सांकेतिक लिप्याचे काळ अनुक्रमें इ० स० १३५३ व १३६३ असे मानतात. तेव्हा संकेत बसविते-काळीं म्हणजे १४ व्या शतकांत 'ळ' हा स्वतंत्र उच्चार होता हें निश्चित.[2] शिवाय, "मळेयानीळु (शि० २८७), नीह्ळ (निलाल: इ० ११), यळा (लीळा. ३–५३)" व "गुळळा, लीळा, राउळ, बहळ, डोळा, गळा, विळचां" इत्यादि शब्दात 'ळ' कडेच ओढा दिसतो. याहून अधिक उलगडा यमकांच्या साहाय्यानें होईल. पुढील यमकें पहा—

१ N. B. Divatia: "Wilson Philological Lectures," p. 348.
२ "श्रीज्ञानेश्वरदर्शन"—साहित्यखंड, पान ५१

" रजस्तमाचिये सांजवेळे : फळवृत्तीचेनि भाषा **बोले** ।
ते निवृत्तिमार्गं चोरमोळे : सारिले मन्वादिकीं " ॥ (उद्ध० ६३६)

" तीये मुक्तिचा राउळी : वेधवतिये वोळग **वारिली** ।
तेथ रीगो न ल्हाये हाउळी । सिल्पविद्याचि " ॥ ( उद्ध० ६३८ )

येथे वास्तविक यमकाकरिता ' बोळे ' व ' वारिळी ' अशी रूपें व्हावयास पाहिजेत; परंतु ती तशी न होता ' ल ' युक्तच राहातात. अर्थात् ' ल ' आणि ' ळ ' असे दोन भिन्न उच्चार तत्कालीन लेखक मानीत. असाच ' ळ ' मराठी पंचतंत्रातही आहे. ' वोळवितु, पिगळकु, पोकळ ' ही रूपें त्यांत येतात. तेव्हा ज्ञानेश्वरीत ' ळ ' नाही हे राजवाड्याचे म्हणणे भ्रांत ठरतें.

या मूर्धन्य ' ळ ' चा उगम निश्चित नाही. ज्ञानेश्वरानंतर मराठी भाषेत तो तेलगणातून शिरला हे राजवाड्याचें विधान कालदृष्ट्या बरोबर नाही. कारण, ज्ञानेश्वरकाली ' ळ ' होता. वैदिक ' ळ ' चा व अर्वाचीन ' ळ ' चा संबंध नाही. वैदिक ऋग्वेदी ब्राह्मणाच्या पाठात जो ' ळ ' आहे तो ' ड ' पासून निघतो. ' ऋक् प्रातिशाख्या'त ' ड-ढ ' याची ' ळ-ळ्ह ' अशी प्रक्रिया सांगितली आहे. अर्वाचीन ळ हा ' ल ' पासून सिद्ध होतो. तेव्हा प्राचीन वैदिक ' ळ ' चा संबंध येथे नाही. तो आहे असे गृहीत धरल्यानें प्रो० दिवेटिया या वैदिक ' ळ ' चा अंश प्राकृतात शोधण्याचा व्यर्थ प्रयत्न करतात. असो. हा ' ळ ' संस्कृतात नाही. पालीत स्वरांतर्गत ' ड ' चा ' ळ ' होतो. प्राकृतात ' ळ ' दिसतो. हेमचंद्र ' लोळः ' असा नियमच देतो. परंतु तो पैशाचीपुरताच आहे. [ व्याकरण ८-४-३०७ ]. त्यावरून ' ळ ' अर्वाचीन भाषात पैशाचीमधून आला असा सिद्धान्त प्रो० दिवेटिया बांधतात. [ लेक्चर्स, पान ३६६ ]. तसें असतें, तर तो मराठी-गुजरातींत येऊन बंगाली-हिंदीतच का येता ना ? अर्थात् मराठी ' ळ ' चा पैशाचीशी संबंध नाही.

---

१ " ज्ञानेश्वरीचें व्याकरण ", पान ४

२ " Rik-Pratisakhya of Sannaka, Ed. Max Muller, 1-21; 1-22.

३ N. B. Divatia: Wilson Philological Lectures, Vol. I, pp. 362-68.

४ Dr. Bhandarkar: Wilson Philological Lectures, p. 41.

यादव-मराठींत स्वरान्तर्गत ‘ ल ’ चा ‘ ळ ’ होतो हें बव्हंशी खरें आहे. मात्र तसा नियम सांगता येणार नाहीं. उलट, ‘ ड ’ चाहि ‘ ळ ’ झाल्याची स्थळें आहेत. उदा० पिळणे [ पीड् ]; केळि [ क्रीडा ]. तेव्हा, “Inter-vocalic ल is changed to ळ ” याबरोबर ‘ ळ ’ हा ‘ ड ’ पासूनहि सिद्ध होऊं शकतो. ‘ ळ ’ कार प्राकृत कालापासून द्राविडी भाषाच्या द्वारेंच आला असावा. द्राविडीतील ‘ ळ ’ काराचे प्राबल्य प्रसिद्धच आहे. हाच द्राविडी ‘ ळ ’ प्रथम प्राकृतात व नतर अपभ्रंशद्वारा वर्तमान भाषात शिरला. दंत्यतालव्य उच्चार जसे द्राविडीतून आले तशीच गोष्ट मूर्धन्य ‘ ळ ’ चीहि आहे. एकंदरींतच आर्य भाषातील मूर्धन्य वर्णांची उपपत्ति द्राविडीच्या संपर्कापासून लावणारा डॉ० काल्डवेल आदि पंडिताचा वर्ग आहे. त्या म्हणण्यात तथ्य नसलें, तरी ‘ ल ’ चा ‘ ळ ’ असा मूर्धन्य उच्चार द्राविडी-तून आला असें मानावें लागते. भिल्ली भाषेंतही स्वरान्तर्गत ‘ ड-ढ ’ चा ‘ ळ ’ होतो. आणि भिल्लाच्या भाषेत द्राविडीचे पुष्कळ अंश सांपडतात, हें प्रसिद्ध आहे. एतावता, प्रो० दिवेटिया आणि प्रो० स्टेन कोनौ यांची पैशाचीची उपपत्ति सोडून द्राविडीची मानणे अधिक युक्त.

येथवर यादव-मराठीतील विशेष वर्ण पाहिले. तिची सर्वसाधारण वर्णप्रक्रिया पाहता अपभ्रंशाची परंपरा तिने पुढे चालविलेली दिसते. स्थान-नियत स्वरान्तरात, अंत्यस्वरलोपाला नुकता आरंभ झाला आहे. अपभ्रंशा-तील ‘ अ, आ, इ ’ या अंत्य स्वराचाच काय तो लोप होतो, व ‘ ई, उ, ऊ, ए, ओ ’ हे अंत्य स्वर लोपत नाहींत. वर्तमान मराठींतून लुप्त झालेला अंत्य स्वर पुष्कळ प्रमाणांत यादव-मराठींत कायम आहे व त्याच्या लोपाला यादवोत्तरकालीं आरंभ झालेला दिसतो. [ क्र० ४[३] ] महाराष्ट्रीतील उपान्त्य स्वर यादव–मराठींत केवळ ऱ्हस्वाचे दीर्घ व दीर्घाचे ऱ्हस्व झालेले दिसतात. स्वरान्तर्गत व्यंजनाच्या लोपामुळें मात्र प्राकृतातील उपान्त्य स्वर मराठींत पुष्कळ स्थळी अंत्य झाला आहे. [ क्र० ५ ] उपान्त्यपूर्व

१ “ The Bhil Language of Marutha ”–C. V. Raval, Third Gujrati Sahitya Parishad, 1909 A. D.

२ “ Maharastri and Marathi ” Sten Konow.

३ हे आंकडे प्रकरण १ मधील परिच्छेदांचे आहेत.

स्वरांच्या भिन्न भिन्न प्रक्रिया होतात, [ क्र० ६ ] व त्या अपभ्रंशातील प्रक्रियेला धरून होतात. आद्याक्षरातील ' आ, ई, ऊ ' हे स्वर ऱ्हस्व करण्याकडे कल आहे. प्राकृतांतील स्वरान्तर्गत व्यंजनलोपामुळें निकट आलेले दोन वा अधिक स्वर प्राकृतअपभ्रंशात तसेच राहतात. परंतु यादव-मराठीनें या बाबतीत प्रगति केली आहे. निकट स्वरोच्चारांतील क्लिष्टता मराठीने पुढील तीन मार्गांनीं दूर केली आहे.

१ यश्रुति, वश्रुति

२ संयुक्त स्वर

३ दोन स्वराचे ऱ्हस्वीकरण

वरील तीन प्रकारांनी स्वराच्या लगडी एकसारख्या उच्चारण्याचे यादव-मराठी टाळते. ही उच्चारविषयक प्रगति होय. स्वराच्या ओष्ठ्यीकरण आणि तालव्यीकरण या प्रक्रिया नित्य आढळतात. संयुक्त स्वराची चर्चा वर केली आहेच. व्यंजनासंबंधी पाहता अल्पप्राणत्व आणि महाप्राणत्व या दोन्ही प्रक्रिया यादव-मराठींत आहेत. कण्ठ्य, दन्त्य, ओष्ठ्य व मूर्धन्य उच्चार अपभ्रंशाप्रमाणेच दिसतात. मात्र दंत्यतालव्य उच्चाराकडे अपभ्रंशापेक्षा अधिक ओढा दिसतो. यादव-मराठीत व्यंजनाचे मूर्धन्यीकरण बऱ्याच प्रमाणात स्थाननियत आहे. निकट र, स्वरान्तर्गत दन्त्य वर्ण, आणि आद्य व स्वरान्तर्गत न, ल यांमुळे मूर्धन्यीकरण झालें आहे. ' न, ण, म ' हीं अनुनासिकें अपभ्रंशाप्रमाणेच आहेत. ' श, ष, स ' या ऊष्म वर्णांचा कल बहुशः ' स ' कडेच आहे. संयुक्त व द्वित्त व्यजने साधी होऊन शब्दाचा तोल संभाळण्यासाठीं त्यांच्या मागील स्वर दीर्घ होतो. शिवाय भिन्न भिन्न संयुक्त व्यंजनाचे निरनिराळे प्रकार होतात. या, कांहीं स्थाननियत व कांही विशेष वर्णप्रक्रियांखेरीज व्यत्यय, स्वरभक्ति, स्वरागम, वर्णागम, सान्निध्यपरिणाम, स्वरलोप हे नेहमींचे वर्णप्रक्रियेचे उत्सर्ग यादव-मराठींत आढळतात. स्वरभक्ति विशेष प्रबल व व्यापक आहे.

तात्पर्य, यादव-मराठीची वर्णप्रक्रिया भाषाशास्त्राच्या सर्वसामान्य नियमांप्रमाणें व अपभ्रंशाच्या विशेष स्वभावाच्या रोखानें होतांना दिसेल.

## § १० यादव-मराठीची प्रत्ययप्रक्रिया

पुढें दुसऱ्या भागांत यादवकालीन मराठी भाषेतील नामांची व क्रियापदांचीं रूपें देऊन त्यांची संपूर्ण, सोपपत्तिक व ससदर्भ चर्चा केली आहे. त्यावरून या भाषेचें **प्रत्ययी-सामासिक असें मिश्र स्वरूप** कळून येईल. येथें त्या भागाचा आढावा घेतों.

नामांची तीन लिंगें सामान्यतः सस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंश यांच्या द्वारा आलेलीं आहेत. परंतु लिंगबदलाची अनेक उदाहरणें आढळतात (पहा क्र० १). पैकी बरींच नामाच्या अन्त्य स्वरावर अवलंबून आहेत. उदा० साखळें (नपुं०) < सं० शृंखला (स्त्री०). शब्दाच्या रूपावरून, विशेषतः त्यांतील अन्त्य स्वरावरून, लिंगनिश्चिति करण्याचा प्रकार पाहिला म्हणजे निसर्गसिद्ध व अर्थसिद्ध लिंग व्याकरणांतील लिंगाहून भिन्न असूं शकतें, याचा प्रत्यय येतो. यादव-मराठीतील वचनें दोन असून क्वचित् कोठें द्विवचन आढळतें. अशा द्विवचनाची दहा रूपें मी पुढें दिलीं आहेत, त्यांतील बरींच शुद्ध सस्कृत आहेत. अर्थात् त्यावरून द्विवचन यादवकाली होतें असा सिद्धान्त बांधणे योग्य नाही. अनेकवचन क्वचित् ठिकाणी प्रत्ययानें न साधता स्वतत्र शब्दाने साधलें आहे. हा भाषेचा सामासिक स्वरूपाकडील कल होय (क्र० २२).

नामविभक्तिप्रत्ययाचा विचार करता यादव-मराठीत प्रथमेपासून संबोधनापर्यंत आठहि विभक्त्यांची प्रत्ययी रूपें दिसतात. पैकी द्वितीया आणि प्रथमा या एकरूप आहेत. हा गुण मराठीने अपभ्रंशापासून घेतला. पंचमी विभक्तीचें प्रत्ययी रूप क्वचित् आढळते. बहुतेक पचमी शब्दयोगी अव्ययानें साधण्याचीच पद्धति आहे. म्हणजे पंचमी ही विभक्ति सर्वांत आधीं सामासिक बनली. एकविधता आणि अनुकरण या दोन प्रवृत्तींचा खेळ नामविभक्तींत अविरत व अखंड चाललेला दिसतो. पुल्लिंगी अकारान्त नामांची तृतीयेचीं कांही रूपे आकारान्त होतात. उदा० 'नवरसां, रामदेवां, मनुष्यां' (क्र० ५). या रूपाना आधार संस्कृतांत वा प्राकृतांत नाही. यादव-मराठीनें तीं सर्वस्वीं स्वतंत्र रीत्या बनविलीं. पुल्लिंगी अकारान्त नामांची चतुर्थी, पंचमी व षष्ठी या आंकारान्त आहेत. तेव्हां त्याचें अनुकरण करून तृतीयाहि

'आ'कारान्त रूपें करूं लागली. राजवाड्यांनीं तृतीयेच्या आकारान्त रूपांची चर्चा आधीं विशेष केलीच नाहीं; व जी कांही चर्चा ते करितात ती अशास्त्रीय आहे. चतुर्थी आणि षष्ठी याच्या रूपांत साम्य असलें तरी त्याच्या उपपत्तीत भेद आहे. एकविधतेची वृत्ति सप्तमी विभक्तीतहि दिसते. 'ई' या प्रत्ययाखेरीज 'आं' हा आणखी एक सप्तमीचा प्रत्यय यादव-मराठींत आहे, व हीं आकारान्त सप्तमीचीं रूपें शुद्धप्रत्ययी आहेत, सामासिक नव्हत. आ-कारान्त पुल्लिंगी नामाच्या सप्तमीच्या रूपावरून व अनुकरणाच्या नादानें अकारान्त पुल्लिंगी नामाची सप्तमीहि आंकारान्त झाली आहे. तात्पर्य, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी आणि सप्तमी या सर्व विभक्त्यांची रूपें एकच, म्हणजे **आंकारान्त** करण्याकडे कल आहे. मराठींतील सामान्यरूपाचीं बीजें या वृत्तीत, म्हणजे एकविधतेंत, अनुकरणांत आहेत, हें मीं पुढें दाखविलेंच आहे ( क्र० २४ ). असो. ज्ञानेश्वरींत ओकारान्त पुल्लिंगी नामें नाहीत; परतु महानुभाव ग्रंथात तीं आढळतात. उदा० 'वरो, डो, पो, दादो' ( क्र० ११ ). पुल्लिंगी नामाची ही चर्चा बव्हंशी नपुंसकलिंगी नामांनाहि लागू आहे. पुल्लिंगी अकारान्त नामाचा प्रथमेचा उकार नपुंसकलिंगातहि क्वचित् दिसतो, व तृतीया आणि सप्तमी यांचीं आकारान्त रूपें येथेंहि येतात. मात्र नपुंसकलिंगी अकारान्त नामांची प्रथमे-द्वितीयेचीं दोन्ही वचनाचीं रूपें पुल्लिंगी रूपाहून भिन्न करण्याचा गुण यादव-मराठीनें महाराष्ट्रीपासून घेतला, अपभ्रंशापासून नव्हे. कारण, अपभ्रंशात अनेकवचनी रूपेंच मात्र भिन्न आहेत ( क्र० १२ ). 'एं' कारान्त नपुं० नामें 'अक' या संस्कृतातील साधित प्रत्ययामुळे झाली आहेत. 'आ' कारान्त पुल्लिंगी नामाची उपपत्ति अशीच लावावी लागते. म्हणजे राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें या दोन प्रकारच्या नामाची सिद्धि सार्वनामिक प्रत्ययानें न होता, अन्त्यवर्णप्रक्रियेनें होते ( क्र० १५ ). एकविधतेने व साम्याभासाने स्त्रीलिंगालाहि सोडलेलें नाहीं. पुल्लिंगी नामाचा उकार स्त्रीलिंगातहि क्वचित् दिसतो. उदा० 'आशु, नम्रतु.' पुल्लिंगाप्रमाणें स्त्रीलिंगाचीहि काहीं तृतीयेचीं आंकारान्त रूपें आहेत. ही प्राकृत-अपभ्रंशात नसून यादव-मराठीनें हा प्रयत्न ('आं') लिंग व अन्त्य वर्ण याच्या उपाधिभेदातीत लावण्यास आरंभ केला.

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ४०

एकविधतेचा हा अति प्रबळ पुरावा होय. सप्तमीच्या 'सु' या प्रत्ययाची ओळख पुल्लिंग-नपुंसकलिंगामध्ये नाही. परंतु स्त्रीलिंगात क्वचित् आहे (क्र० २१). हा 'सु' प्रत्यय अपभ्रंशात 'हि' असा आढळतो. प्राकृतांत मात्र तो 'सुं' असा आहे. अर्थात् ही महाराष्ट्रीची छटा होय व ती स्त्रीलिंगातच केवळ दृश्यमान होते. तिन्ही लिंगी नामाच्या अनेकवचनाची अनुनासिक ही नियत खूण आहे. द्वितीयेपासून पुढे अनेकवचनात अनुनासिक नियमाने आढळतो. या अनुनासिकाचा फारशी व पल्हवी या भाषातील अनेकवचनी 'आन्' प्रत्ययाशी, राजवाडे मानतात त्याप्रमाणे, मुळीच संबंध नसून तो षष्ठीच्या 'णाम्,' द्वितीयेच्या अनेकवचनी 'आन्,' व नपुं० प्रथमेच्या अनेकवचनी 'आनि' या तिहींपासून उत्पन्न झाला आहे. एतावता, अनेकवचनातील अनुनासिकाचे मूळ पुल्लिंगी षष्ठी, द्वितीया व नपुं० प्रथमा या विभक्त्यांच्या अनेकवचनी प्रत्ययात आहे (क्र० २२).

वरील विवेचनाचा इत्यर्थ हा, की **नामांचीं प्रत्ययी विभक्तिरूपें अनुकरणाच्या वृत्तीमुळें एकविध बनत होतीं व एकमेकांपासून ओळखण्यास आणि कारकार्थ व्यक्तविण्यास असमर्थ होत होतीं.** विशेषतः, चतुर्थी, पचमी व षष्ठी या संदर्भावरूनच केवळ ओळखल्या जाव्यात इतका एकविधपणा त्यांच्या ठायी आला होता. प्रत्ययी विभक्तिरूपे जेव्हा अशा रीतीने सर्वसामान्य बनली, तेव्हां नवीन शब्दयोगी अव्ययाच्या साहाय्यानें विभक्त्यर्थ व्यक्त करण्याची पद्धति सुरू झालेली दिसते. ही शब्दयोगीसाधित विभक्तिरूपे प्रत्ययी नसल्याने साहजिकच ती होण्यापूर्वी नामाचे तृतीयेपासून पुढील विभक्तीत एक सर्वसाधारण असे रूप होई. हेच सामान्य रूप. या सामान्य रूपाच्या उपपत्तीतील मतमतान्तरें निर्देशून मी त्याची शास्त्रीय व ऐतिहासिक उपपत्ति लावण्याचा प्रयत्न केला आहे (क्र० २४). एकविधतेमुळें प्रत्ययी विभक्तिरूपाबरोबर सामासिक विभक्तिरूपे सुरू झाली, व या सामासिक विभक्तीलाहि आधार साहजिकच एकविधतेचा आहे. मात्र सामान्यरूपाच्या मुळाशी असणाऱ्या एकविधतेनें षष्ठी विभक्तीचें अधिष्ठान घेतलें आहे. षष्ठीचा सर्वसामान्यत्व हा एक स्वभावच असावा. तात्पर्य, केवळ एकविधता, किंवा केवळ षष्ठी विभक्ति यांपासून सामान्य रूपाची उपपत्ति लागूं शकत

नाहीं. दोहोंच्या समन्वयानें, म्हणजे **एकविधतेला षष्ठीचें अधिष्ठान लाभल्यामुळें सामान्यरूप दृढ झालें हें माझें विधान मीं पुढें सप्रमाण सिद्ध केलें आहे.** यादव-मराठीत शुद्ध शब्दयोगीबरोबर अर्धप्रत्ययात्मक विभक्तिरूपेंहि नित्य आढळतात ( क्र० २३ ). पैकी अर्धप्रत्ययात्मक विभक्ति ही वस्तुत: सामासिकच होय. परंतु उच्चारप्रक्रियेच्या ओघात मूळात शब्दयोगी म्हणून असलेली अव्यये विकृत होत होत प्रत्ययांसारखी दिसू लागलीं इतकेच. उदा०

सि < स० सहितम्

थे-ते < स० अर्थे

सि < स० आश्रे

तात्पर्य, हे प्रत्यय वाटले तरी मूळात ते सपूर्ण शब्द होते, हेच खरे.

यादव-मराठीत अशा प्रत्ययात्मक शब्दयोगींना निश्चित स्वरूप अद्यापि कसें आले नव्हते, हे षष्ठीच्या रूपावरून दिसेल. षष्ठीची चान्त, जान्त, सान्त व कान्त रूपें आढळतात. पैकी चान्त हीच सर्वत्र असून इतर तीन अति विरल आहेत. परंतु त्याचे अस्तित्व दुर्लक्षून चालणार नाही ( क्र० २३ षष्ठी ). राजवाडे एका चान्त रूपाखेरीज इतराचा निर्देश करीत नाहीत. डॉडेरेट एका जान्त रूपाचा मात्र करतो. या चारी तऱ्हेच्या रूपाची समग्र चर्चा करून यादव-मराठीतील विविधता मी पुढे दाखविली आहे. हीच विविधता शुद्धशब्दयोगी अव्ययांतहि दिसते. यादव-मराठीत खालील शब्दयोगी आढळतात ( क्र० २५ ).

प्रथमा, द्वितीया : वाचौनि, वेऱ्हीं, पर्यंत, सहित.

तृतीया : विण, हीन, सहित, सरिस, सवें, वाचौनि, करूनि, करवीं, वरि.

चतुर्थी : लागी–लागौनि, कारणें, प्रति, साठीं, दोषे, पासीं, पासाव, स्तव.

पंचमी : तव, लागी-लागौनि, पसि, पासाव, पासौनि, पाउनि, होउनि, हौनि.

षष्ठी : वरि, सकट, समोर, परौता, वाचौनिया, वारिया.

सप्तमी : आंतु, भीतरीं, माजि–मध्यें, माझारीं.

वरील शब्दयोगींपूर्वी प्रातिपदिकाचें बहुशः सामान्यरूप होतें. परंतु न झाल्याचीहि स्थळे आहेत. यावरून, सामान्यरूपाला प्रारंभ यादवकाळी झाला होता, परंतु तें नियमानें होईच असे मात्र नाही. नामविभक्तिप्रकरणावरून पुढील सिद्धान्त बांधता येईल—

**" यादव-मराठींत विभक्तीचीं प्रत्ययी आणि सामासिक अशीं दोन्ही स्वरूपें जोडीनें आढळतात. अपभ्रंशांतील प्रत्ययी विभक्ति आणि वर्तमान-मराठींतील सामासिक विभक्ति यांमधील हा एक सांधणारा दुवा आहे."**

सर्वनामांसबधी विचार करता. भाषेचें प्रत्ययी स्वरूप नामापेक्षा येथेच अधिक जागृत असलेले दिसतें. तसेच रूपाची विविधताहि येथे नामापेक्षां कितीतरी अधिक आहे. क्वचित् अर्थव्यक्तिहि अधिक विस्तृत दिसते. उदा० ' कवण ' या प्रश्नार्थी सर्वनामाला ' कोणताही ' असा अर्थ प्राप्त झाला आहे ( क्र० २६ ). ' आमच ' आणि ' आपल ' या दोन आत्मवाचक सर्वनामात यादव-मराठी कधी घोंटाळा करते. म्हणजे दोहोतील भेद स्पष्ट नाही. सर्वनामापासून सार्वनामिक विशेषणे सिद्ध झालेली दिसतात. उदा० " ऐस, एतुल, एतुक, एवढ, एउत, एसण, एसणाल "—' ए ' पासून. मराठीत सर्वनामे व सार्वनामिक रूपे अपभ्रंशापासून सिद्ध होतात. विशेषणे यादव-मराठींत विशेष्यनिघ्न व अविकृत अशा दोन्ही आहेत ( क्र० २८ ).

आख्यातविभक्तीकडे वळले म्हणजे संस्कृत धातु, प्राकृत धात्वादेश आणि देशी नामधातु यांपासून मराठी क्रियापदे बनलेली दिसतात ( क्र० २९ ). कांही वैदिक धातुहि आहेत. आख्यातविभक्तिरूपे यादव-मराठींत तीन प्रकारची होतात—

१ प्रत्ययी, २ कृदन्तसाधित, ३ संयुक्त.

प्रत्ययी रूपांत, पाणिनीच्या दशविध लकारांपैकीं " वर्तमाने लट्, आशंषि लोट्, भूते लङ्, विधिलिङ्, भविष्ये लृट्, " एवढे यादव-मराठींत आहेत.

भूते लुङ्, भूते लिट्, भविष्ये लुट् व हेतुहेतुमद्भावे लृङ् हेहि राजवाडे यादव-मराठींत आहेत असें मानतात. पैकीं लुङ् व लिट् यांचीं एकाकी रूपें सर्वथा त्याज्य होत, आणि लुट् व लृङ् हे प्राकृतातच लोपलेले लकार मराठीनें पुनः जिवंत करणे अशक्यप्राय होय ( क्र० ३१ ते ४० ). तात्पर्य, यादव मराठींत वर्तमान-भूत-भविष्य या काळाचीं आणि आज्ञा व विधि या अर्थाचीं प्रत्ययी रूपे आहेत. त्यातहि लट् हा वर्तमानाबरोबर क्वचित् भूत-भविष्यहि दाखवी ( क्र० ३१ ). लङ्ची रूपे लट्सारखीं होत; मात्र त्याची उपपत्ति भिन्न आहे. विधिलिङ्ची रूपे व क्वचित् अर्थ कर्मणि रूपांप्रमाणे होत ( क्र० ३७ ). संकेतार्थी रूपे होत तीं भविष्ये लुट्च्या प्रत्ययी रूपासारखीं भासत. इतकी, कीं राजवाडे यांच्या मते तीं लुट्चीच होत. लुट् हा ज्ञानेश्वरींत भविष्यार्थी व वर्तमान-मराठींत संकेतार्थी आहे हे राजवाड्यांचे विधान अशास्त्रीय कसे ठरते तें मी क्र० ३८ मध्ये दाखविलेच आहे. तसेंच राजवाडे ज्याला 'हेतुहेतुमद्भावे लृङ्' मानतात तो केवळ लट् आहे ( क्र० ४० ). **तात्पर्य यादव-मराठीनें अपभ्रंशाव्यतिरिक्त कोणतेंहि प्रत्ययी रूप स्वतंत्रपणें बनविलें नाहीं.** अपभ्रंशात वर्तमान, क्वचित् भूत, व भविष्य हे काल आणि विध्यर्थ व आज्ञार्थ हे प्रत्ययी रूपानी व्यक्तविले जात. अपभ्रंशातील ही रूपेंच यादव-मराठींत वर्णप्रक्रियेमुळे बदल होऊन आलीं आहेत. त्यांत आणखी काही लकारांची, म्हणजे प्रत्ययी रूपाची भर मराठीने टाकली नाहीं. **एवंच, अपभ्रंशांतील आणि यादव-मराठींतील प्रत्ययी आख्यातविभक्ति समसमान आहेत.**

अकरणरूप 'न, ना, आह-नाह, नको आणि झणें' यांनी व्यक्त होतें. प्रयोजक रूपें 'अव' या प्रत्ययानें आणि कधी धातूच्या उपधेस वृद्धि होऊन सिद्ध होतात ( क्र० ४३ ). कर्मणि व भावे रूपें साधण्याचे प्रत्यय 'ज, इज, प, पिज' असे विविध आहेत ( भाग ३ ).

येथवर प्रत्ययी रूपांची मीमांसा केली. परंतु एकंदरींतच यादव-मराठी ही प्रत्ययी आख्यातविभक्तीपेक्षां कृदन्तांचा किंवा धातुसाधितांचा उपयोग अधिक प्रमाणांत करते. नामविभक्तिसारखाच कांहींसा प्रकार येथें आहे. प्रत्ययी नामविभक्तिरूपें एकविध झाल्यामुळें शब्दयोगी अव्ययांची प्रथा

निघाली. तसेंच ' लट्, लङ् व लृट् ' हे लकार वर्तमान-भूत-भविष्यांतील सूक्ष्म भेद व्यक्तविण्यास असमर्थ होऊं लागल्यामुळे व इतर लकार लोपल्यामुळें अर्थव्यक्तीचें कार्य करण्यास कृदन्तांचा उपयोग अधिक प्रमाणात होऊं लागला. वर्तमाने लट् आणि भूते लङ् हे सारखेच दिसत. विध्यर्थ आणि कर्मणि यांचीं रूपें सारखीच होत. ' लुङ्, लिट्, लेट्, लुट् ' हे तर लोपलेच होते; तेव्हा काळ आणि अर्थ हे व्यवस्थित व्यक्त व्हावेत व त्याच्या सूक्ष्म छटाहि दिसाव्यात एवढ्याकरिता कृदन्ताचा व विशेषत: संयुक्त क्रियापदाचा वापर मराठी अधिकाधिक करूं लागली. पैकी कृदन्ताची प्रथा प्राकृत-अपभ्रंशात होतीच, ती मराठीने वाढविली. यादव-मराठीत वर्तमान-कृदते क्रियापदात्मक, विशेषणात्मक व क्रियाविशेषणात्मक अशी तीन प्रकारचीं आहेत. पैकी क्रियाविशेषणात्मक वर्तमान कृदन्ते ' आ ' कारान्त असून ती प्राकृतातील ' न्त ' व ' माण ' या वर्तमान कृदन्ताच्या दोन प्रत्ययाच्या समन्वयानें मराठीत आली अशी त्याची स्वतंत्र व नवीन उपपत्ति मी लाविली आहे ( क्र० ४५ ) हीं ' आ ' कारान्त कृदन्ते व्युत्पत्तिदृष्टया द्विमूलक असल्याने त्यात सामासिक आख्यातविभक्तीची बीजे स्पष्ट दिसतात. भूत कृदन्तात मराठीने प्राकृत-अपभ्रंशातील रूपांना ' ल ' स्वार्थे जोडिला आहे. अपभ्रंशात हा ' ल ' अगदीं नाहीं, व यादव-मराठीत तो नित्य आहे. अर्थात् हें भूतकाळाचे नियत चिन्ह म्हणून ठरून गेले. यादव-मराठीत हा ' ल ' लागण्यापूर्वीचें भूतकृदन्ताचे रूप अकारान्त, तकारान्त वा नकारान्त असते ( क्र० ४६ ) या कर्मण्यर्थी भूत-कृदन्ताबरोबरच कर्तरि-कृदन्तेंहि आढळतात. मात्र कर्तरि रूपाना प्राकृत-अपभ्रंशात आधार नाही. यादव-मराठीने ही रूपे परंपरेनें घेतली नसून स्वतंत्रपणें बनविलीं. कर्मणि भूत-कृदन्ताच्या प्रथमेच्या एकवचनाला लट्चा प्र० पु० ए० व० चा अनुस्वार लागून ही कर्तरि रूपें सिद्ध होत, ही नवीन उपपत्ति मीं पुढे मांडिली आहे ( क्र० ४७ ). अव्ययी भूत-कृदन्ताची किंवा ल्यबन्ताची अशीच स्वतंत्र उपपत्ति लावण्याचा यत्न मी केला आहे (क्र० ४८). संस्कृतातील त्वानम्, त्वीनम्, आणि प्राकृतांतील त्ताणं, तूणं या प्रत्ययांपासून मराठींतील ल्यबन्ताचा ' ऊन ' प्रत्यय निघाला. महानुभाव गद्यग्रंथांत हाच ऊन प्रत्यय ' ऊं ' असा आढळतो, तो वर्णप्रक्रियेचा एक खेळ होय इतकेंच. परंतु एकाच काळांतील भाषेच्या या दोन थरांतील

सूक्ष्म भेद व्यक्तविण्यास तो पुरे आहे. भविष्य-कृदन्ते ऊं (तुमन्त), आव (विध्यर्थी), ज (नामें), व आवेया या प्रत्ययानीं सिद्ध होतात. पैकी शेवटलें व्ययी आणि अव्ययी भविष्यकृदन्ताच्या जोडानें बनले आहे. ही उपपत्ति स्वतंत्र व नवीन असून तिला अपभ्रंश-ग्रंथांत आधार आहे (क्र० ४९).

वर दिलेल्या कृदन्तापासूनच **यादव-मराठीचें तिसरें म्हणजे सामासिक स्वरूप बनलें आहे.** या कृदन्तांना अस् व भू या साहाय्य धातूंची जोड होऊन संयुक्त क्रियापदे बनतात. यात मुख्य धातूचे कृदन्त व साहाय्य धातूचें आख्यातरूप असते. सयुक्त क्रियापदाची प्रथा सस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंश-अर्वाचीन आर्य भाषा या भाषिक परपरेत प्रथम यादव-मराठीत दिसते. अर्थात् प्राकृत-अपभ्रशात सयुक्त क्रियापदे आढळत नाहीत. यादव-मराठीने तीं प्रथम बनविलीं (क्र० ५१). आख्यात-विभक्तीतील सामासिक पद्धति म्हणून त्याचे महत्त्व विशेषच होय. याच सयुक्त क्रियापदापासून पुढे वर्तमान मराठीतील वर्तमान काळ सिद्ध झालेला दिसतो, व त्याचीं अति सूक्ष्म बीजेंहि ज्ञानेश्वरकाली आढळतात. तात्पर्य, यादव-मराठींत प्रत्ययी रूपे मागें पडत जाऊन त्यांची जागा सामासिक रूपें हळूहळू करीं घेत होतीं हे स्पष्ट होतें. अशाच सामासिक रूपावरून, म्हणजे वर्तमान कृदन्ताला 'हो' धातूचीं रूपे जोडून यादव-मराठीने संकेतार्थ बनविला. या सकेतार्थाचा पाणिनीय लुङ्शीं मुळीच संबध नसून तो सर्वस्वी सामासिक व मऱ्हाठी आहे, अशी नवीन उपपत्ति मी माडून दाखविली आहे (क्र० ५२). तिला अपभ्रंशांतहि आधार मिळतो.

निपात प्रकरण (क्र० ५४) यादव-मराठीने प्राकृत-अपभ्रंशद्वारा घेतले व विस्तृत केलें; यादव-मराठीतील निपात चार तऱ्हांनीं सिद्ध होतात.

१ विभक्तिरूपापासून
२ सर्वनामापासून
३ प्राचीन निपातापासून
४ निपातात्मक शब्दांपासून

यांची समग्र व ससंदर्भ चर्चा पुढें आली आहे. 'नर' हे पादपूरक (क्र०५५) 'ऐसांही' हे उभयान्वयी (क्र० ५७), 'मग-आता', 'झिन्न', 'मा'

हे निपात ज्ञानेश्वरीव्यतिरिक्त महानुभावी ग्रंथात आढळतात. एकंदरीत यादव-मराठी निपातांनी संपन्न आहे, व यातील बरेच तिनें अपभ्रंशद्वारा न घेता स्वतंत्रपणें साधिले आहेत.

## § ११ यादव-मराठीची शब्दसिद्धि

यादव-मराठीची शब्दसिद्धीची शाखा सपन्न व विविधतापूर्ण आहे. या प्रकरणाची समग्र चर्चा पुढे भाग ३ मध्ये केली आहे. त्यावरून शब्दसिद्धीचे खालील विशेष प्रकार आढळतात—

१ तद्धितप्रक्रिया
२ नामधातु व क्रियानामे
३ ध्वन्यनुकारी शब्द
४ सादशब्द
५ द्विरुक्त शब्द
६ सामासिक शब्द

या सहा प्रकारापैकी तद्धितप्रक्रिया, नामधातु, ध्वन्यनुकारी व द्विरुक्त शब्द हे यादव-मराठीने अपभ्रंशद्वारा परंपरेनें घेतले. सादशब्द व सामासिक शब्द मात्र परंपरेनें न येता तिनें परभाषाच्या–विशेषतः द्राविडीच्या–संपर्कानें बनविले. यादव-मराठीतील सादशब्दावर व सामासिक शब्दावर अद्यापि कोणीं कांहीं लिहिले नाहीं. शब्दसिद्धीचे इतर प्रकार अपभ्रंशात असले तरी मराठीनें तद्धितप्रत्ययाची संख्या पुष्कळ वाढविली, नामधातुहि वाढले, आणि ध्वन्यनुकारी शब्दाचा अपभ्रंशातील अतिरेक मराठीने सोडला. तात्पर्य, अर्थाच्या विविध छटा व्यक्तविण्यास समर्थ अशी शब्दसिद्धि यादव-मराठी करते.

## § १२ प्रयोग, वाक्यरचना, वाक्प्रचार, अर्थप्रक्रिया

यादव-मराठीत कर्तरि, कर्मणि व भावे हे तीन प्रयोग असून एका कर्मणीचे पांच विविध प्रकार आहेत. त्यांचा निर्देश राजवाडे व प्रो० ब्लोक यांपैकीं कोणीहि करीत नाहीत. भावे प्रयोगाचाहि वर्तमान मराठीत नसलेला असा एक विशेष प्रकार तत्कालीं होता. त्यांत उद्देश्य हें तृतीयान्त असून पूरक हें सदा आंकारान्त असते. तसेंच यादव-मराठींत सति सप्तमी व सता तृतीया

नित्य, आणि सते चतुर्थी क्वचित् आढळते. हा गुण प्राकृत-अपभ्रंशद्वारा आला. वाक्यरचना सर्वस्वी संस्कृतच्या धर्तीवर असून क्वचित् कोठे तृतीयान्त कर्ता व कर्तरि क्रियापद, आणि प्रथमान्त कर्ता व कर्मणि क्रियापद अशी विकृत रचना आढळते. परतु अति विरल. एकदरीत विभक्त्यांची कारकें व रचना सस्कृत-प्राकृताप्रमाणेच आहेत. वाक्प्रचार, म्हणी, भाषेच्या विशेष लकबी या सर्व दृष्टींनी यादव-मराठी सुसपन्न असून वाक्प्रचाराचा थाट विशेषतः महानुभावी गद्यात दिसतो.

## § १३ यादव-मराठीवरील परभाषांचे परिणाम

यादवकाली मराठीचा कानडीशी किती निकटचा सबध आला, आणि तत्कालीन मराठीभोवती द्राविडी भाषाचे वातावरण किती व्यापक होतें, याचा सविस्तर विचार मी भाग ४ मध्ये केला आहेच. असे दिसते, कीं यादवकालीन महाराष्ट्राच्या सीमा आजच्याहून भिन्न असाव्यात. भाषा कानडी तर लिपी देवनागरी, व भाषा मराठी तर लिपी कानडी असले प्रकार तेव्हाच्या पाच शिलालेख्यात आढळतात (भाग ४–१). यादव-कालीन विठ्ठल-सप्रदाय, त्याचे विठ्ठल हे आराध्य दैवत, मूर्ति आणि क्षेत्र ही सारी मूळात कर्नाटकीय असल्याची साक्ष महाराष्ट्र कवि व कन्नड विद्वान् देतात. तेव्हा अनेक बाबतीत या दोन समाजात देवघेव होत असता, भाषेच्या बाबतीतही ती झाली असावी असा संभव दिसतो, आणि या प्रकरणी यादव मराठीत पुरावा मिळतो, तो असा—

१ **शाब्दिक**—यादव-मराठीने कानडीपासून अनेक शब्द साक्षात् व काही संस्कृत–प्राकृतद्वारा घेतले. असेच काही तामीळ व तेलगू या भाषांतूनहि आलेले दिसतात. त्याच्या समग्र याद्या भाग ४ मध्ये ससदर्भ दिल्या आहेत. द्राविडी भाषातील पुढील शब्द यादव-मराठीत आहेत.

कानडी शब्द ( शिलालेखात ) ............५
कानडी शब्द ( ग्रंथांत )........... ...१०० सुमारे
तामीळ शब्द ( ग्रंथांत )............... २ ,,
तेलगू शब्द ( ग्रंथांत )............... [illegible]

एकूण साधारण

हे शब्द ग्रंथांतील आहेत. यादी अपूर्ण असली तरी शाब्दिक उसनवारीची कल्पना येईल.

२ **वर्णप्रक्रिया**—पुढील बाबी मराठीनें द्राविडीपासून उचलल्या असें मानण्यास पुरावा आहे.

( अ ) य-व या अर्धस्वरांचें प्राचुर्य

( आ ) मूर्धन्य ळ[1] ( प्राकृत-अपभ्रंशद्वारा )

( इ ) शुद्धतालव्याचे दन्त्यतालव्य उच्चार

३ **प्रत्ययप्रक्रिया**—दोन भिन्न भाषांच्या निकट सहवासाने केवळ शाब्दिक देवघेवच होते असे नसून भाषेच्या सांगाड्यावरहि त्याचा परिणाम होऊं शकतो हे यादव-मराठीच्या व्याकरणांतील पुढील द्राविडी अंश तपासून दिसेल.

( अ ) कर्मणि रूपाचे दोन अर्थ–एक साधा व दुसरा विध्यर्थ-पैकी पहिला प्राकृत-अपभ्रंशद्वारा ' इज्ज ' या कर्मणि प्रत्ययापासून, व दुसरा द्राविडीच्या संसर्गाने अपभ्रंशकालींच आला.

( आ ) मूळ धातूच्या कृदन्ताशी ' येणे ' या साहाय्य धातूचे अकरण-रूप जोडून विध्यर्थाचे अकरण-रूप दाखविणे.

याखेरीज कांही बाबी द्राविडीचा परिणाम म्हणून द्राविडी भाषांचे अभ्यासक सांगतात. त्या तशा नाहीत असें मी सिद्ध केले आहे. माझ्या मतें त्या सर्वस्वी आर्य होत ( भाग ४, क्र० ३ ).

४ **वाक्यरचना, शब्दसिद्धि**—

( अ ) ' म्हणौनि ' या भूत कृदन्ताचा उभयान्वयी निपातासारखा विशेष उपयोग ( कानडी ' एंदु ' व तामीळ ' एन्रू ' ).

( आ ) ' कवाड घालणें ' हा वाक्प्रचार.

---

१ मूर्धन्य 'ळ' टार्टर किंवा फिनिश भाषांतून द्राविडीद्वारा इंडो-आर्यनमध्यें आला असावा. पहा—Mr. Norris's paper on " The Language of the Scythian Tablets of Behistun. " डॉ. बुल्हेर यांचें मत डॉ. कॉल्डवेल किंवा नॉरिस यांच्या-विरुद्ध आहे. पहा—Madras Journal of Literature, 1864 ( pp. 116-136 )

(इ) 'सादशब्द' वापरण्याची प्रथा.

(ई) सामासिक शब्द–ही प्रथा द्राविडीची नव्हे. परंतु द्राविडी शब्द अनेक आल्यामुळे मराठीनें काही सामासिक शब्द (आर्य+द्राविडी) बनविले.

भाषेच्या वरील चार प्रकरणात द्राविडीचा संपर्क यादव-मराठीला लागला. याखेरीज ९ फारशी व ३ ग्रीक शब्द यादव-मराठीत आहेत. पैकी फारशी शब्द साक्षात् व ग्रीक शब्द सस्कृत-प्राकृतद्वारा आले. यादवकाली मराठीला फारशीचा सपर्क अगदी नव्हता अशी राजवाड्यासारख्याची समजूत आहे, ती वरील नऊ फारशी शब्दानी लोपेल.

वर सांगितलेल्या द्राविडी शब्दाखेरीज आणखी कितीतरी शब्द सस्कृतात द्राविडीतून आले असे डॉ० काल्डवेल[१], डॉ. गुडार्ट[२], डॉ. किटेल[३] वगैरे विद्वान् आपापल्या निबधात सागतात. परंतु हा प्रश्न सस्कृताच्या प्रातातील असल्याने येथे चर्च्य नाही. शाब्दिक ऋण सोडले तरी व्याकरणाबाबत आधुनिक इडो-आर्यन आणि विशेषतः मराठी, बऱ्याच बाबीत द्राविडीचे अनुकरण करिते असे वरील पंडिताचे व प्रो० जागिरदार[४] याचे आग्रहाचे म्हणणे आहे. या प्रश्नाचा निरग दृष्टीने अभ्यास झाला पाहिजे. डॉ० काल्डवेल आणि प्रो० जागिरदार याच्या काही बाबी मी पुढे साधार खोडिल्या आहेत. प्रो० जोशी यांनी दिलेली ज्ञानेश्वरीतील कानडी शब्दाची यादी ही उपयुक्त असली तरी तितकी शुद्ध नाही. उदा० परि (सं० पर्याय); पवाडे (सं० प्रवाद); परिया (स० परि + इ); हे शब्द सस्कृत व अस्सल आर्य असून त्यानी द्राविडी मानले आहेत. प्रो० उपाध्ये[५] याच्या यादीचाहि उपयोग एतत्प्रकरणी बराच आहे.

---

१ Comparative Grammar of Dravidian Languages — Part VII, Glossorial Affinities.

२ Dravid an Element in Sanskrit: J. G. O. S. 1869

३ Some borrowings by Sanskrit from Dravidian. Ind. Antiquary, 1872

४ Seventh Oriental Conference, Baroda. 1933.

५ A. N. Upadhye: Kanarese Words in Desi Lexicons: Annals of B. O. R. I. Vol. XII

वर्तमान मराठीतील एकदोन वाक्प्रचार मूळचे द्राविडी असावेत असें दिसतें. यादव-मराठींत ते आढळत नाहींत. अर्थात् यादवोत्तर कालीं ते मराठींत रूढ झाले. पैकीं पहिला 'गंगेंत घोडें न्हाणें' हा होय. वासुदेवशास्त्री खऱ्याच्या मतें हा वाक्प्रचार शिवकालीन होय. मराठीत तो तसा असेल; परंतु कानडींत तो इ० स० ९४१ च्या सुमारास पंप कवीने लिहिलेल्या 'विक्रमार्जुनविजय' या काव्यात आढळतो. पंप म्हणतो—

"गंगावार्धियो लात्मतुरंगमभिसिसि नेगळुद" – श्लो० ३८ (तो आपल्या घोड्याना गंगानदीचे स्नान घालून प्रख्यात झाला.)

"गाढवाचा नांगर फिरणें" हा दुसरा वाक्प्रचार होय. हरिभद्रि व हेमचंद्र या जैन ग्रंथकारांनी आपल्या अनुक्रमें 'आवश्यकवृत्ति' व 'वीरचरित्र' या ग्रंथात तो वापरला आहे. हा मध्ययुगीन उल्लेख झाला. याच्याहि पूर्वीचा पुरावा 'खारवेलच्या हाथीगुंफा' येथील लेखात मिळतो. (इ० स० पूर्वी साधारण २०० वर्षें). या दोन वाक्प्रचाराकरिता मी श्री० ग० ह० खरे यांचा आभारी आहें.

असो. तात्पर्य, परकीय भाषाचा, विशेषतः द्राविडीचा, परिणाम यादव-मराठीवर शब्दकोश आणि वर्णप्रक्रिया या बाबांत अधिक आढळतो. प्रत्ययप्रक्रियेवर त्या मानाने तो फारच अल्प आहे.

## § १४ यादव-मराठीची घटना

कोणत्याहि भाषेची घटना तिच्यातील शब्दप्रकारावरून ध्यानात येते. प्राकृत, अपभ्रंश व वर्तमान आर्य भाषात तीन प्रकारचे शब्द आढळतात.

१ तत्सम,
२ तद्भव,
३ परकीय.

यांचें प्रमाण कळले तर त्या त्या भाषेची घडण उकलण्यास मदत होते. म्हणून पुढें यादव-मराठीसंबंधीं ही चर्चा करतों. नमुने मुद्दाम भाषेच्या निरनिराळ्या थरांतून निवडले आहेत. शिवाय त्यांत कोठें तांत्रिक स्वरूपाचा

१ भा० इ० सं० मं०, षष्ठ संमेलनवृत्त, पा० ६८
२ एपिग्राफिया इंडिका, व्हॉ० २०, पा० ४४ व ७९

माग येऊं दिलेला नाहीं. कारण तांत्रिक उताऱ्यात संस्कृत शब्दांचें प्रमाण अवास्तव असतें. एतावता, सर्वसामान्य वेंचे घेऊन त्यातील शब्दघटनेचें प्रमाण देतों व शेवटी या सर्व थराच्या समालोचनाने एकंदर यादव-मराठींतील शब्दाचे भेद शेंकडेवारी देतो—

**१ श्रीज्ञानेश्वरी** ( नागर पद्य ) **अध्याय ९**

"तरि अवधान एकले देइजे । मग सर्व सुखासि पत्र घेइजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझे । उघड आइका ॥ १ ॥
परि प्रौढी न बोले हो जी । तुम्हा सर्वज्ञाचा समाजीं ।
देया अवधान म्हणे हे माझी । विनवणी सलगी ॥ २ ॥
का जे ललेयाचे लले सरति । मनोरथाचे मनौरे पुरति ।
जरि माहेरे श्रीमंते होति । तुम्हा ऐसीं ॥ ३ ॥
तुमचेया दीठिवेयाचिये खोले । सासिनले प्रसन्नतेचे मले ।
ते साउली देखौनि लोले । श्रांतु जी मी ॥ ४ ॥
तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणौनि आपुलिया सवें बोल्हावों लाहों ।
आणि एथहि सलगी करु जरि बिहों । तरि निवो के पा ॥ ५ ॥
आणि बालक बोबडा बोलीं । का वाकुडा विचुकीं पाउली ।
चोज करूनि माउली । रिझवी जेवि ॥ ६ ॥
तेवि तुम्हा संताचा पढियो । कैसेनि तऱ्ही आम्हावरि हो ।
इया बहुवा अढुकी जा आहो । सलगी करित ॥ ७ ॥
वाचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवादृश श्रोते ।
काइ धडेयावरि सारस्वते । पढो सिकिजे ॥ ८ ॥
अवधारा आवडे तेसणा धुधुरु । परि महातेजा न मिरवे काइ करुं ।
अमृताचा ताटीं वोगरुं । ऐसि रसोये कैंची ॥ ९ ॥
हा हो हिमकरा वीजणे । किं नादापुढा आइकवणें ।
लेणेयांसि हे लेणे । केहीं आहे" ॥ १० ॥

**तत्सम शब्द**: अवधान, एकलें, सर्वसुखांसि, पत्र, प्रतिज्ञोत्तर, परि, प्रौढी, न, सर्वज्ञाचा, समाजी, मनोरथ, श्रीमंत, प्रसन्नता, श्रांतु, सुखामृत, बालक, संत, बहु, योग्यता, भवादृश, श्रोता, सारस्वत, अवधारा, महातेज, अमृत, हिमकर, नाद, धुंधुरु.

**तद्भव शब्द:** तरि, देइजे, मग, घेइजे, हे, माझे, उघड, आइका, बोलें, होजी, तुम्हा, देया, म्हणे, विनवणी, सलगि, कां, जे, सरति, पुरति, मनौरे, जरि, माहेरें, होति, ऐसी, दिठी, सासिन्नले, मळे, ते, साउली, देखौनि, लोले, जी, मी, आपुलिया, सवे, वोल्हावों, लाहों, आणि एथही, करु, विहों, निवो, के, पा, बोली, वाकुडा, पाउली, माउली, रिझवी, जेवि, तेवि, पढियो, कैसेनि, हो, इया, अलुकी, आहों, वाचूनि, काइ, धडेयावरी, पढो, सिकिजे, आवडे, तेसणा, मिरवे, ताटी, ऐसी, रसोये, कैंची, वीजणे, हाहो, आइकवणे, लेणे, केही.

**देशी व इतर शब्द :** खोले, डोहो, बोबडा, चोज, वोगरु, विचुकी.

**प्रमाण** : तत्सम शेकडा २३

तद्भव ,, ६४

इतर ,, ४॥

२ **दृष्टान्तपाठ**—दृ० ९८ वा ( लौकिक गद्य ).

"कव्हणी एकि लेकुरवाळी माता असे : ते कव्हणी लेकरु काइसेनि बुझावी : कव्हणी लेकरु काइसेनि बुझावी : एक ते काइसेनिही बुझावे ना : तेयासि तीची कडेचि होआवी : ते म्हणीयाचेनि लाहे झडती नीगे : ते देखे : तवं पाठी धावे : न देखे तेथचि लोळणि घाली : मग सेजीया साइलीया असति तीया तेयातें बुझाउं रीगति : ते तयांचे तोंड पाहे इतुलेनि ते तयाचेनि न बुझावे : मग ते म्हणे हे कव्हणाचेनिही न बुझावे : मग म्हणीये सारूनि झडती ये : पाटाउवाचेनि पालवे लाळ संबुड पुसौनि कडीए घेउनि स्तनपान दे।"

**तत्सम** : एकि, माता, असे, ना, स्तनपान.

**तद्भव** : कव्हणी, ते, कांइसेनि, बुझावी, तेयासि, तीची, कडेचि, होआवी, म्हणीयाचेनि, लाहे, झडती, नीगे, देखे, तवं, पाठीं, धांवें, तेथचि, लोळणी, घाली, मग, सेजीया, साइलीया, रीगति, तोंड, पाहे, इतुलेनि, म्हणे, सारूनि, ये, पाटाउवाचेनि, पालवें, लाळ, पुसौनि, घेउनि, दे, संबुड.

**इतर** : लेंकरु

**प्रमाण** : तत्सम शेंकडा १२
तद्भव ,, ८६
इतर ,, २

३ **पूजावसर** ( नित्यदिनीलीळा ) नागर गद्य :

"बाईसे : भीतरिला ओटेआवरी : आसनु रचीती : आड कानवडा लावीती : ताट वरीती : गोसावी भीतरी बीजे करौनि : आसनीं उपविष्ट होती : बाइसे निबलोणु करीती : तंवं सर्वज्ञा आरोगणा होए: पौळी तर चौतकोरु : माडा तर दीढ : पुरी तर एकि : तुप भातु कढी: दोनि शाकवतिआ : पहितु धृतु : पाठी तक्रभातुसी : सर्वज्ञाची श्रीमंत सकुमारु आरोगणा होए : मग गोसावियासि गुळणा होए : श्रीकर प्रक्षालन होए : आन सर्वज्ञाचा श्रीकरी चंदन ओळगवीती : चदने दोनि श्रीकरे उलळीती : श्रीकरी सपूरदाहवा ओळगवीती : श्रीकर परमार्जीती : भट्ट : गोसाविआचेआ श्रीकरीं सकर्पूरा फोडीं ओळगवीती : वीडिआ करौनि देती : गोसावी भट्टाचा हातु धरौनि : आरोग्य वाउली शतपदीं वेढें करीती : बाइसे ओटा झाडीती : पद्मासनु असें तें शयनासनु रचीती : पुहुडु स्वीकारीती।"

**प्रमाण** : तत्सम शेंकडा ३१
तद्भव ,, ६२
इतर ,, ६ ( आरोगणा, माडा, तुप, ओळगवीती )

४ **पाटण शिलालेख : इ० स० १२०८**

"**इयां पाटणीं जें केणें उघडे तेहाचा आसि आउं जो राउला होता ग्राहकापासी तो मढा दीन्हला। ब्राह्मणा जे विक्रतेयापासीं ब्रह्मोत्तर तें ब्राह्मणीं दीन्हलें। ग्राहकापासीं दामाचा वीसोवा आसूपाठीं गनरें दीन्हला। तुलदाइया बैला सिद्धवै। बाहीरिला आसूपाठीं–गिधवें ग्राहकापासीं। पांच पोफली ग्राहकापासीं। पहिलेआ घाणेआ दाणाची लोटि मठा दीन्हली। जेती घाणे वांहती तेतीयांप्रति पली पली तेला। एथ जे मविजे ते मढीचेन मापें मवावें। मापाऊं मढा अर्द्ध मापहारी।**

रूपाचें सूंक तथा भूमिः । चतुराघाट विशुद्ध ओडुग्रामु पषड वालेआ कामतामध्यें चहवंटा । एकलवंटा । पंडितांचा कामतु ।"

| | | | |
|---|---|---|---|
| **प्रमाण :** | तत्सम | शेंकडा | २५ |
| | तद्भव | ,, | ७५ |
| | इतर | ,, | ४ |

वर यादव-मराठीचे चार थर पाहिले. त्यांत, नागर पद्यांत म्हणजे श्रीज्ञानेश्वरींत तत्सम शब्द सर्वांत अधिक, तर लौकिक गद्यात म्हणजे दृष्टान्त-पाठांत ते सर्वांत कमी आहेत. शिलालेखांत तत्सम बरेच आहेत. तद्भव शब्द लौकिक गद्यांत सर्वांत अधिक येतात. देशी शब्द मुख्यतः कानडींतून आलेले आहेत. भाषेचे हे चार थर विचारांत घेऊन यादव-मराठींतील शब्दाची शेंकडेवारी पुढें देतों—

| **यादव-मराठींतील शब्द :** | तत्सम | तद्भव | देशी व इतर |
|---|---|---|---|
| शेंकडा | २३ | ७२ | ५ |

## § १५ यादव-मराठी आणि अपभ्रंश

येथवर प्राकृत अपभ्रंशाचा इतिहास, आणि यादव-मराठीची वर्णप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, शब्दसिद्धि, वाक्प्रयोग आणि तत्सम, तद्भव व देशी शब्दाचें शेंकडा प्रमाण इत्यादि गोष्टींचा आढावा घेतला. त्यावरून आतां महाराष्ट्री-अपभ्रंश आणि यादव-मराठी यातील दुवा नीट जुळवून दाखवितां येईल. तो जुळवितांना जैन-अपभ्रंशाचाच आधार मी घेत आहें मागें हा जैन-अपभ्रंश म्हणजेच महाराष्ट्री-अपभ्रंश असें प्रतिपादिले असल्यानें येथें त्याचा आणखी विस्तार करीत नाहीं. एका भाषेचा दुसरीशी दुवा जोडतांना वर्णप्रक्रिया आणि प्रत्ययप्रक्रिया हींच भाषेचीं दोन अंगें मुख्यतः तपासावीं लागतात. शब्दसिद्धि व वाक्प्रयोग इत्यादि बाबींना त्या मानानें महत्त्व कमी. डॉ० काल्डवेलनें जे उद्गार परभाषेच्या परिणामासंबंधीं[१] काढले आहेत, तेच एकंदर भाषेच्या स्वभावालाहि लागू पडतात. ते असे—

१ Dr, Caldwell : "Comp. Grammar of Dravidian Langs." pp. 452

"Declensional and conjugational forms are the bones and sinews of language, and retain for ages both their shape and their significance. Hence comparative vocabulary is inferior to comparative grammar."[1]

तेव्हां यादव-मराठीच्या कोणत्या घटनाविषयक बाबी **महाराष्ट्री–अपभ्रंशापासून साक्षात् निघाल्या** तें पुढें सांगतों—

## § १६ उच्चारप्रक्रिया

यादव-मराठीची उच्चारप्रक्रिया म्हणजे अपभ्रंशातील उच्चारपद्धतीचीच उत्क्रांत अवस्था होय. अपभ्रंशातील स्वर व व्यंजनें यादव-मराठींत उतरली असून त्याखेरीज 'ऐ' व 'औ' हे संयुक्त स्वर स्वरांतर्गत व्यंजनलोपामुळें उत्पन्न होणाऱ्या स्वराच्या संयोगाने झालेले आहेत. अर्थात् ही अपभ्रंशाच्या पुढची पायरी होय ( भाग १, क्र० १ ). अपभ्रंशांतील 'च, छ, ज, झ' याचे दंत्यतालव्य उच्चार यादव-मराठींतहि आले. संयुक्त वा द्वित्त व्यंजनाच्या ठिकाणी साधें व्यंजन येऊन शब्दाचा तोल साभाळण्यासाठीं मागील स्वर दीर्घ होण्याची प्रक्रिया अपभ्रंशांत नाही. यादव-मराठींत नित्य आहे. परंतु हा भेद नसून ही उच्चारविषयक उत्क्रांति म्हणजेच उच्चारप्रक्रिया आहे. एतत्प्रकरणी **पुढील बाबी यादव-मराठीनें साक्षात् अपभ्रंशापासून घेतल्या.**

१ संस्कृत 'ऋ'च्या 'अ, इ, उ' या प्रक्रिया.

२ स्थाननियत स्वरप्रक्रिया.

३ अंत्य स्वरांचें ऱ्हस्वीकरणः अपभ्रंशाची ही विशेष लकब यादव-मराठींत पुष्कळ अंशानें दिसते. वर्तमानआर्यभाषांतील बहुतेकींतून अंत्यस्वरलोप आढळतो. परंतु यादव-मराठींत 'इ' आणि 'उ' हे अपभ्रंशांतील अंत्य स्वर विकल्पानें कायम आहेत व 'अ, आ, इ' या अंत्य स्वरांचाच काय तो लोप झालेला आहे. वर्तमान दक्षिण कोंकणींतहि अंत्य स्वर ऱ्हस्व रूपानें आज कायम आहेते. तात्पर्य, यादवोत्तर कालीं शिष्ट मराठींत अंत्यस्वरलोप सुरु झाला. यादवकालीं अपभ्रंशाचा छाप स्वच्छ दिसतो ( भाग १, क्र० ४ ).

१ Linguistic Survey of India, Vol. VII, p. 188.

४ संस्कृतातील संयुक्त स्वरांचा ऱ्हस्व स्वर होणें वा विश्लेष होणें हे अपभ्रंशांतील दोन्ही प्रकार यादव-मराठीत आहेत. ( ऐ > ए–अइ; औ > ओ – अउ ).

५ आद्य ' उ ' व ' ओ ' या स्वराचा क्वचित् लोप.

६ दोन निकटवर्ती ' अ ' स्वरांचा संधि.

७ ' य ' श्रुति आणि ' व ' श्रुति.

८ नामें व्यंजनान्त न ठेवता स्वरान्त ठेवण्याची पद्धति.

९ अल्पप्राण व्यंजनलोप व महाप्राण व्यंजनाच्या जागी ' ह ' असा आदेश होणें.

१० आद्य व्यंजनें बव्हंशीं अविकृत राहणें.

११ कठोर व्यंजनें मृदु होण्याची प्रक्रिया.

१२ य > ज

१३ अंत्य व > उ

१४ म > व

१५ श > स; स > स; ष > छ, ख

१६ संस्कृतांतील आकारान्त नामें अपभ्रंशाप्रमाणें मराठींतहि अकारान्त होतात.

१७ स्वरभक्तीचें प्राबल्य.

१८ आद्य व मध्य संयुक्त व्यंजनांची प्रक्रिया अपभ्रंशाप्रमाणें होते.

१९ ' क्ष, ज्ञ, त्य, त्स, द्य, स्थ, स्म, ष्ण, ध्व, ध्य, त्स्य ' या संयुक्त व्यंजनांच्या अनुक्रमें ' ख–झ, ण, च, च्छ, ज, ठ, स, म्ह, न्ह, झ, झ्झ, छ ' अशा प्रक्रिया.

तात्पर्य, यादव-मराठींतील उच्चार अपभ्रंशांतून वर्णप्रक्रियेच्या नियमांनीं उतरले आहेत. अंत्य स्वराचा अंशतः लोप व अंशतः ऱ्हस्वीकरण म्हणजे अपभ्रंश व यादव-मराठी यांतील एक निश्चित दुवा होय.

## § १७ नामविभक्ति

यादव-मराठीनें नामांचीं व सर्वनामांचीं प्रत्ययी विभक्तिरूपें अपभ्रंशापासूनच घेतलीं आहेत. अपभ्रंशांत जे नामविभक्तीचे प्रत्यय होते तेच

परिणत स्वरूपांत यादव–मराठींत दिसतात. अपभ्रंशांत नामविभक्ति केवळ प्रत्ययी स्वरूपाचीच आहे. पुढें यादव–मराठींत सामासिक म्हणजे शब्द-योगीसाधित नामरूपांना आरंभ झाला. अर्थात् सामासिक रूपें बनविण्याची पद्धति अपभ्रंशापासून वा कोणत्याहि इतर भाषेपासून न येतां ती यादव–मराठींतीलच अंतर्गत परिस्थितीमुळें नवीन उत्पन्न झाली. अपभ्रंशांत नामाचे जे लिंगबदल दृष्टीस पडतात ते पुढें मराठींतहि उतरले. एतत्प्रकरणीं ज्या विशेष लकबा अपभ्रंशातून आल्या त्या देतों—

(१) पुल्लिंगी अकारान्त नामांच्या प्रथमेचा एकवचनी ‘उ’कार. त्याचप्रमाणे अपभ्रंशांत क्वचित् आढळणारा ‘ओ’ कार.

(२) पुल्लिंगी अकारान्त नामांच्या प्रथमेच्या अनेकवचनी प्रत्ययलोप करण्याची पद्धति. जसें—

प्रा० पुत्ता > अप० पुत्त > म० पूत.

(३) प्रथमेसारखीच द्वितीयेची रूपे करण्याचा गुण. महाराष्ट्रीत द्वितीयेचीं रूपें प्रथमेहून भिन्न आहेत. अपभ्रंशात व यादव-मराठींत सारखीं आहेत.

(४) तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी व संबोधन यांची प्रत्ययी रूपें व प्रत्यय.

(५) पुल्लिंगी अकारान्त नामाखेरीज इतर ठिकाणींहि ‘उ’कार जोडण्याचें प्राबल्य. हें अपभ्रंशातहि होतेच. उदा० “एत्थु, जेत्थु, तेत्थु, जासु, तासु.” ( भविसयत्तकहा )

(६) अकारान्त नपुंसकलिंगी नामांचीं प्रथमे–द्वितीयेखेरीज इतर विभक्त्यांचीं रूपें पुल्लिंगी नामांसारखीं करण्याचा गुण.

(७) इकारान्त व ईकारान्त स्त्रीलिंगी नामातील भेद अपभ्रंशात नाही, तसाच तो यादव-मराठींतहि नाहीं.

(८) अनेकवचनाची अनुनासिक ही जी नियत खूण यादव-मराठींत आहे तिचीं सूक्ष्म बीजें अपभ्रंशांतच तृतीया, षष्ठी आणि सप्तमी यांच्या सानुनासिक अनेकवचनी रूपांत आहे. तात्पर्य, मराठींतील अनेकवचनी अनुनासिक अपभ्रंशद्वारा आलें. ( भा० २, क्र० २२ )

(९) यादव–मराठींतील विभक्तिरूपांचा एकविधतेकडील कल अपभ्रंशकालींच अंधुक अंधुक दिसतो. अपभ्रंशांत चतुर्थी, पंचमी आणि षष्ठी या विभक्त्यांचीं रूपें बरींचशीं एकविध झाली होतीं. तसेंच, अपभ्रंशाप्रमाणें प्रथमे-द्वितीयेचीं रूपेंहि यादव–मराठींत सारखींच आहेत. म्हणजे, एकविधतेची जी छटा अपभ्रंशकालीं उदयाला येत होती ती यादवकालीं जवळ जवळ संपूर्णतेला पोहोंचली. शिवाय, अपभ्रंशांत षष्ठी ही विभक्ति अनेक वेळां चतुर्थी व पंचमी यांकरितां वापरली जाई. यादव–मराठींतहि हा प्रकार आहे. यामुळेंच चतुर्थी, पंचमी व षष्ठी या विभक्त्यांचीं प्रत्ययी रूपें ओळखणें कित्येकदां कठिण होतें. इतर प्रत्ययांबरोबर तृतीया आणि सप्तमी या विभक्त्याचा यादव-मराठींत ' आ ' हा अपभ्रंशांत नसणारा प्रत्यय आढळतो. तोहि मराठीनें अनुकरणाच्या नादानेंच सिद्ध केला आहे. तात्पर्य एकविधतेची प्रवृत्ति आणि षष्ठी विभक्तीचे सर्वगामित्व हीं मराठीनें अपभ्रंशापासूनच उचललीं. आणि हें जर खरें, तर यादव-मराठीनें नवीनच बनविलेल्या ' सामान्यरूपा 'चीं अति सूक्ष्म बीजें, अपभ्रंशातील विभक्तिरूपांची एकविधता आणि तिला असणारें षष्ठीचें अधिष्ठान यांत सापडतील. तात्पर्य, **सामान्यरूप नवीन असलें तरी तें अपभ्रंशांत बीज-रूपानें होतें, किंवा अपभ्रंशांतील एकविध विभक्ति-रूपांनीं यादव-मराठींतील सामान्यरूपाला जन्म दिला हेंच खरें**. सामान्यरूपाची ही उपपत्ति म्हणजे अपभ्रंश आणि यादव-मराठी यांना जोडणारा एक भक्कम दुवा होय ( भा० २, क्र० २४ ). अपभ्रंशांतील षष्ठी या सामान्यविभक्तीपासून यादव-मराठींतील सामान्यरूप निघालें, असें थोडक्यांत म्हणतां येईल.

(१०) यादव-मराठींतील सर्वनामांचीं रूपें अपभ्रंशापासूनच निघतात. तृतीयपुरुषी सर्वनामाचें प्रथमेचें एकवचन अपभ्रंशांतील सामान्य विभक्तीवरून सिद्ध होतें. प्रश्नार्थी ' कवण ' हें सर्वनाम

अपभ्रंशांत 'कवण' असेंच आढळतें (हेमचंद्र ४–३६७). यादव-मराठींतील संयुक्त सर्वनामें व सार्वनामिक विशेषणें अपभ्रंशद्वारा येतात (भाग २, क्र० २६).

(११) संख्यावाचक, क्रमवाचक, आणि अंशवाचक विशेषणें अपभ्रंशातून सिद्ध होतात (भाग २, क्र० २७).

(१२) विशेष्यनिघ्न विशेषणें वापरण्याची प्रथा अपभ्रंशद्वारा आली.

## § १८ क्रियापदविभक्ति

यादव-मराठीनें क्रियापदांचीं प्रत्ययी रूपें व कृदन्त रूपें साक्षात् अपभ्रंशापासून घेतलीं. संयुक्त क्रियापदें किंवा सामासिक क्रियारूपें मात्र तिनें स्वतंत्रपणें बनविलीं. पुढें अपभ्रंशद्वारा आलेल्या बाबी देतों—

(१) यादव-मराठींतील धात्वादेश अपभ्रंशातून सिद्ध होतात.

(२) 'वर्तमाने लट्, आज्ञार्थे लोट्, भूते लङ्, विधिलिङ्, भविष्ये लृट्' एवढीं पाच प्रत्ययी क्रियापदरूपें यादव-मराठींत आहेत. अपभ्रंशातहि नेमकीं हीं पांचच आहेत. प्राकृत-महाराष्ट्रींतच आख्यात विभक्तीचें प्रत्ययी रूप लोपूं लागलें. पुढें अपभ्रंशात वर्तमान, भूत आणि भविष्य याचा प्रत्येकी एकेक लकार व आज्ञार्थ आणि विध्यर्थ इतके प्रत्ययी रूपांनी व्यक्त होत. त्यातहि भूतकाळ निष्ठान्त प्रयोगानींच बव्हंशी दाखविला जाई. अपभ्रंशांत 'भूते लङ्' चीं रूपें 'आसि–अहेसि' एवढीच काय तीं 'अस्' धातूपुरती आढळतात. (पहा–णायकुमारचरिउ, प्रस्तावना, पान '५५) म्हणजे यादव-मराठीतील लङ्चें स्वरूप अपभ्रंशद्वारा आलें असलें तरी अपभ्रंशात अति विरल असणारी लङ्चीं रूपें यादव-मराठींत विपुल आहेत (भाग २, क्र० ३३). असो. यादव–मराठींत 'आज्ञार्थे लोट्' ची रूपें प्रथमपुरुषाच्या एकवचनांत नाहींत. अपभ्रंशांतहि एकवचनी रूपें नाहींत व अनेकवचनी अति विरल आहेत. यादव-मराठींतील 'विधिलिङ्'वर कर्मणीची दाट छाया आहे. अपभ्रंशांत तर हा लिङ् कर्मणि

रूपांनींच व्यक्त होतो. 'भविष्ये लट्'चीं रूपें अपभ्रंशांत आहेत तशींच तीं मराठींत होतात. मात्र त्यांना 'ल' स्वार्थे लागतो. अपभ्रंशात 'ल' स्वार्थे नाहीं, कारण तेव्हां लट्चीं रूपें लट्च्या रूपाहून भिन्न दिसत. पुढें यादव-मराठीत दोहोंचा घोंटाळ होऊ लागला, म्हणून स्वार्थे 'ल' आवश्यक झाला. तात्पर्य, यादव-मराठीतील आख्यातविभक्ति (प्रत्ययी) सर्वस्वी अपभ्रंशापासून सिद्ध होते (भाग २, क्र० ३१-४०).

अकरणरूपे अपभ्रंशाप्रमाणेंच होतात (भाग २, क्र० ४१).

यादव-मराठींत कर्मणि व भावे प्रयोगांची रूपे 'इज, व, प. पिज' या चार रीतीनी सिद्ध होतात. पैकीं अपभ्रंशात 'ज, प. व' या रूपाना आधार मिळतो. 'व' रूप ही केवळ वर्णप्रक्रिया आहे. तात्पर्य, यादव-मराठीनें कर्मणि-भावे रूपे (एका तृतीयान्त भावे प्रयोगाखेरीज) अपभ्रंशातून घेतली (भाग २). प्रयोजक रूपाचा 'अव' हा प्रत्यय अपभ्रंशद्वाराच सिद्ध होतो (भाग २, क्र० ४३).

कृदंतरूपें अपभ्रंशद्वारा आली. अपभ्रंशातील 'न्त' आणि 'माण' या प्रत्ययानीं साधिलेल्या कृदंतांवरूनच यादव-मराठीने वर्तमानकृदंतें बनविलीं. मात्र मराठींत 'आ' वर्तमानकृदंत संयुक्त व विशेषणात्मक आहे. अपभ्रंशांत तें तसें नाही. म्हणजे या बाबतींत यादव-मराठी अपभ्रंशाच्या पुढें एक पायरी गेली (भाग २, क्र० ४५). यादव-मराठींतील भूत कृदंतें अपभ्रंश-द्वाराच सिद्ध होऊन फक्त त्यांना भूतकाळाची नियत खूण 'ल' स्वार्थे लागते. अपभ्रंशांत स्वार्थे 'ल' वांचून भूतकृदंतें होतात. अव्ययी भूतकृदंतें किंवा ल्यबंतें अपभ्रंशांतील 'ऊण, एविणु, एप्पिणु' या प्रत्ययांवरून सिद्ध होतात. प्रो. ब्लोक म्हणतात तसा त्यांचा संबंध कोणत्याहि विभक्तीशीं नाहीं. तुमन्त व विध्यर्थी कृदंतें हीं अपभ्रंशातूनच आलीं. यांशिवाय यादव-मराठींत 'आवेया' हा प्रत्यय लागून भविष्यकृदंतें होतात. तीं अपभ्रंशांतून साक्षात् न येतां 'आव' (व्ययी) आणि 'इव'

(अव्ययी) या भविष्य–कृदंतांच्या प्रत्ययांच्या जोडानें बनलीं आहेत. अपभ्रंशांतील 'इवि' हा तुमंताचा प्रत्यय मराठींत लोपला, तरी तो 'आव'नें साधलेल्या कृदंतांत एक घटक म्हणून अवशिष्ट आहे ( भाग २, क्र० ४४–५० ).

एवंच, यादव–मराठीचीं कृदंत रूपें अपभ्रंशापासून सिद्ध होतात. निपात प्रकरण यादव मराठीनें अपभ्रंशापासूनच घेतलें आणि तें अधिक विस्तृत मात्र केलें ( भाग २, क्र० ५४–५८ ).

## § १९ शब्दसिद्धि आणि वाक्यरचना

(१) यादव–मराठीची तद्धितप्रक्रिया बव्हंशी अपभ्रंशातून निघते.

(२) भाववाचक नामें यादव–मराठींत 'पण, पें, एं, इक, ई, ता–ती, इव, त्व, य, आरु, ऐ' इतक्या प्रत्ययांनीं साधलीं जातात. पैकी 'पण, पें, एं, ई, इव' हे प्रत्यय अपभ्रंशातून आले. अपभ्रंशापेक्षां प्रत्ययांची विविधता यादव-मराठींत अधिक आहे (भाग ३, क्र० ३ ).

(३) ध्वन्यनुकारी शब्दाची प्रथा मुख्यतः अपभ्रंशातूनच उतरली· मात्र अपभ्रंशातील ध्वन्यनुकारी शब्दांचा अतिरेक यादव-मराठींत नाही ( भाग ३, क्र० ४ ).

(४) यादव–मराठीने द्विरुक्त शब्दांचे प्रकरण बव्हंशीं अपभ्रंशद्वारा घेतलें. सादशब्द व सामासिक जोडशब्द हे याला अपवाद होत. बाकीचे द्विरुक्त शब्द, विरोधी जोडशब्द, अकरणदर्शक शब्द इत्यादि परंपरागत आहेत ( भाग ३, क्र० ४ ).

(५) नामधातु आणि क्रियानामें वापरण्याची प्रथा अपभ्रंशद्वारा आली.

(६) संधि विकल्पानें करण्याचा गुण अपभ्रंशापासून आला.

(७) अपभ्रंशांत 'प' कर्मणि विरल असून, मूळ संस्कृतांतील 'प्य' चा प्रयोजकाचा अर्थ लोपून त्याला शुद्ध कर्मणीचा अर्थ नुकता कोठें प्राप्त होत होता. अपभ्रंशांत क्वचित् येणारा हा 'प' कर्मणि यादव–मराठींत कांहीं विशिष्ट धातूंपुरता वारंवार आढळतो

(८) सति–सप्तमी व सता–तृतीया यादव–मराठीनें अपभ्रंशद्वारा उचलल्या ( भाग ३, क्र० १० ).

(९) यादव–मराठीची वाक्यरचना व कारकार्थ हे अपभ्रंशाप्रमाणेंच आहेत. अपभ्रंशकालीं दिसणारी नामिक वाक्यरचना मराठींत आणखी बळावली.

## § २० महाराष्ट्री प्राकृताचे अवशेष

वरील विवेचनावरून यादव–मराठीची वर्णप्रक्रिया व प्रत्ययप्रक्रिया या संपूर्णतः अपभ्रंशापासून निघाल्या हें स्पष्ट होतें. तरीहि महाराष्ट्री प्राकृताचे कांहीं अवशेष मराठींत दिसतात. महाराष्ट्रीचे जे विशेष अपभ्रंशद्वारा मराठींत उतरले ते अर्थातच येथें लक्ष्य नाहींत. तर **ज्या ठिकाणीं यादव–मराठीनें अपभ्रंशाला सोडून महाराष्ट्रीला धरलें आहे अशा बाबी** पुढें देतों. त्यांची सविस्तर चर्चा त्या त्या स्थळीं प्रबंधांत केली आहे.

(१) अकारान्त पुल्लिंगी नामाचें प्र० ए० व० महाराष्ट्रींत सदा ओकारान्त होई, अपभ्रंशांत क्वचित् होई व यादव-मराठींत कांहीं विशिष्ट स्थळीं होई. हा गुण महाराष्ट्रीचा होय ( भाग २, क्र० ५ ).

(२) अकारान्त पुल्लिंगी नामांची क्वचित् आढळणारी सप्रत्ययी द्वितीया साक्षात् महाराष्ट्रीतून आली. महाराष्ट्रींत द्वितीयेचीं रूपें प्रथमेहून भिन्न असतात ( भाग २, क्र० ५ ).

(३) नपुंसकलिंगी अकारान्त नामांचीं प्रथमे–द्वितीयेचीं दोही वचनांचीं रूपें पुल्लिंगी रूपांहून भिन्न करण्याचा गुण. अपभ्रंशांत अनेकवचनी रूपेंच तेवढीं भिन्न असतात. परंतु महाराष्ट्रींत दोन्ही वचनांचीं रूपें पुल्लिंगी रूपांहून भिन्न आहेत. याबाबत यादव-मराठी महाराष्ट्रीचें अनुकरण करिते

(४) पुल्लिंगी–नपुंसकलिंगी नामांत कोठें न दिसणारी सप्तमीच्य अनेकवचनी ‘ सु–सुं ’ या महाराष्ट्रींतील प्रत्ययाची ओळख क्वचित् स्त्रीलिंगी रूपांत आढळते. अपभ्रंशांत हा ‘ सुं ’ प्रत्यय ‘ हिं ’ असा होतो, परंतु यादव-मराठींत स्त्रीलिंगी नामांपुरता ‘ सि ’ असा राहतो ( भाग २, क्र० २१ ).

(५) ‘ मी ’ या प्रथमपुरुषी सर्वनामाचें प्र० ए० व० महाराष्ट्रींतील रूपाशीं अधिक जुळतें ( मी < प्रा० अहम्मि, अम्मि ).

यांखेरीज यादव-मराठीनें आख्यातविभक्तिप्रकरण सर्वस्वीं महाराष्ट्रीपासून घेतलें, अपभ्रंशापासून नव्हे, असें प्रो० कृ० पां० कुलकर्णी म्हणतात (मराठी भाषा, पा० १३४). त्यांनीं वि० का० राजवाड्यांच्याच मताचा (ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ७७) अनुकार केला आहे. माझ्या मतें यादव-मराठीनें नामविभक्ति व आख्यातविभक्ति हीं दोन्ही प्रकरणें अपभ्रंशांतूनच घेतलीं. याची सविस्तर चर्चा प्रबंधांत आख्यातप्रकरणीं आली आहे.

(६) अपभ्रंशांत 'हार' धातूचें प-कर्मणि रूप सांपडत नाहीं. यादव-मराठींत तें आहे. महाराष्ट्रींत 'व्याहृ' या संस्कृत धातूचा कर्मभावे आदेश 'वाहिप्प' असा होतो (हेमचंद्र ४-२५३). म्हणजे यादव-मराठींतील 'हार' धातूचा प-कर्मणि साक्षात् महाराष्ट्रींतील कर्मणि आदेशावरून आला.

## § २१ यादव-मराठीची उत्पत्ति

येथवर अपभ्रंश आणि महाराष्ट्री यांतून यादव-मराठींत उतरलेले विशेष पाहिले. त्यांवरून हें स्पष्ट होतें कीं, यादव-मराठीची उच्चार-प्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया आणि शब्दसिद्धि या सर्वस्वीं अपभ्रंशाच्या पुढची पायरी म्हणजे उत्क्रांत अवस्था दर्शवितात. सामासिक नामविभक्ति व सामासिक क्रियापदविभक्ति हीं दोन प्रकरणें मुख्यतः अपभ्रंशांत नसलेलीं मराठीनें स्वतंत्रपणें चालू केलीं. परंतु मराठीनें अपभ्रंशाला सोडल्याचा हा पुरावा नसून, भाषेचें प्रत्ययी स्वरूप लोपत लोपत त्याऐवजीं सामासिक स्वरूप येत होतें त्याची ही साक्ष आहे. एतावता, मराठीचा सांगाडा अपभ्रंशोत्पन्न आहे हें सिद्ध होतें. अपभ्रंशांत न उतरलेल्या अशा महाराष्ट्री-प्राकृताच्या सहाच बाबी यादव-मराठींत आहेत. तेवढ्यांवरून मराठी ही साक्षात् महाराष्ट्रीपासून निघाली असें म्हणतां येणें शक्य नाहीं. यांखेरीज पैशाची-प्राकृतांतील 'न'कार व मागधींतील 'र > ल' आणि 'स > श' या प्रक्रिया यादव-मराठींत नित्य आढळतात. परंतु महाराष्ट्री, पैशाची आणि मागधी यांच्या वरील अवशिष्ट लकबा म्हणजे त्यांचें जनकत्व नव्हे. भाषेच्या अविरत संचारांत असे प्रातिक विशेष येणें अपरिहार्य आहे. यांखेरीज महाराष्ट्रिकांचें 'नाग' लोकांशीं मिश्रण होऊन मराठी भाषा बनली व त्या दृष्टीनें नाग भाषेचा कांहीं परिणाम मराठीवर दिसतो, असें राजवाडे 'राधामाधवविलास चंपू'च्या प्रस्तावनेंत

सांगतात. परंतु या म्हणण्याला कसलाहि आधार नाहीं. मराठी भाषा निरनिराळ्या प्राकृत भाषाच्या मिश्रणानें बनली असें मत प्रो० कुलकर्णी मांडतात (मराठी भाषा, पा० १३८). अपभ्रंशाची वर्णप्रक्रिया आणि प्रत्यय-प्रक्रियाच मराठींत अवतरली असतां, तिचा उगम दुसरीकडे शोधण्याचें वस्तुतः कारणच नाहीं. अर्धमागधींतील अनेक विशेष मराठींत दिसतात परंतु अर्धमागधी आणि महाराष्ट्री-अपभ्रंश वा जैन-अपभ्रंश अति निकट आहेत हे आपण मागें पाहिलेंच. **एतावता यादव–मराठी ही महाराष्ट्री-अपभ्रंशापासून निघाली हें स्पष्ट आहे.**

## § २२ मराठी वृत्तें आणि अपभ्रंश

एतत्प्रकरणीं अपभ्रंशातील वृत्तांचा आणखी एक आधार आहे. यादव-मराठींतील बहुतेक सारी पद्यरचना ओवी आणि अभंग या वृत्तात आहे. ही दोन वृत्तें मराठीनें अपभ्रंशापासून घेतलीं. अपभ्रंशात 'षट्पदी' नांवाचें एक वृत्त असून त्याची ३ री आणि ६ वी ओळ दीर्घ असते. तेव्हा तिचे दोन विभाग पाडून ३॥ ओळींचें एक याप्रमाणें दोन 'कडवके' बनविली जातात. या साडेतीन ओळींच्या कडवकापासून म्हणजे अर्धचतुष्पदीपासून मराठी ओवी निघाली असें **प्रो० वेलणकर** सांगतात[१]. त्यांनीं ओवी शब्दाची पुढील परंपरा बसविली आहे.

सं० अर्धचतुष्पदी ( = ३॥ ओळी ) अद्धौठवै-अद्धुधवै-अध्दुहवै-हुअवै-होअवै-ओवई-ओवी.

डॉ० कात्रे हे वरील व्युत्पत्ति भाषाशास्त्रदृष्ट्या त्याज्य ठरवून पुढील सुचवितात[२].

सं० अपपादिका–अववाइआ–ओवैया–ओवी.

---

१ "Apabhramsa and Marathi Metres"—Prof. H. D. Velankar (New Indian Antiquary, Vol. I, No. 4).

२ New Indian Antiquary, Vol. I, No.6, "Notes on Marathi Etymology" —Dr. S. M. Katre.

व्युत्पत्ति कशीहि असली तरी, ३॥ चरणांची, चौथा चरण अर्धा असणारी ओवी अपभ्रंशांतील षट्पदीशीं जुळते हें मात्र खरें. शिवाय ओवी ही षट्पदीप्रमाणेंच मूळात तालगेय असून हें तालगेयत्व अभंगातहि आहे. पुढें ज्ञानेश्वरकाली ही ओवी जेव्हा ग्रांथिक बनली तेव्हां तींतील तालगेयत्व लोपलें, व ती स्वरगेय ओवी किंवा एक वृत्त बनली. यादव-मराठीनें ओवी हें वृत्त सामान्य अशिक्षित लोकाच्या तोंडीं असणाऱ्या लोकगीतातून घेतलें यात संशय नाहीं. अपभ्रंशातील एकंदर पद्यच लौकिक किंवा जानपद स्वरूपाचे आहे हें विचारणीय होय. मराठींत ज्ञानेश्वरानीं ओवी वृत्त लोकगीतातून घेतल्याचा पुरावा ज्ञानेश्वरींत मिळतो. पहा—

"तेणे आबालसुबोधें। ओवियेचेनि बंधे।" (ज्ञा०, १८-१७२१)

"तैसी गाणीव ते मिरवी। गीतें विण रंगु दावी।" (ज्ञा०, १८-१७२०)

वरील ठिकाणीं ओवी ही 'आबालसुबोध' आणि 'स्वरगेय' असल्याचा उल्लेख आहे. दिंडी, साकी, आरती आणि घनाक्षरी हीं वृत्तेंहि मूळचीं अपभ्रंशात असल्याचें प्रो० वेलणकरानी सिद्ध केलें आहे. तात्पर्य, यादव-मराठीचा सागाडा मूळचा अपभ्रंशाचा आहे असें विधान वर भाषाशास्त्रदृष्ट्या केलें, त्याला बळकट आधार मराठीतील वृत्तपरीक्षे-वरून मिळतो.

## § २३ यादव-मराठीनें स्वतंत्रपणें रूढ केलेले प्रकार

यादव-मराठी ही महाराष्ट्री-अपभ्रंशापासून निघाली व तिनें वर्णप्रक्रियेच्या आणि प्रत्ययप्रक्रियेच्या सर्व बाबी साक्षात् अपभ्रशापासून उचलल्या हें खरें. परंतु भाषा ही सजीव असल्यानें ती जुनी परंपरा तर चालवितेच, पण नवीन विशेष उत्पन्न करण्याची शक्तिहि तिच्या ठायीं असते. ती विकासप्रवण असल्यानें, भाषाशास्त्राचे जे सर्वसामान्य नियम आहेत त्यांनुसार तिची प्रगति होत असते. 'व्हिटने' यानीं भाषेच्या सजीवतेची व पुरोगामित्वाची चर्चा केली आहे, तीवरून भाषेचें जुनें स्वरूप पालटत पालटत नवें रूढ होतें व अशा रीतीनें तिची प्रकृति स्थिर नसून

१ Whitney : Origin and growth of Language, Ch. 2

गतिमान असते याची साक्ष मिळते. यादव-मराठी वरील नियमाला अपवाद नाहीं. प्रत्ययी स्वरूपाच्या अपभ्रंशापासून सामासिक स्वरूपाच्या आधुनिक आर्य भाषेकडे कल असणारी यादव-मराठी त्या दृष्टीनें पालटत होती व अपभ्रंशाची वर्णप्रक्रिया आणि प्रत्ययप्रक्रिया या तींत उत्क्रात स्वरूपांत आढळल्या, तरी तिनें काहीं बाबी स्वतंत्रपणें उत्पन्न केल्या. **यादव-मराठी ही प्रत्ययी अपभ्रंश आणि सामासिक वर्तमान आर्य भाषा यांना जोडणारा दुवा असल्यानें तींत परंपरेला सोडून केलेले स्वतंत्र प्रयोग अनेक दिसतात.** अशांची चर्चा पुढें करितों—

## (अ) वर्णप्रक्रिया :

(१) 'ऋ' व 'विसर्ग' हे प्राकृत, अपभ्रंशांत नाहींत. परंतु यादव-मराठीचें काहींशा प्रमाणांत संस्कृतीकरण होत असल्यानें तीत तत्सम शब्दांत वरील उच्चार आहेत.

(२) 'ऐ-औ' हे संयुक्त स्वर संस्कृतात आहेत, प्राकृत अपभ्रंशात नाहींत. प्राकृतांतील स्वरातर्गत व्यंजनलोपामुळें उत्पन्न झालेल्या स्वरांच्या संधीनें यादव-मराठी हे संयुक्त स्वर बनविते. ही वर्णप्रक्रिया होय. भाषेचें संस्कृतीकरण नव्हे.

(३) महाराष्ट्रींत व अपभ्रंशात 'श, ष' हे उष्मे नाहीत. त्याऐवजीं 'स' होतो. यादव-मराठींत वरील तिन्ही उष्मे आहेत.

(४) अपभ्रंशांत अंत्य स्वराचें ऱ्हस्वीकरण रूढ होतें. यादव-मराठींत तें असून शिवाय अंत्यस्वरलोप होण्यास प्रारंभ झाला. म्हणजे अंत्य स्वर (अविकृत) — ऱ्हस्वीकरण — लोप या तीन प्रायऱ्यांपैकीं शेवटल्या दोन यादव-मराठींत एकदमच दिसतात. अंत्यस्वरलोप हा ऱ्हस्वीकरणाच्या पुढचा टप्पा होय(भा० १,क्र० ४).

(५) 'ए-ओ' ऐवजीं 'ये-वो' येण्याची प्रवृत्ति यादव-मराठीनें अपभ्रंशापेक्षा अधिक व्यापकत्वानें द्राविडीपासून उचलली (भा० ४,क्र० २).

(६) 'अकरा' (< अप० एग्गारअ < प्रा० एआरह < सं० एकादश) येथें परंपरेला सोडून मराठी आद्य 'ए' चा 'अ' करिते.

## ( आ ) प्रत्ययप्रक्रिया :

(१) अकारान्त पुल्लिंगी नामांचीं, 'आं'कारान्त तृतीयेचीं व 'आ'कारान्त सप्तमीचीं रूपें ( भाग २, क्र० ५ ), आणि ईकारान्त स्त्रीलिंगी नामांचीं 'आं'कारान्त तृ० रूपें ( क्र० १८ ) अपभ्रंशाला सोडून यादव-मराठी बनविते. हा सारा एकविधतेचा व मिथ्यानुकरणाचा परिणाम होय. चतुर्थी, पंचमी, षष्ठी यांचीं रूपें 'आं' कारान्त होतात, म्हणून तृतीया आणि सप्तमी यांचींहि तशींच बनलीं गेलीं. 'आ' हा प्रत्यय लिंगविभक्ति यांच्या उपाधिभेदातीत वापरण्यास यादव-मराठीनें आरंभ केला ही तिच्या सामासिक स्वरूपाची पहिली पायरी म्हणून महत्त्वाची होय.

(२) ऐ-औकारान्त पुल्लिंगी नामें व 'ऐ' कारान्त स्त्रीलिंगी नामें अपभ्रंशात नसताना यादव-मराठीनें स्वरसंयोगानें बनविलीं ( जसें, दलपतिः > दळवइ > दळवै; जृंभिका > जांभिआ < जाभै; क्र० ९, १०, २० ).

(३) 'आ' कारान्त पुल्लिंगी नामें अपभ्रंशांत नाहीत. यादव-मराठींत तीं असल्यानें त्यांचीं विभक्तिरूपें 'एतत्' आणि 'इदं' या सर्वनामांपासून निघालेल्या प्रत्ययांनीं बनलीं आहेत. सार्वनामिक बीजांपासून प्रत्यय साधण्याची यादव-मराठीची ही लकब म्हणजे सामासिक रूपांचा आरंभच होय ( भाग २, क्र० ६ ).

(४) एकविधतेचा नाद आणि षष्ठीचें अनुष्ठान या दोहींमुळें यादव-मराठींत प्रथम सामान्यरूप सिद्ध झालें. सामान्यरूप प्राकृत-अपभ्रंशात नाहीं. मात्र अपभ्रंशांत त्याचीं अति सूक्ष्म बीजें दिसतात. यादव-मराठींत विकसित सामान्य रूप दृष्टीस पडतें. या सामान्य रूपांतच सामासिक विभक्तीचें बीज आहे ( भा० २, क्र० २४ ).

(५) अपभ्रंशांत नसलेलीं प्रत्ययात्मक शब्दयोगी व शुद्ध शब्दयोगी अव्ययें प्रथम यादव-मराठींत दिसतात. प्रत्ययी विभक्तिरूपें एकविध

झाल्यामुळें कारकार्थ व्यक्तविण्यास अक्षम ठरूं लागलीं. म्हणून शब्दयोगी-साधित विभक्तीचा अवतार झाला. हें यादव-मराठीचें सामासिक स्वरूप होय व तें प्रथम यादवकाली सुरू झालें (भा० २, क्र० २३-२५).

(६) 'भविष्ये लृट्'च्या अपभ्रंशांतील रूपांत स्वार्थे 'ल' नाहीं. यादव-मराठींत तो नव्यानें आला. लट्चीं आणि लृट्चीं रूपे सारखीं दिसूं लागल्यानें एक नियत चिन्ह म्हणून तो वापरण्यांत आला. मात्र तो विकल्पानें लागतो (भा० २, क्र० ३९).

(७) 'भूते लङ्'चा वापर प्राकृत अपभ्रंशांत अति अल्प आहे. बव्हंशी धातूचें निष्ठारूपच भूतकाळी वापरले जातें. फक्त 'अस्' धातूची 'आसि–अहेसि' एवढीच रूपें काय तीं अपभ्रंश-ग्रंथांत दिसतात व हेमचंद्रहि फक्त त्याचाच तेवढा उल्लेख करितो. यादव–मराठीनें हा 'भूते लङ्' विस्तृत प्रमाणावर वापरण्यास आरभ केला, तो नवीन होय (भा० २, क्र० ३३).

यादव–मराठी भावे प्रयोगाचा एक विशेष प्रकार वापरते. त्यात उद्देश्य व पूरक हीं सदा तृतीयान्त असतात. हा प्रकार संस्कृतात आहे, प्राकृत–अपभ्रंशात मुळींच नाहीं. तेव्हां येथें यादव-मराठीने साक्षात् संस्कृताचें अनुकरण केलें आहे. हा प्रकार यादवकालींच दिसतो. पुढें तो लोपला (भा० ३, क्र० ९).

यादव–मराठींत 'आं' प्रत्ययानें साधिलेली जाता, करितां, खाता अशीं वर्तमान कृदंतें आहेत व तीं सदा क्रियाविशेषणात्मक असतात. सं० मान > माण > आण > 'आं' हा प्रत्यय नेहमींच्या 'त' वर्तमानकृदंताला लागून हीं सिद्ध होतात. अपभ्रंशात हा 'माण' प्रत्यय क्वचित् दिसतो, परंतु त्याचें यादव–मराठींतीलप्रमाणें जोडरूप अपभ्रंशांत नाहीं. म्हणजे, प्रत्यय अपभ्रंशद्वारा घेऊन मराठीनें त्याचें जोड व क्रियाविशेषणात्मक रूप बनविलें, तें सर्वस्वीं नवीन होय (भाग २, क्र० ४५).

(१०) प्राकृत–अपभ्रंशांत नसलेलीं कर्तरि भूत कृदंतें यादव–मराठीनें

नवीं बनविलीं. त्याचीं प्रथमपुरुषी रूपेंच विपुल आढळतात. इतर अति विरल आहेत. कर्मणि भूतकृदंताला लट्च्या प्रथम-पुरुषी प्रत्ययाचा जोड होऊन ही कर्तरि भूत कृदंते यादव-मराठीत सिद्ध होतात ( भाग २, क्र० ४७ ).

(११) 'आवेया' या प्रत्ययाने यादव-मराठी तुमंतार्थक कृदंतें बनविते. हीं प्राकृत-अपभ्रंशात नाहीत. मराठीत ती 'आव' या व्ययी आणि 'इय' या अव्ययी भविष्यकृदंताच्या प्रत्ययांच्या जोडानें तयार होतात. अपभ्रंशात 'इवि' हा तुमंताचा एक प्रत्यय आहे. त्याचा उपयोग यादव-मराठी एतत्प्रकरणी करिते. या जोड कृदंताची वरील उपपत्ति स्वतत्र आहे ( भा० २, क्र० ४९ संयुक्त आणि सहाय क्रियापदाची पद्धति यादव-मराठींत नव्याने दिसते. प्राकृत-अपभ्रशात ती कोठेंहि नाहीं. मराठी-शिवाय इतर अर्वाचीन आर्य भाषाच्या इतिहासातहि संयुक्त क्रियापदाला आरभ अपभ्रशकालानंतरच झाला. यात मुख्य धातूचे कृदन्त रूप व सहाय धातूचे आख्यात रूप याचा जोड होतो. हें आख्यातविभक्तीचे परिणत असें सामासिक स्वरूप होय ( भाग २, क्र० ५१ ). २५१

(१२) अपभ्रंशात केवळ वर्तमान कृदंतच सकेतार्थी वापरलें जाई. यादव-मराठीने वर्तमानकृदंताला 'हो' धातूच्या रूपाचा जोड देऊन संकेतार्थ साधिला. तात्पर्य, मराठीतील संकेतार्थी रूपें काही एका प्रमाणात नवीन आहेत ( भाग २, क्र० ५२ ).

## ( इ ) शब्दसिद्धि व वाक्यरचना :

( १ ) यादव-मराठीनें तद्धितप्रक्रिया बरीचशी अपभ्रंशातून घेतली असली तरी भाववाचक नामांचे 'इक, ता, त्व, आरु, ऐ' हे प्रत्यय तिनें नव्यानें वापरण्यास आरंभ केला. म्हणजे, अपभ्रंशातील तद्धितप्रत्ययांची संख्या मराठीनें वाढविली ( भा० ३, क्र० २–३ ).

( २ ) यादव-मराठीनें सादशब्द व सामासिक जोडशब्दे द्राविडी

---

१ Echo words and Polyglottic words.

भाषांच्या संपर्कानें सर्वस्वीं नवीन बनविले. ते संस्कृत–प्राकृत–अपभ्रंशांत अगदीं नाहींत. परभाषेचा परिणाम होऊन यादव-मराठीनें शब्दसिद्धीचीं हीं दोन साधने वाढविली ( भा० ३, क्र० ४)

३ ) यादव–मराठीनें ‘ पिज ’ कर्माणि हा ‘ प ’ आणि ‘ इज ’ कर्मणि याच्या संयोगानें स्वतंत्रपणें साधिला. ही जोड कर्मणीची प्रथा प्राकृत अपभ्रंशात नाहीं. यादव-मराठींत ती नव्यानें दिसते ( भाग ३, क्र० ९ ).

( ४ ) संस्कृतातील भावेप्रयोगांत उद्देश्य व पूरक दोन्ही तृतीयान्त असतात. हा भावेप्रयोग महाराष्ट्रीत, अपभ्रंशात नाही, यादव-मराठींत आहे, वर्तमान–मराठीत नाहीं. म्हणजे हा तृतीयान्त भावे यादव-मराठीचा एक विशेषच होय. यादवकालीं भाषेचें काही प्रमाणांत संस्कृतीकरण होत होतें त्याचा हा पुरावा होय ( भा० ३, क्र० ९ ).

( ५ ) संस्कृतांतील ‘ तर–तम ’ व ‘ ईयस–इष्ठ ’ हे तुलनेचे प्रत्यय प्राकृत अपभ्रंशांत आहेत. परंतु यादव-मराठी हे परंपरागत प्रत्यय न वापरता, शब्दयोगी अव्यये योजून तरतमभाव व्यक्तविते. हें भाषेचें सामासिक स्वरूप मराठीनें नवीन बनविलें. “तारतम्याचा गुण मराठीनें महाराष्ट्रीपासून घेतला” हें प्रो० कुळकर्ण्यांचें विधान अयोग्य होय. तो गुण तिनें स्वतंत्रपणे सिद्ध केला ( भाग ३, क्र० १२ )

## § २४ प्रमुख अनुमानें

वरील सर्व विवेचनावरून आणि प्रबंधांतील चर्चेवरून यादव–मराठी-संबंधीं पुढील अनुमानें करिता येतील. ही अनुमानें म्हणजे प्रस्तुत प्रबंधांतील मुख्य सिद्धान्ताचा पायाच होय. ती अशीं—

१ वर्णप्रक्रिया आणि प्रत्ययप्रक्रिया या तपासून पाहतां यादव-मराठी ही साक्षात् महाराष्ट्री-अपभ्रंशापासून निघाली आहे. अपभ्रंशांत नसलेल्या अशा कांहीं किरकोळ बाबी महाराष्ट्री, मागधी व पैशाची या प्राकृत भाषांतून

१ मराठी भाषा उद्गम–विकास, पान १३५

उतरल्या आहेत, हे खरें. तथापि, यादव-मराठीचा सागाडा महाराष्ट्री-अपभ्रंशापासून आल्यानें तीच मराठीची जननी ठरते.

२ यादव मराठीत इंडो-आर्यन भाषाचीं तीन विविध स्वरूपे एकसमयावच्छेदेंकरून दिसतात, ती अशीं—

१ प्रत्ययी Synthetical
२ अर्ध-प्रत्ययी Quasi-synthetical
३ सामासिक Analytical.

भाषेचा कल प्रत्ययी स्वरूपापासून सामासिकाकडे असतो, या नियमानें प्रत्ययी प्राकृत-अपभ्रंशाचे सामासिक वर्तमान भाषात रूपांतर झालें आहे. **या दोहोंमधील यादव-मराठी हा संधिकाल होय. त्यांत प्राचीन प्रत्ययी स्वरूपाचे अवशेष आहेत व अर्वाचीन सामासिक स्वरूपाचे अंकुर आहेत.**

प्रत्ययी स्वरूप प्रत्ययी नामविभक्ति व आख्यात विभक्ति यात दिसत व सामासिक स्वरूप शब्दयोगीसाधित विभक्ति आणि संयुक्त क्रियापदें यात दिसतें. नामविभक्तिप्रक्रियेंतील सामान्यरूप व संयुक्त क्रियापदातील कृदंत आणि आख्यात याचा जोड, हीं दोन चिन्हें भाषा सामासिक स्वरूपाकडे वळत असल्याची होत. तात्पर्य, एकाच काळात भाषेची प्रत्ययी, अर्धप्रत्ययी व सामासिक हीं तिन्ही रूपें एकदम दिसतात. या दृष्टीनें यादव-मराठीचा अभ्यास भाषाशास्त्राला व एकंदर इंडो-आर्यन भाषाना अत्यवश्य आहे. भाषिक उत्क्रातीच्या या तीन पायऱ्या तींत असल्यानें, **यादव-मराठी ही प्रत्ययी प्राचीन भाषा व सामासिक अर्वाचीन भाषा या दोघींची प्रातिनिधिक होऊं शकते.**

३ यादव-मराठीला अपभ्रंशाचा अपभ्रंश किंवा सुलभोच्चारप्रवण भाषा न म्हणतां '**संस्कृतीकरणाचा संस्कार झालेला असा उत्क्रांत स्वरूपांतील अपभ्रंश**' म्हणता येईल. याला पुरावा पुढीलप्रमाणे—

( अ ) 'ऋ, ऐ, औ, श, ष' हे प्राकृत-अपभ्रंशात नसलेले संस्कृत उच्चार यादव-मराठींत नव्यानें आढळतात. पैकीं 'ऋ' हा केवळ तत्सम शब्दात आहे, व 'ऐ–औ' चा मूळ संस्कृत 'ऐ–औ' शीं संबंध काहींहि

नाहीं हें खरे. तथापि हे उच्चार प्राकृत-अपभ्रंशांत नव्हते आणि यादव-मराठींत आहेत इतक्यापुरतें भाषेचें संस्कृतीकरणच होय.

( आ ) प्राकृत-अपभ्रंशात लोपलेली द्विवचनाची ओळख यादव-मराठीत तत्सम रूपांतच का होईना, पण क्वचित् आढळते.

( इ ) 'भूते लङ्' हा काळ प्राकृत-अपभ्रंशात अति विरल असून त्याचीं 'आसि–अहेसि' एवढीं दोन रूपेंच काय ती आढळतात. यादव-मराठींत हा काळ नित्य वापरात असून त्याचीं सर्व वचनीं, सर्व पुरुषी रूपें आहेत. 'भूते लङ्' च्या योजनेचे हे व्यापकत्व म्हणजे संस्कृतचे अनुकरणच होय.

( ई ) संस्कृतातील तृतीयान्त भावेप्रयोग प्राकृत-अपभ्रंशांत नाही. यादव-मराठीत तो साक्षात् संस्कृतापासून आला.

( उ ) यादव-मराठीतील काही तद्धित प्रत्यय साक्षात् संस्कृतापासून आले आहेत.

( ऊ ) यादव-मराठीच्या घटनेत, विशेषतः नागर पद्यात, तत्सम शब्दांचें प्रमाण वाढतें आहे. शेंकडा २३ तत्सम शब्द यादव-मराठीत येतात. या संस्कृतीकरणाचे कारण स्पष्ट आहे. प्राकृत-अपभ्रशाच्या काळात बौद्ध व जैन मतांचा जोर होता व त्यानुसार ग्रंथ सामान्य किंवा प्राकृत जनांकरितां लिहिले जात. इ० स० ८०० नंतर वैदिक धर्माचा ध्वज पुनश्च झळकला व महाराष्ट्रात चालुक्य आणि यादव याच्या राजवटींत संस्कृताचे माहात्म्य वाढलें. त्यामुळें पंडिती संस्कृताची छटा लौकिक प्राकृत भाषेवर पडून मराठी 'सुसंस्कृत' झाली. तात्पर्य, भाषेचें संस्कृतीकरण धर्माच्या व विद्येच्या संस्कृतीकरणामुळें यादवकाळीं झालें.

४ वर्णप्रक्रिया आणि प्रत्ययप्रक्रिया यांबाबत यादव-मराठी ही अपभ्रंशाच्या पुढची पायरी असून तींत वर्तमान-मराठीच्या सामासिक स्वरूपाचीं बीजें स्पष्ट दिसतात.

५ यादव-मराठींत व विशेषतः तिच्यांतील गद्यांत, रूपांची विविधता अपभ्रंशाहून अधिक दिसते.

६ परभाषांचा परिणाम यादव-मराठीवर अल्पल्प आहे व तोहि व्याकरणापेक्षां उच्चार आणि शब्दसिद्धि यांतच अधिक आढळतो.

## § २५ मुख्य प्रमेय

वरील विवेचन आणि सर्वसाधारण अनुमाने यावरून प्रस्तुत प्रबंधात जे प्रमेय सिद्ध केले आहे किंवा जो सिद्धान्त माडिला आहे, तो असा—

"यादव-मराठी ही संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश या प्रत्ययी आणि वर्तमान मराठी या सामासिक भाषांच्या मधली स्थिति आहे. तींत भाषेच्या प्रत्ययी स्वरूपाचे अवशेष आणि सामासिक स्वरूपाचीं बीजे दोन्ही आढळतात. अतएव, इंडो-आर्यन भाषाच्या इतिहासात तिचे स्थान प्रत्ययी प्राचीन आणि सामासिक अर्वाचीन भाषामधील एक दुवा असे आहे. तात्पर्य, यादव-मराठी ही '**प्रत्ययी–सामासिक**' अशा द्विविध स्वरूपाची भाषा होय."

हाच सिद्धान्त इग्रजीत पुढीलप्रमाणे माडता येईल.

"The Yadav–Marathi represents the medial stage between the Synthetic OIA and MIA on the one hand, and the Analytic NIA on the other. It's position in the history of Indo–Aryan is of **SYNTHETICO-ANALYTICAL** stage."

# भाग पहिला

## उच्चार-प्रक्रिया Phonology

### § १ यादव-मराठींत खालील उच्चार आढळतात :

स्वर : अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ए, ऐ, ओ, औ, ँ

व्यंजनें: क्, ख्, ग्, घ्,
च्, छ्, ज्, झ्,
चॆ्, छॆ्, जॆ्, झॆ्,
ट्, ठ्, ड्, ढ्, ण्
त्, थ्, द्, ध्, न्
प्, फ्, ब्, भ्, म्
य्, र्, ल्, व्
श्, ष्, स्, ह्, ळ्

पैकी ऋ केवळ तत्सम शब्दातच येतो. 'ऐ' व 'औ' या संस्कृतातील संयुक्त स्वराचा लोप अपभ्रंशकालींच झाला होता व त्याच्या जागीं अनुक्रमें 'ए-ओ' किंवा 'इ-उ' येत. अर्थात् मराठींत 'ऐ' व 'औ' हे संयुक्त स्वर आहेत ते संस्कृतजन्य नाहींत. तर प्राकृतांतील स्वरान्तर्गत व्यंजनलोपामुळें उत्पन्न झालेल्या स्वराच्या संयोगानें मराठींतील संयुक्त स्वर निघाले.

( जसें— सं० प्रतिज्ञा > प्रा० पइज्जा > म० पैज
सं० जतुगृह > प्रा० जउघर > म० जौहर )

म्हणजे मराठींतील संयुक्त स्वर हे वर्णप्रक्रियेच्या नियमांनीं सिद्ध होतात; राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें[१] हें संस्कृताचें पुनरुज्जीवन नव्हे. मराठींतील 'चॆ्, छॆ्, जॆ्, झॆ्' हे दंत्यतालव्य वर्ण आणि 'ळ्' यांसंबंधीं सविस्तर

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ३

चर्चा मीं प्रस्तावनेंत केली आहे ती पहावी[1]. पुढें यादव-मराठीची उच्चार-प्रक्रिया देतो.

## § २ 'ऋ' ची प्रक्रिया

पाली भाषेंत 'ऋ' च्या जागी 'अ, इ, उ, रि, रु, र, रू' हे वर्ण येतें[2]. प्राकृत–अपभ्रंशात 'ऋ' ची प्रक्रिया पूर्ण होऊन त्याच्या जागीं 'अ, इ, उ' येत. हीच परंपरा पुढें यादव-मराठीत दिसते. पहा—

१ **सं० ऋ > मराठी 'अ':**

शाखळ [ श्रृंखला ]; ग्रह [ गृह ]; तनकट [ तृण ]; कान्हा [ कृष्ण ]; व्रषभ [ वृषभ ]; माहार [ मृतहर ]; जागा [ जागृत ]; तहान [ तृष्णा ]; मऊ [ मृदु ]; मढें [ मृत ]; सइ [ स्मृति ]; नाचणे [ नृत्य ]; वाड [ वृद्ध ]; पाठि [ पृष्ठ ]; पोहा [ पृथुक-पहुअ ]; जांभै [ जृंभा ].

२ **सं० ऋ > मराठी 'इ':**

रीतु [ ऋतु ]; गिधी [ गृध्र ]; रिद्धि [ ऋद्धि ]; सरिस [ सदृश ]; भाई[3] [ भ्रातृ ]; द्रिढ [ दृढ ]; श्रीगार [ श्रृंगार ]; सींगी [ श्रृंगी ]; पीढें [ पृष्ठ ]; भींगरुटी [ भृंगी ]; रिणाइतु [ ऋण ]; दिठी [ दृष्टि ]; विंचू [ वृश्चिक ]; रीस [ ऋक्ष ]; तीज [ तृतीय ]; हियें [ हृदय ]; माहेर [ मातृगृह ].

३ **सं० ऋ > मराठी 'उ':**

रुख [ वृक्ष ]; रुसी [ ऋषि ]; भाऊ [ भ्रातृ ]; उजू [ ऋजु ]; पाऊस [ प्रावृष् ]; पुसणें [ पृच्छ् ]; ~~आयुरण [ आस्तृ ]~~.

यादव-मराठींत 'ऋ' च्या वरील तीन प्रक्रिया होतात. पैकीं 'ऋ > अ' ही सर्वांत अधिक आहे. 'इ' आणि 'उ' प्रक्रियेचीं उदाहरणें वर दिलीं आहेत त्यांहून फारशीं वाढवितां येणार नाहींत. या भिन्न

---

१ पहा, प्रस्तावना क्र० ९

२ Treatment of R in Pali–Dr. S. M. Katre in B. O. R. I. Vol. xvi, pp. 189--201

३ 'भाई' हें रूप अतिक्वचित् आढळतें. (भवळे पृ० ७, नागांव शिलालेख)

भिन्न वर्णांतरात कोणतेहि 'भेदक' तत्त्व न आढळल्याने प्रो॰ ब्लोके यानी त्यांची व्यवस्था अंशतः तरी भौगोलिक तत्त्वावर लाविली आहे. नैर्ऋत्य प्रातात 'ऋ > अ' हीच प्रक्रिया त्याच्या मतानें विशेष आहे. दुसऱ्या दोन प्रक्रिया मराठीनें मध्यभारतीय बोलींपासून उचलल्या असें ते म्हणतात. 'ऋ > उ' या प्रक्रियेची उपपत्ति कदाचित् ओष्ठ्य वर्णांच्या ससर्गाने लाविता येईल. परंतु 'ऋ > इ' या प्रक्रियेची वाट काय? गुजराती आणि सिंहली या भाषातहि 'अ' प्रक्रियाच अधिक आहे. तेव्हा, हें रूपान्तर उच्चार-प्रक्रियेच्या नियमाने न होता मध्यबोलींच्या परिणामामुळें झाले असेच मानावें लागतें. प्राकृतातहि वरील तीन प्रक्रियासबंधी स्पष्ट नियम नाहींतें. अशाकाच्या गिरनार शिलालेखांत 'ऋ' चा 'अ' होत असून 'इ-उ' झाल्याचीं स्थळें अत्यल्प आहेत. त्यावरून प्रो॰ ब्लोक वरील विधानाना बळकटी आणतात.

## § ३ स्थाननियत स्वरप्रक्रिया

### आघात Accent

यादव-मराठीतील स्वरप्रक्रिया शब्दांतील स्वराच्या त्या त्या स्थानावर अवलंबून आहे. येथे साहजिकच स्वराघाताचा प्रश्न पुढे येतो. वैदिक काळीं स्वराघात नव्हता. जो होता तो Musical Accent होता, Stress Accent नव्हता. पाणिनि आदि वैयाकरणाची त्याबाबत मुग्धताच दिसते. अत्य स्वराचा लोप होणें किवा उपान्त्य स्वराशी त्याचा संयोग होणें, उपान्त्य स्वर अन्त्य होऊन दीर्घ होणे, आणि उपान्त्यपूर्व स्वराची प्रक्रिया होणे या सर्वच गोष्टी डॉ॰ ग्रीयरसनें हे स्वराघातामुळें मानतात. प्रो॰ टर्नरें यानीं आघात-प्रकरणाचा संपूर्ण विचार करून सर्व स्वरप्रक्रिया एका आघातावरच बसविली

---

१ La Langue Marathe, 31

२ Pischel : Grammatika, 49–53

३ 'On Stress Accent in Modern IA.'—J. R. A. S. 1895 (pp. 139)

४ 'The Indo Gemranic Accent in Marathi'—J. R.A.S. 1916 ( pp. 203–250)

आहे. बीम्स हा विषयच मुळी सोडून देतो. मराठी वैयाकरण साधारणतः आघात प्रश्नाचा विचार करीत नाहीत. प्रो० कृ० पा० कुळकर्ण्यांनी[२] मात्र आघाताची सोपपत्तिक चर्चा करून वैदिक, संस्कृत, प्राकृत आणि मराठी भाषातील आघात दाखवून त्यामुळे होणारी स्वरप्रक्रिया सिद्ध केली आहे. मराठींतील आघाताला परंपरा आहे हे त्यांचें मुख्य म्हणणें. डॉ० भाडारकरें यानी तर 'आघातनियम' ( Law of Accentuation ) सिद्ध करून दोन तऱ्हेचे आघात मानले आहेत. ते म्हणतात—

"Thus, these two accents, that on the penultimate when a word ends in the silent "a", and that on the new final, are to be met with in the Vernaculars. The first may be called the original accent, and the second derivative."

—(pp. 160–1)

प्रो० ब्लोर्क हे स्वराघात मानीत नाहीत असे नव्हे. तर त्याच्या मतें स्वराघाताचा इतिहास सुसंबद्धपणे लिहिता येणे पुराव्याच्या अभावी शक्य नाही. एवढ्याचकरिता त्यानीं या प्रश्नाचा अधिक विचार केलेला नाहीं.

मला स्वतःला प्रो० ब्लोक यांचें विवेचन बरेंचसें पटतें. मात्र स्वराघाताची चर्चा अशक्य होय हे त्याचे म्हणणे डॉ० भाडारकरानीं दिलेल्या उदाहरणावरून सहजच खोडले जाते. परंतु या चर्चेतील अडचणीहि पाहिल्या पाहिजेत. यादव-मराठीतील स्वराघातासंबंधीं बोलावयाचें तर या प्रकरणी कोणता प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध आहे ? आघात हा मुख्यतः नादाचा असतो आणि आपल्याकडे कोणत्याच भाषेच्या वा भाषिक कालखंडाच्या ध्वनिमुद्रिका नाहींत. पाश्चात्य भाषाशास्त्रज्ञांनी भाषेचे-विशेषतः तिच्यातील सूक्ष्म उच्चारांचे-ठसे ध्वनिमुद्रिकावर कायम केल्याने आघातप्रकरणी ते साधार लिहूं शकतात. आपल्याकडे असे कोणतें साधन आहे ? वर्तमान-भाषा प्रत्यक्ष ऐकून एक वेळ आघात-प्रकरण लाविता येईल; परंतु यादवकालीं

१ 'Comparative Grammar' ( part 1 ) pp. 17–20

२ मराठी भाषा उद्गम-विकास, पा. ३११–३१७

३ Wilson Philological Lectures, pp. 154–165

४ La Langue Marathe, 32–34

मराठी भाषा कशी बोलली जाई तें कसें समजणार ? या प्रत्यक्ष प्रमाणाच्या अभावींच, "ज्ञानेश्वराच्या काळींहि व त्यापूर्वीहि बोलण्याच्या भाषेंत 'उ' प्रत्यय नाहींसा झाला होता" असें चुकीचें विधान चिं० वि० वैद्यासारखे विद्वान् करतात. वस्तुतः 'उ' कार तेव्हाच्या बोली भाषेतहि असलाच पाहिजे. दुसरें असें, की मराठीतील आघात स्थिर नाही. तो आपले स्थान बदलतो, त्याअर्थी विकारी आहे. एतावता, यादव-मराठींतील स्वरप्रक्रिया आघाता-वरून उपपादिण्याऐवजी तिचें स्वरूप शब्दामधील स्वराच्या स्थानावरून-अंत्य, उपात्य, आद्य-ठराविणे हेच आजच्या परिस्थितीत अधिक बरे वाटतें.

## § ४ अंत्य स्वर

संस्कृतातील अंत्य व्यजने प्राकृतात लोपून त्याच्याऐवजी केवळ स्वर राहिले. या स्वरावर आघात बसल्याने ते ऱ्हस्व करण्याकडे प्रवृत्ति होती व तिचीं प्रथम चिन्हें अशोकाच्या शिलालेखात दिसतात. पुल्लिंगी नामाच्या प्रथमेच्या एकवचनाचे उदाहरण घ्या—

प्राकृत 'ओ' > अप० 'उ' > जुने मराठी 'उ.' म्हणजे अंत्य स्वर ऱ्हस्व करण्याची लकब अपभ्रंश कालापासून जोराने चालू झाली. याच परंपरेनें वर्तमान आर्य भाषातून अंत्य स्वर अजीबात लोपला व या नियमाला अपवाद म्हणून बिहारी, काश्मिरी, सिंधी, सिंहली, नेपाळी आणि दक्षिण कोंकणी या भाषा प्रो० ब्लोक[२] सागतात. म्हणजे त्याच्या मते यादव-मराठींतहि अंत्य स्वर संपूर्णतः लोपला होता असें ठरते. प्रो० ब्लोक यांचें हें मत सगळेंच खरें नाही. कारण, यादव-मराठींत 'इ' आणि 'उ' हे अपभ्रंशा-तील अंत्य स्वर विकल्पानें कायम असलेले दिसतात. प्रथमेच्या पुल्लिंगी ए० व० तील 'उ.' (पंडितु, विवरु,—पंढरपूर शिाललेख); चतुर्थीच्या प्रत्ययांतील 'सि'; वर्तमानकाळाच्या तृ० पु० अ० व० चा प्रत्यय 'अति-इति'—या सर्व रूपांत अंत्य स्वर लोपलेला नाहीं. पुढें अंत्य स्वराची प्रक्रिया देतो.

१ प्राकृत अ > मराठीत लोप.

---

१ निबंध आणि भाषणें, पान ११९

२ La Langue Marathe, 37

माणूस [ मनुष्य ]; आठ [ सं० अष्ट > अट्ठ ]; पान [ पर्णम् > पण्णम ]; ताक [ तक्रम् > तक्कम ]; मन [ मनस् > मणं ]; काम [ कर्म > कम्म ]; आतीत [ आतिथ्य ]; सेद [ सदूक ]; 'ए'—तृ० ए० व० प्रत्यय [ सं०एन > एण, एण ]; अग्न [ अग्नेय ]

प्राकृत अ > म० इः आजि [ अद्य ]; कालि [ कल्य ]

२ प्राकृत आ > मराठीत लोप.

आस ( आशा ); जाघ ( जंघा ); लाज ( लज्जा ); वाट ( वर्त्मन् > वट्टा ); वेळ-ळु ( वेला ); पाडिसाळ ( प्रतिशाला ); सेज (शय्या); नीज ( निद्रा ); भीख ( भिक्षा ); भाख ( भाषा )

प्राकृत आ > म० ईः म्हैळी [ महिला ]; केळी [ क्रीडा ]

३ प्राकृत इ > मराठींत लोप [ विकल्पाने ]

आग-गि [ अग्निः ]; पड-डि [ प्रति ]; रात-ति [ रात्रिः ]; कुस [ कुक्षिः ]

४ प्राकृत ई > मराठी ई-इ.

केळी [ कदली ]; पाती [ पंक्ति ]; आगोळी [ अंगुलिः ]; सुई [ सूचिः ]; गोसाविणी [ गोस्वामिनी ]; तेलिणी [ प्रा० तेल्लिणी ]; कुकडी [ कुक्कुटी ]; जरि-तरि [ यर्हि-तर्हि ]; जोइसि [ ज्योतिषी ][२]

५ प्राकृत उ, ऊ > मराठी उ, ऊ.

विजू [ विद्युत् ]; ताधु [ तंतुः ]; 'औनु-ऊनु'-भूत कृदंताचा प्रत्यय [ अप० एप्पिणु, एविणु ]; भातारु [ भ्रातृ ]; 'उ'-पुल्लिंगी प्र० ए० व० प्रत्यय [ अप० 'उ': पुत्तु, णरु ]

६ प्राकृत ए, ओ > मराठी इ, उ.

'सि'—च० ए० व० प्रत्यय [ आर्श्वे ]; 'उ-ओ'-पुल्लिंगी प्र० ए० व० प्रत्यय [ प्रा० 'ओ' : नायको, राओ ]; आम्ही, तुम्ही [< प्रा० अम्हे, तुम्हे ]; कान्हु [ < प्रा० कान्हो ]

---

१ ही स्वरप्रक्रिया अति क्वचित् आढळते. उदा० ली० ३, दृ० ३६

२ पंढरपूर शिलालेख, ओळ ४

वरील प्रक्रिया पाहिल्या म्हणजे वर्तमान-मराठीत जो अंत्यस्वरलोप दिसतो त्याला यादव-मराठीत नुकता कोठें आरंभ झाला होता हें कळून येतें. प्राकृत-अपभ्रंशातील 'अ, आ, इ' या अंत्य स्वराचाच काय तो लोप तेव्हा होई. परंतु 'ई, उ, ऊ, ए, ओ' या स्वराचे लोप न होता त्याचे स्वरूप पालटे. याबाबत पुल्लिंगी प्र० ए० व० प्रत्ययाचा पुरावा सबळ आहे.

सं० स् > प्रा० ओ > अप० उ > यादव-मराठी 'उ' अशा परंपरेनें 'प्राकृत-ओ' व 'अपभ्रंश-उ' यादवकालीं होता. या 'उ' चे प्राबल्य इतकें झालें की तो इतर लिंगाना, क्रियापदाना, कृदंतांना, व क्वचित् क्रियाविशेषणानाहि लागू लागला. 'करितु, जातु, नावेकु, आशु, फ॰ु' अशी उकारान्त रूपे विपुल आढळतात. म्हणजे तत्कालीं अत्य स्वर उच्चारण्याचीच प्रवृत्ति होती, त्याचा लोप करण्याची नव्हती, हे या उकारावरून स्पष्ट आहे. दुसरे असे, कीं वर्तमान दक्षिण-कोकणींत अत्य स्वर ऱ्हस्व रूपाने शिल्लक आहेत. प्रो० ब्लोक[2] याच्या मते हे द्राविडी भाषाच्या ससर्गाने राहिले आहेत. वस्तुतः हे द्राविडीमुळे नव्हत, तर मूळचे आर्यच आहेत. डा० कात्रे[3] म्हणतात त्याप्रमाणे इ० स० १६०० च्या सुमारास गोव्याचे ब्राह्मण दक्षिण कानडात गेले ते बरोबर ऱ्हस्व अत्य स्वराचे उच्चार घेऊन आले व पुढे आजतागायत त्यानीं ते कानडीच्या संसर्गामुळें कायम टिकविले आहेत. डॉ० कात्रे म्हणतात—

"We are thus restricted to the first alternative that when the Konkani spoken by Kanara Sarasvats, Gouda Sarasvats, and Christians of S Kanara, separated from Goa stock, the final vowel was still pronounced, and it was only subsequent to this separation that the Northern dialects lost this vowel." (p. 107)

तात्पर्य, यादव-कालीं अंत्य स्वर पुष्कळ प्रमाणांत कायम होते, यादवोत्तर कालीं त्यांचा संपूर्ण लोप झाला, हेंच खरें. प्रांतिक बोलींची वाढ स्वतंत्र कशी असते, ते येथें दिसतें.

---

१ Dr. Grierson: Linguistic Survey of India, vol. VII, p. 188

२ La Langue Marathe. 37

३ Formation of Konkani, 17 (B. O. R. I. Vol. 18, part II)

## § ५ उपांत्य स्वर

महाराष्ट्री-प्राकृतातील उपात्य स्वर यादव-मराठींत बहुशः कायम आहेत. मात्र ऱ्हस्वाचे दीर्घ आणि दीर्घाचे ऱ्हस्व होतात. परंतु जुन्या पोथ्यातून ऱ्हस्वदीर्घांचा नियम पाळलेला नाहीं. ज्ञानेश्वरीच्या राजवाडे प्रतीत व महानुभाव ग्रंथात ऱ्हस्व-दीर्घांची निश्चिति नाही. तेव्हां त्या संबंधीं लिहिणें अशक्य आहे. पुढे प्रथम नियमित रूपे देऊन नंतर अपवाद देतों—

प्रा० अ > म० अ : माकड ( मर्कट ); पाथर ( प्रस्तरः ); कवाड ( कपाट ); सवत ( सपत्नी ); इंगल ( अंगार ); शाखळ ( शृखला ); दुकळु ( दुष्काळ ); कुंवर ( कुमार )

स्वरमात्रेतच केवळ बदल होतो, स्वरोच्चारात नाही.

प्रा० इ, उ > म० इ, उः दळवइ ( दलपतिः ); माणूस ( मनुष्य ); पूस ( पुच्छ ); वावरूल ( वामरूल ); माजिठी ( मंजिष्ट ); पाइक ( पदिक ); आविस ( आमिष ); नारिएळ ( नारिकेल )

वरील रूपात उपात्य स्वर अविकृत आहे. परतु याला अपवादात्मक अशीं बरीच उदाहरणे सापडतात. जसे—

प्रा० अ : देशाउर ( देशातर ): साबारीव ( संभारः ); लोणीचे ( लवण- ); कामीठा ( कर्मस्थानं )

प्रा० इ : उबग ( उद्विग्न ); मिथळा ( मिथिला ); निसाणि ( निःश्रेणि )[१]

प्रा० उः जावळ ( युगुल ); कुकडी ( कुक्कुटी ); सींगी ( शृंगी )

प्रो० ब्लोक् यांनीं वरील भिन्न रूपाची उपपत्ति गुजराती-हिंदीपासून सुचविली आहे. वस्तुतः अशी शंका घेण्याचें कारण नाहीं. उपात्य स्वर कायम राहणे वा बदलणें असे दोन्ही प्रकार मराठीचेच मानावेत. प्राकृत वैयाकरणहि क्वचित् उपांत्य-' इ ' चा ' अ ' झालेला सागतात.

प्राकृतांतील उपात्य स्वर मराठीत पुष्कळ ठिकाणीं अंत्य झालेला

१ Pischel : Grammatika, 115; and Hemachandra : VIII.i.88—

दिसतो. स्वरांतर्गत व्यंजनाच्या लोपामुळें ही प्रक्रिया संभवते. पहा—

हात (हस्त); नागारी (नागरिक); गहूं (गोधूम); बीं (बीज); म्हैळी (महिला); नौवरी (नववरिका); गौमासी (गोमक्षिका) आडौरी (अंतःपुरिका)

क्वचित् कोठें उपात्य आ ऱ्हस्व होतो. उदा० पैठण (प्रतिष्ठान); मसणवट (श्मशान); इगळ (अंगार); कुंवरी (कुमारी)

## § ६ उपांत्यपूर्व स्वर (Prepenultimate Vowels)

१. **आद्याक्षरांत:** आद्याक्षरावर साधारणतः आघात असल्यानें त्याची प्रक्रिया मराठीत फारशी नाही. परंतु स्वरप्रक्रिया नसली तरी मात्राप्रक्रिया भरपूर आहे. म्हणजे ऱ्हस्वीकरण विपुल आढळतें.

**अ < अ** : कढ (क्वथ्); फटिकु (स्फटिक); पन्हरें (पञ्चदश); अझुइ (अद्यापि); कव्हण (कः पुनर्); कसवटी (कर्षपट्टिका); घसणी (घर्ष); दलवै (दलपतिः); नडनाच (नटनृत्य); पडिसाद (प्रतिशब्द); मऱ्हाटी (महाराष्ट्री); संदु (छंदः); सवं (सम); कढन (कर्दन); गजराउ (गर्ज्); घडिवट (घटिकापात्र); नळनी (नलिनी) पडदनी (षड्द्विगुण); पवाड (प्रवृद्ध); भवंर (भ्रमर); महुर (मधुर); छत्तीस (षट्त्रिंशत्); पसाय (प्रसाद); धवळे (धव+ल); वरंव (वरम्); सए (सखे); कवडा (कपर्दिक): ; दहिभातु (दधि-); मढ (मठ); वनकर (वनकर); तण्हार (तृणागार); धवडूं (धृष्टः); अढाळ (आधार); म्हणौनि (भणित्वा)

**आ < आ**: काडगुंडा (काड-); कापडी (कार्पटिक); गाव (ग्राम) जाणत (ज्ञायत्); ताराण (तारुण्य); दारवंठा (द्वार); धाकिन्नला (प्राक्); धाडी (प्राड्); पाणियडा (पानीयवटः); पाहुणेर (प्राघूर्ण); पार्यातक (पारिजातक); मानिकुल (माणिक्यं+ल); माहो (माघः); राणा (राजन्); साइली (छाया); ठाणवै (स्थानवती); घाय (घातः); जाकलिजत (व्याकुल); पाहे (प्रार्थ्); वाखाणिले (व्याख्या); सावेव (सावयव); आइती (आयत्); टाळ (तालः); दाय (दान); बावन (का० बावन) हाकारणें (हाक्); जाई (जाति); सांवळा (श्यामल); सावंतु (सामंत); राउळ (राजकुल); नारिएल (नारिकेल); साडे (सार्ध); दाम (द्राम);

वाओ ( वातः ); पावणें ( प्राप् ); ~~सांतव ( साम्प्रत~~ ); भागार ( का० भागार ); सावज ( श्वापद ); गाणें-वाणें ( गायनं वादनं ); हाउळी ( आवली ); ~~साहाण ( पाषाण~~ ); भाख ( भाषा )

**आ < अ ( प्रा० ) :** आकणें ( अंक् ); आंगलग ( अंग- ); आनान ( अन्य अन्य ); आगी ( अग्निः ); आझुइं ( अद्यापि ); आथि ( अस्ति ); आपणपें ( आत्मत्वं ); आरौत ( अरतस् ); आविस ( अमिष ); काटी ( कंटकः ); ठाओ ( स्थः ); तातले ( तप्त ); ~~प्राह्क ( प्रदिक~~ ); पागूळ ( पंगु ); पाचाखरी ( पंचाक्षरी ); पाजिरा ( पंजरः ); पालव ( पल्लवः ); पाहारु ( प्रहरः ); माझारी ( मध्यगृहं ); राणी ( राज्ञी—प्रा० रण्णी ); सापें ( सप्रति ); कापूरकेळि ( कर्पूर- ); कामाठी ( कर्मस्थानं ); खाद ( स्कंधः ); गाभेवन ( गर्भपर्ण ); चाउरी ( चतुरिका ); चाकवरा ( चक्रवातः ); दांतिरी ( दंतः ); पाख ( पक्षः ;) मादना (-मर्दन ); हाथोवा ( हस्त- ); काजळ ( कज्जल ); कासव ( कच्छप ); गाढव ( गर्दभ ); चादिणे ( चंद्रिका ); चामडें ( चर्म ); जाघ ( जंघा ); जाभै ( जृभा ); पाथर ( प्रस्तर ); माती ( मृत्तिका ); माथा ( मस्तक ); वाकुडें ( वक्र ); वाढणे ( वर्धति ); वाती ( वर्तिका ); वासरूं (वत्स ); साझ ( संध्या ); कानडे ( कर्णाटक ); सासिन्नले ( संसद् ); आघात ( अग्रहस्तः ); पायस ( पयस् ); ताथु ( तंतु ); आधणा ( अंधस् )

**अ > आ :** अतीत ( आतिथ्य ); परावर्ण ( प्रावर्ण ); पवणे ( प्राप् ); अवझा ( वाह्य ); खरसाहाण ( क्षार- ); चवरें ( चामर ); शब्दसिद्धीचे प्रत्यय लागताना किंवा क्रियापदांचीं रूपें होताना आद्य ' अ ' ऱ्हस्व करण्याकडे यादव-मराठीची प्रवृत्ति आहे. एरव्हीं ' पलंग ' ( < प्रा० पल्ल < सं० पर्यंक ) व ' पालट ' ( < प्रा० पल्ल < सं० पर्यस्त ), ' भला ' ( < प्रा० भल्ल < सं० भद्र ) व ' भाला ' ( < प्रा० भल्ल ) या जोड्यांतील ऱ्हस्व ' अ ' ची उपपत्ति लागणार नाही. शिवाय, मराठींत ' अ ' आणि ' आ ' हीं अक्षरें पुष्कळ ठिकाणीं वर्णांतील मात्राभेद दाखवितात, उच्चारभेद दाखवीत नाहींत. त्यामुळें हा प्रश्न नीट सोडवितां येत नाहीं.

**इ, उ < इ–ई, उ–ऊ :** किडरूं ( कीटक ); किरूं ( किल ); गुंपणें

१ J. Bloch: La Langue Marathe, 48

( गुप् ); तुका ( का० तुक ); कुऱ्हाड ( कुठार ); जिनि ( जीवन ); जिव्हार ( जीव ); टिळा ( तिलक ); थडिवा ( तट ); धुळिरा ( धूलिः ); निच ( नित्य ); निडळ ( प्रा० णिडिळ ); निब्रळ ( निर्बल ); निलख ( निर्लेख ); निलाग ( निर्लाग ); पुढार ( पुरस्कार ); बिजाखर ( बीजाक्षर ); रिगणें ( रिघ् ); रीतहाती ( रिक्त- ); विणवणी ( विज्ञप्ति ); विसव ( विश्रम् ); सुरी ( क्षुरिका ); सुई ( सूचिः ); तुळसी ( तुलसी ); पिवळा ( पीतल ); पिळणे ( पीड् ;) पुनव ( पूर्णिमा )

तसेच शब्दातील अंत्य स्वर दीर्घ असल्यास पहिल्याचें ऱ्हस्वीकरण होतें. उदा० किवी ( क्रीटक ); रितें ( रिक्त ); सुने ( शून्य ); मुदी ( मुद्रिका ); सुई ( सूचि )[१]

सामान्यतः, द्व्यक्षरी शब्दात आद्य उ आणि इ हे दीर्घ असतात, व बव्हक्षरी शब्दात ते ऱ्हस्व असतात. हेच नियमाने सागावयाचे तर द्व्यक्षरी शब्दात ' उपात्य इ–उ ' दीर्घ असतात व सामासिक शब्दात ते ऱ्हस्व होतात. जसें—

**इ** : जीवु (जीव); पीठ ( पिष्ट ); दीठ (दृष्टिः ); पीळ (पीड् ); सीरी (श्री); दीवी ( दीपिका ); दीओ (दिवस); फूल (पुष्प)

**उ** : धूर (धूम्र); पूत (पुत्र); कूओ (कूप)

हे शब्द सामासिक झाले की त्यातील आद्य इ–उ चें ऱ्हस्वीकरण होतें. जसें–जियाला, दिविआचेनि, धुरातूनि, फुलौनि.

**ए, ओ :** हे स्वर वस्तुतः ऱ्हस्व आणि दीर्घ दोन्ही आहेत. परंतु मराठींत हा फरक दाखविण्यास चिन्हें नाहीत. कानडी लिपीत ' ऱ्हस्व ए ' व ' ऱ्हस्व ओ ' याकरिता वेगळी चिन्हें असल्यानें ' एक–एकासाठी, कोण–कोणाला ' यातील भेद नीट कळेतो. पुढील रूपांत ऱ्हस्व ए-ओ दिसतातः—

एकदरें; ओळगविणें ( का० वोळग ); गोसाविणी (गोस्वामिनी)

**दीर्घ ए-ओ—**

केणें (क्रयणं); के (किम् ); कोवळें (कोमल); खेंव (क्षेम); खेळ (खेल); खोपा ( का० कोप्प); गोरूं (गोरूप); चोराकुळ (चोर-); क्वचित्

१ Dr. Grierson: Linguistic Survey of India, Vol. VII, p. 168

ऱ्हस्वीकरण होता होता या आद्य स्वराचा 'अ' होतो. जसे—

अकरा (एकादश); वरि (उपरि)

तात्पर्य आद्याक्षरांतील 'आ, इ, उ' हे स्वर ऱ्हस्व करण्याकडे यादव-मराठीचा कल दिसतो.

यांखेरीज पुढील काही स्वरप्रक्रिया यादव–मराठींत आढळतात, त्या नियमात बसूं शकत नाहीत. उदा०

उ–ऊ : भूअरी (भ्रम्); सूत्र (क्षेत्र); कुसमळ (कश्मल)

ओ : मोहो (महा)

औ : आनौती (अन्यतः)

ए : सेंद (संदूक)

२. **आद्येतराक्षरांत : ( In the Non-initial Syllable ).**

शब्दाच्या अंतर्भागी 'इ-ई' आणि 'उ-ऊ' या ऱ्हस्व व दीर्घ स्वराचा यथार्थ उच्चार पुष्कळ ठिकाणी लोपून त्याचा 'अ' झालेला आढळतो. उदा०

**इ** : पडसाद (प्रतिशब्द); पाडवा (प्रतिपद्); पाखरुं-पाखिरुं (पक्षि+रूं); विखरणे (विष्किर); परणैली (परिणय); आगटी (अग्नि); निडळ (निटिल); मिथळा (मिथिला); मनकट (मणिकट); आळंगीले (आलिंगित); वरवड (उपरिपत्); उबगला (उद्विग्न); हळद (हरिद्रा)

**ई** : याचें प्रथम ऱ्हस्वीकरण होऊन, नंतर तो कायम राहिलाच तर सदा ऱ्हस्व असतो. उदा०

जोइशी (ज्योतिष्); गहिर (गभीर)

**उ** : आपडणें (आस्पृष्ट); पुरैतु (पुरोहित); माणसांचेनि (मनुष्य) कुकडी (कुक्कुटी); पडदनी (पटद्विगुण); आस्वपात (अश्रुपात); जावळ (युगुल)

**ऊ** : याची प्रक्रिया 'ई' प्रमाणें होते.

सेंद (संदूक); उन्मळणें (उन्मूलन); ताराण (तारुण्य)

**ए** : गवसैला (गवेषय्); उडणें (उड्डयते–प्रा० उड्डेइ); पालट (पर्यस्त–प्रा० पल्लेट्ट); नीसणी (निःश्रेणी); उपखा (उपेक्षा)

**ओ :** अळणी (अ + लवण); पारसैला (पर्युषित); उटणें ( उद्वर्तन-प्रा० उद्दोट्टण ); करटी (करोटि ); सुहावन ( सुशोभन )

'शब्दांतर्गत आ'च्या दोन भिन्न प्रक्रिया होतात. त्या अशा—

१ **-हस्वीकरण:** आ > अ : पळणें (पलायन); जानिवसा (जन्यवास); गोवळरुवे (गोपाल + रुं ); उजवणें ( उद्यापन ); आवस ( अमावास्या ); आरती ( आरात्रिका ); कढई (कटाह ); दुकळु (दुष्काळ)

२ **आ कायम** राहतो.

ताणार ( तृणागार ); दिवाळी ( दीपावली ); वाखाण (व्याख्यान); मऱ्हाठी (महाराष्ट्री); कामारी ( कर्मकारिन् ); चाम्हारू ( चर्मकार ); जाणविणे ( ज्ञापय् ); शेजार ( शय्यागार ); वेव्हारा ( व्यवहारक ); तहान ( तृष्णा ); नहाण ( स्नान ); आव ( तव्य ); शिवाय " आरा, आळु " या तद्धित प्रत्ययात: उभारा ( उद्भार ); पसारा ( प्रसृ ); विसावा ( विश्रम् )

वर 'इ, उ, ए ओ' या स्वराच्या -हस्वीकरणाची उदाहरणें दिलीं आहेत. मात्र हे -हस्वीकरण नियमाने होते असें नाही. प्रो० ब्लोक तसा नियम मानतात[1] तो मानता येणार नाही. कारण हे स्वर अविकृत राहिल्याची अनेक उदाहरणें यादव-मराठींत आहेत. जसें—पहिला ( प्रथम-प्रा० पहिल्ल ), बाउली ( दे० बाउल्ली ); सासुरें ( श्वशुर ); भींगुरटी ( भृंगी ); माजिवटे (मध्य + वट); परिणैली (परिणीत) वगैरे.

तात्पर्य, -हस्वीकरणाचा नियम नव्हता. मात्र या -हस्वीकरणाला प्रारंभ यादवकालीं न होतां त्यापूर्वी म्हणजे प्राकृतकालीं झाला होता असें पिशेलनें[2] दिलेल्या प्राकृतांतील -हस्वीकरणाच्या उदाहरणावरून वाटतें. यादवकालीं हें -हस्वीकरण प्राकृतापेक्षां बरेंच पुढें गेलें. पंढरपूरच्या शिलालेखांत फागनिपुर ( सं० फाल्गुनीपुर ) असें 'उ'चें 'अ' हे -हस्व रूप येतें. यादवोत्तरकालीं हें -हस्वीकरण आणखी पुढें गेलें. असो.

---

१ La Langue Marathe, 50

२ Prakrit Grammatika, 115 and 123

## § ७ प्राकृतांतील निकटवर्ती स्वर ( Vowels in contact )

प्राकृतात स्वरांतर्गत व्यंजनलोपामुळे दोन स्वर एकमेकांच्या सन्निध येत, परतु त्याचा संधि मात्र होत नसे. प्राकृतातील अशा दोन स्वरातील 'प्रगृह्य'[1] किंवा Hiatus क्वचित् 'य, व, र, ह' या वर्णांनी टाळले जाई हें खरें. काही जैन हस्तलिखितात आढळणाऱ्या य-व श्रुतींची उदाहरणें पिशेल[2] देतात. परंतु त्यांचा आणि अर्वाचीन भाषातील 'प्रगृह्य' निवारणाचा संबंध नसावा. यादव-मराठीत सन्निध स्वराच्या प्रगृह्याची व्यवस्था तीन प्रकारांनीं झालेली दिसते. ( १ ) 'य-श्रुति' किवा 'व-श्रुति'; ( २ ) दोन स्वराचा संयोग; ( ३ ) स्वरसक्षेप.

## § ८ 'य-श्रुति' किंवा 'व-श्रुति'

प्रो० ब्लोक याच्या मतें मराठीत 'य-श्रुति' अति क्वचित् येते. वस्तुतः ते मानतात तितकी ती विरल नाही. 'व' श्रुतीपेक्षा तिचें प्रमाण कमी आहे हें खरे. परंतु विशेषतः यादव-मराठीत 'य-श्रुती' चीं बरीच उदाहरणें आढळतात. तीं पुढें देतों—

सं० क : पढियार ( प्रीतिकर ); स्याळ ( शीतकाल )
सं० ग : सायर ( सागर )... "अभिलषितार्थ-चिंतामणी" त.
सं० ज : राय ( राजन् )
सं० त : घाय ( घात ); म्हणिये ( भणित ); माय ( मातृ ); आणियलें ( आनीत ); वाणियले ( वर्णित )
सं० द : पसाय ( प्रसाद ); पाय ( पाद ); सोयरा ( सहोदर )
सं० न : दाय ( दान )

शिवाय, यादव-मराठीत भूतकृदंतात 'य-श्रुति' नियमानें होते. श्रवण-बेळगोळच्या शिलालेखात 'श्रीचामुंडरायें करवियले' असें रूप आहे. प्राचीन मराठीचा भूतकृदंतातील 'य-श्रुति' हा एक विशेष होय.

---

१ 'प्रगृह्य' हा शब्द प्रो० वा० गो० परांजपे वापरतात. पहा— 'मराठी भाषेचा विकास', पान ९२, प्रो० ब्लोक यांच्या ग्रंथाचें भाषांतर.

२ Pischel: Prakrit Grammatika, 187

## व–श्रुति

सं० क : कीवी ( कीटकी ); नागवा ( नग्नकः ); कावुळा ( काक )
सं० ग : दुहवा ( दुर्भगा ); पराव ( परागत ); जुवळें ( युगल )
सं० ज : रावो ( राजन् )
सं० त : केवडा ( केतक ); घावो ( घात ); चेवो–ओ ( चित् )
सं० द : पावो ( पाद )
सं० प : मेळावा ( मेलापक ); सावज ( श्वापद ); कवडा ( कपर्दिक ); वरिपड ( उपरिपत् ); वावी ( वापी ); वहिल ( प्रथम ); परावर ( परात्पर ); दळवइ ( दलपति ); तावो ( ताप ); दीवी ( दीपिका ); वर्णी ( पार्नीय )
सं० भ : सुहाव ( सुशोभित ); लोवस ( लोभस )
सं० य : सावुली ( छाया ); माव ( माया ); प्रत्यवो ( प्रत्यय ); उपावो ( उपाय ); न्यावो ( न्याय ); संवधुर ( स्वयं– )
सं० ह : मेव्हणा ( मैथुन– ); वो–व्हो ( हो )

## § ९ संयुक्त स्वर

ऐ < अ + इ : बैस ( उपविश् ); म्हैषी ( महिषी ); पैज ( प्रतिज्ञा ); पैठण (प्रतिष्ठान); पैठ ( प्रविष्ट ); पैक ( पदिक ); म्हैळी ( महिला ); सैरा ( स्वैर ); आपैसे ( आत्म + ईदृश ); सैंवर ( स्वयंवर )

ऐ < अ + ए : एकैक ( एकएक ); पैस ( प्रवेश )

ऐ < इ : सनैधी ( सन्निधि )

औ < अ + उ : जौहर ( जतुगृह ); नौवरी ( नववरिका ); चापौल ( चंपकपुष्प ); अंतौरी ( अंतःपुरिका ); चौक ( चतुष्क ); चौथ ( चतुर्थ ); औट ( अर्धचतुर्थ )

औ < अ + ओ : किंसौरु ( किशोर ); पौळी ( प्रतोलि )

औ < उ : सौर ( शूर ); सौंदरु ( सुंदर )

'इ' चा 'ऐ' आणि 'उ' चा 'औ' झाल्याचीं उदाहरणें अति विरल आहेत. तीं बहुधा साम्याभासामुळें होत असावींत. तसेंच,

प्रथम स्वर दीर्घ असेल तर 'स्वरसंयोग' वा 'व–श्रुति' न होतां 'प्रगृह्य' कायम राहतें. उदा०

माउशी (मातृश्वसा); राउळ (राजकुल); गाई (गावी); पाउण (पादोन); नई (नदी); राउत (राजपुत्र); सुई (सूचिः); देशाउर (देशांतर); पाइक (पादिक)

## § १० स्वरसंक्षेप (Vowel Contraction)

प्रगृह्य टाळण्याची ही तिसरी रीति होय. हिचे पुढील प्रमाणे प्रकार आढळतात.

(१) आद्य स्वर 'अ' : अ + इ, उ, ए, ओ.

यादवकाली 'ऐ'चे ऱ्हस्वीकरण आजच्याइतकें नव्हतें. प्राकृत-अपभ्रंशकाली दोन सन्निध स्वरांचें प्रगृह्य, यादवकाली त्याचा संयोग व यादवोत्तरकाली संयुक्त स्वरांचें ऱ्हस्वीकरण असा क्रम दिसतो. त्यानुसार यादव-मराठीत 'ऐ' हा संयुक्त स्वर टिकलेला आहे. उदा०

| सं० | | यादवकाल | वर्तमान–मराठी |
|---|---|---|---|
| अधस्तात् | > | हैत | हेट |
| दलपति | > | दळवै | दळवी |
| सेनापति | > | सेणवै | सेणवी |

याचा अर्थ यादव-कालीं ऱ्हस्वीकरण नाही असा नव्हे. हे ऱ्हस्वीकरण शब्दाच्या अंतीच मात्र आढळतें. जसें —

सं० आनि (नपुं०प्र०अ०व०) > प्रा० आइं > म० एं
सं० अति (तृ० पु० ए० व०) > प्रा० अइ > म० ए
सं० आनि (आज्ञार्थ प्र० पु० ए० व०) > प्रा०आइं > म० एं
प्रा० आए (स्त्री० सामान्यरूप ए० व०) > म० ए

वर्तमान मराठींत 'ऐ' चें 'अ' असें ऱ्हस्वीकरण दिसतें. (उदा० तैस–तस; बैसणें–बसणें.) परंतु हें यादव-कालानंतरचें आहे. यादव-कालीं जैस, तैस, कैस अशीं संयुक्त स्वरांचींच रूपें मिळतात. तात्पर्य, द्विःस्वरापासून स्वरसंक्षेपाकडील भाषेच्या मार्गातील यादव-मराठी ही मधली पायरी होय.

वर्तमान मराठीतील स्वरसंक्षेपाची प्रो० ब्लोके याची उपपत्ति समाधान-कारक नाही.

औ > ओ : चोवीस (चतुः—); मोहर (मधुर)

औ > उ : राउळ (राजकुल); देउळ (देवकुल)

'ऐ' प्रमाणेच 'औ'ची रूपेहि यादव-कालीं वर्तमान-मराठीपेक्षा अधिक सापडतात. जसें, 'मागौता, औनि, औनिया' (वर्तमान मराठी : मागुता, ऊनि, ऊनिया).

प्राकृतांतील अंत्य 'औ'च्या 'ओ' आणि 'आ' अशा दोन भिन्न प्रक्रिया होतात. उदा०

जाणो (ज्ञायतु); आंबा (आम्रक); पाडिवा (प्रातिपद); आश्रो (आश्रय); पान्हा (प्रस्नु); सवा (सपाद); पाला (पल्लव); स्त्री० प्र० अ० व० आकारान्त नामाचें रूप 'माला' (प्रा० मालाओ)

वरील शब्दांत प्राकृतातील रूप 'अओ' असे असून मराठीतील 'आओ' असे आहे—तात्पर्य, या दोन रूपाच्या मध्ये 'औ' हा संयुक्त स्वर होता हे निश्चित.

## § ११ अ + अ

या दोहोपैकी एक स्वर दीर्घ असेल तेव्हा त्याचा संक्षेप 'आ' असा होतो. तीन प्रकार—

१ **प्रथम अ दीर्घः**

सं० आज : राउळ (राज-कुल); राउत (राजपुत्र)

सं० आत : वाव (वात)

सं० आद : सवा (सपाद); आरिसा (आदर्श); वाणे (वादन)

सं० आप : वावी (वापी); पवाडा (प्रवाद); तोवे (ताप)

सं० आव : दिवाळी (दीपावली)

सं० आय : वाणें (वायन)

---

१ La Langue Marathe, 58

सं० आका : पार ( प्राकार )

सं० आगा : कुलार ( कुलागार )

२ **द्वितीय अ दीर्घ :**

सं० अका : अंधार ( अंधकार ); चाम्हार ( चर्मकार );
कामार ( कर्मकार ); सोनार ( सुवर्णकार )

सं० अवा : उपास ( उपवास ); सावासु ( सहवास )

सं० अता : चारि ( चत्वारि )

सं० अवा : आंवस ( अमावास्या ); आव्हाट ( अपवाट )

सं० अगा : तण्हार ( तृणागार ); धवळार ( धवलागार )

सं० अया : भासुर ( भयासुर )

तसेच आकारान्त पुल्लिंगी नामाचें प्र० अ० व० एकारान्त होते, ते सुद्धां 'अक' या वृद्धीमुळेंच होय. जसें, सं० घोटकः > प्रा० घोडआ > म० घोडा–घोडे.

३ **दोन्ही स्वर ऱ्हस्व :**

संस्कृतातील 'अय' या स्वरसमूहाचें सक्षेपीकरण प्राकृतकालींच झाले होतें. उदा० पाली—'नेति' ( नयति ), 'लेण' ( लयन ) वगैरे. संस्कृतातील अशा दोन ऱ्हस्व स्वरात जर अल्पप्राण व्यंजन असेल तर प्राकृतात त्याचा 'य' होऊन मराठींत 'ए' होतो. जसे—

सं० अक : एं ( नपुं० प्र० ए० व० प्रत्यय ) आणि ए ( पुल्लिंगी प्र० अ० व० )...सुणें ( शुनकम् ); घोडे (घोटकाः)

सं० अज : नेण ( न ज्ञा )

सं० अत : गेल ( गत ); मेल ( मृत ); से ( शतम् ); से ( स्मृति ); सावें ( सांप्रत )

सं० अग : नेर ( नगर ); तेर ( तगर ); शेण ( छगण )

सं० अद : केल ( कदली ); बेर ( बदर )

तसेंच दोन ऱ्हस्व 'अ' मध्यें येणाऱ्या महाप्राणाचा लोप होऊन 'अ-अ' चा संयोग होतो. जसें:—

आण ( आभाण ); मऱ्हाठा ( महाराष्ट्रक ); आ ("अथ" लट

द्वि० पु० अ० व० प्रत्यय ); सावासु ( सहवास ); हातोया ( हस्त + उष्ण ); आर ( अजगर )

(२) **आद्य स्वर 'इ' किंवा 'ए' :—**

इ + अ > ए–इ ( शब्दांतर्गत ) :

१ ए : माहेर ( मातृगृह – माइअर ); येर ( इतर ); हें ( इदम् ); अहेवपणा ( अविधवा– ); नेट ( निकट ); नेहटी ( निकट ); सेवो ( सीमा )

२ इ : शीळ ( शीतल ); दीओ ( दिवस ); दीढु ( द्व्यर्ध ); जिणें ( जीवन ); कळी ( कलिका ); माउसी ( मातृश्वसा ); दहीं ( दधिक )

ए + अ > ए : वेणा ( वेदना ); केवडा ( केतक )

इ–ए+आ > य : स्याळी ( शीतकाल ); व्याही ( विवाही )

इ+इ > ई : अढीच ( अर्धतृतीय-अड्ढईज ); तीज ( तृतीय )

शब्दातर्गत ए+इ किंवा इ+ए > ए : नारियेळें[1] ( नारिकेल ); सुवेंझु ( सु+विद्ध ); शब्दातीं ए+इ किंवा इ+ए > इ : स्त्री० सामान्यरूप बुद्धी, मती ( प्रा० बुद्धीए, मतीए ); प्रयोजक आज्ञार्थी ई--करी, जाई ( प्रा० एहि ); नपुं० प्र० अ० व० ई–सुनीं (प्रा० अयाई )

इ + उ > इ [ अंतीं ] : वाणी (वणिज-प्रा० वाणियो-अप० यु); > उ (अंतर्गत) : उं-तुमंत (इतुम्); दुणावली (द्विगुणित)

(३) **आद्य स्वर उ किंवा ओ :**

उ + अ > ओ : वोवरें (वधूवरौ), मोहरे (मुखर), सोनार (सुवर्णकार)

उ + अ > उ : तूं (प्रा० तुमं < तुवम्); गहूं (गोधूम); जूआरी द्यूतकारी); नपुं० उकारान्त आणि ऊंकारान्त नामें 'उक' वृद्धीपासून; कुवा (कूप); जूं (युगम्)

---

१ हा शब्द यादवकाळानंतर "नारळ" असा झाला.

उ+उ > उ : उंबर (उदुंबर)
उ+ओ > उ : प्र० ए० व० 'उ' (सं० उको–प्रा० उओ)
उ+उ > ओ : गरोदर (गुरु+उदर)
उ+इ > ऊ :
ओ+अ > ओ : तोकडे (स्तोक); थोंव (स्तोम)
ओ+आ > ऊ : जळू (जलोका)
ओ+इ > ओ (अंतर्गत) : जोशी (ज्योतिषी); ओवी (अपपादिका)
> य–श्रुति : जोयिशी (ज्योतिषी)

## § १२ दोहोंहून अधिक स्वरांचा संक्षेप

आर (सं० अजगर–प्रा० अअअर); आला (सं० आगत–प्रा० आअअ); एं-हे (इदम्); पसारा (प्रसारित); स्त्री० प्र० अ० व० 'ई' (प्रा० इअए); नपुं० प्र० अ० व० 'ई' (प्रा० इआइं); सिं–तृ० ए० व० प्रत्यय (सहित)

याप्रमाणे तीन प्रकारची व्यवस्था यादवमराठी प्राकृतातील प्रग्रह्याची करते. प्राकृत–अपभ्रंशात स्वराच्या ज्या एकमेकाना टागलेल्या लगडी होत्या त्या मराठीच्या स्वभावाला खपत नाहीत. अतएव, वर्णप्रक्रियेच्या प्रातात या बाबतींत यादवमराठीचें पाऊल पुढे पडलें असून ती भारतीय भाषाच्या इतिहासातील एक उत्क्रात अवस्था होय यात संशय नाही.

## § १३ सानुनासिक स्वर

(१) **अंत्य अनुनासिकः** शब्दाच्या अंतीं अनुनासिक असतें तेव्हा त्यामागील दोन स्वराचा संक्षेप होताना, अनुनासिकीकरण होतें. जसें—

कें (किम्); शें (शतम्); सिं (सहितम्); नपुं० एं-ईं-ऊं प्रत्ययान्त प्र० ए० व० (प्रा० अअं, इअ, उअं)

मात्र अंत्यपूर्व अनुनासिक व्यजन मराठींत कायम राहिलें असेल तर अंत्य स्वराला अनुनासिकत्व येत नाहीं. उदा० लोणी (नवनीत)

यादव-मराठीच्या कांहीं विभक्तिप्रत्ययात 'न' या अनुनासिकाची विशेष प्रक्रिया झालेली दिसते.

षष्ठी अ० व० 'आं' < प्रा० आण (?) < सं० आनाम्

(प्राकृतांत 'आण' असेंच रूप आढळतें व त्यापासून मराठींतील 'आ' ची उपपत्ति नीटशी लागत नाही. तेव्हा अपभ्रंशांतील 'अहं-आहं' या एकवचनी 'आह' पासून सिद्ध झालेल्या प्रत्ययाकडे वळावे लागतें. तात्पर्य मराठींतील 'आ' हा ष० अ० व० प्रत्यय अपभ्रंशापासून निष्पन्न होतो.)

नपुं० प्र० अ० व० 'ईं' < प्रा० आइं-आणि < सं० आनि

तृतीया ए० व० 'एं' < अप० एं–ईं < प्रा० एणं < सं० एनें

म्हणजे मराठींतील वरील तीन विभक्तिप्रत्ययाबाबत अनुनासिकाची एक विशेष प्रक्रिया होते. 'न–ण' याचे प्राकृतात अनुस्वार किंवा सानुनासिक स्वर होऊन तीं रूपें अर्वाचीन भाषात उतरतात. अनुनासिकाचा सानुनासिक स्वर होण्यास अपभ्रंशकाली आरंभ झाला. कारण त्यांत 'आइं, आई, आंई' ही रूपे 'आणि' या रूपाच्या बरोबरीने आढळतात. गुजरातींत हाच प्रकार आहे.

द्विस्वरातर्गत 'म' या अनुनासिकाचा 'वं' होतो व शेवटीं हा अनुस्वार मागील वर्णावर जातो. जसे—भंवर (भ्रमर); लोंव (लोमन्); कुंवरी (कुमरी); चंवरें (चामर)

प्रत्ययातील स्वरातर्गत 'म' च्या प्रक्रियेंत मात्र 'व' हा ओष्ठ्य वर्ण लोपून केवळ अनुस्वार शिल्लक उरतो. जसे–

एं–ईं (प्रा० आमि–एमि) प्र० पु० ए० व० प्रत्यय.

---

१ La Langue Marathe, 66.

२ डॉ० ग्रियरसन हे मराठी ए < अप० एं < अहि अशी तृतीयेच्या प्रत्ययाची उपपत्ति लावतात. ते म्हणतात—

"It is equally permissible to look upon it as a contraction of the Loc. termination 'ahi' extended to the Instrumental"

--J. R. A. S. 1921, p. 260

(Critical Review of M. Bloch's La Langue Marathe).

३ Prof. Turner: Gujrati Phonology, J.R.A.S. 1921, pp 525–26

औं—ऊ (प्रा० आमो-अमो)—प्र० पु० अ० व० प्रत्यय.

(२) **शब्दांतर्गत ऱ्हस्व स्वर + अनुनासिक + व्यंजन** या समूहाच्या विविध प्रक्रिया होतात, त्या अशा—

(अ) ऱ्हस्व स्वर + अनुनासिक + अघोष व्यंजन.

(आ) दीर्घ सानुनासिक स्वर + अघोष व्यंजन :

चापौल (चंपकपुष्प); आकणे (अंक्); पाति (पंक्ति); साबारींव (संभार)

(इ) ऱ्हस्व स्वर + अनुनासिक + घोष व्यंजन. किंवा,

(ई) दीर्घ सानुनासिक स्वर + अनुनासिक + घोष व्यंजन :

आगवण (अंग-); डींगर (?); सेंभ (स्वयंभू); आगण (अंगण), आगीटोपरे (अग-); चांदिणें (चंद्रिका); भागार (का० भांगार); साघातु (संघात); शांखळ (श्रृंखला); वांझौटी (वंध्या)

(३) 'र' युक्त जोड व्यंजनें किंवा महाप्राण तालव्ययुक्त जोड व्यंजने याच्या मागील दीर्घ स्वराला अनुनासिकत्व आलेले दिसते. जसे—

कासव (कच्छप), बाबळणे (भर्भ्), वाकी (वक्र), आंथुरण (आस्तृ), कांकडी (कर्कटिका), आख (अक्ष); विंचू (वृश्चिक), आसू (अश्रु), साचोकार (सत्य-ङ्क)

(टीप—दक्षिण कोंकणी भाषेत[1] वरील अनुस्वार नाहीं. तो नसणें हा इंडो-आर्यन भाषांचा स्वभावच आहे. मराठीनें तो स्वतंत्रपणें निर्मिलेला दिसतो.)

(४) वरील नियमात बसत नाहीत अशी अनुनासिकत्वाची उदाहरणे मराठीत दिसतात. यातील काहीं इतर इंडो-आर्यनमध्ये असून काही केवळ यादव-मराठींतच आहेत. उदा०

काच (काच), लट् द्वि० पु० अ० व० प्रत्यय 'आ' (सं० अथ), तुवा—तृ० ए० व० (सं० त्वया), किंसौरु (किशोर), खंति (क्षिति)

यातील कांहीची उपपत्ति दीर्घ स्वरानें लाविता येते.

(५) वर्तमान मराठींत अनुस्वारलोपाची उदाहरणे बरींच आहेत.

---

१ S. M. Katre: Formation of Konkani, (B.O.R.I., Vol. 18, p.252)

यादव-मराठींत अनुस्वारलोप विशेष दिसत नाहीं. माचा (मंचक), सलग (संलग्न), भुई (भूमि), भीतर (अभ्यंतर), अति—लट् तृ० पु० अ० व० प्रत्यय (अन्ति), अत—वर्त० कृ० प्रत्यय (प्रा० अन्त), माथुल (मंथ्), पुसणें (पृच्छ्)

वर्तमान कृदंताचा 'अत' प्रत्यय निरनुनासिक खरा; परंतु यादव-मराठींत 'हो, दे, पाह, अस' वगैरे काहीं मोजक्या धातूंची वर्त० कृदते मात्र सानुनासिक आढळतात. त्याची रूपे 'होत (भवत्), देत, पात, सात (होत-साता)' अशीं होतात. उदा०

> "अकालिचीं अभ्रें जैसी। ऊर्मीवीण आकाशी।
> द्वारपति आपैसी। उदैलीं **सांतीं**"॥ ज्ञा० ४—११६

तात्पर्य, वर्तमान मराठींतील अनुस्वारलोपाचे प्रमाण यादव-मराठीत नव्हते. तत्काली ही प्रथा आजच्याइतकी व्यापक नव्हती हे वर्तमान कृदंताच्या वरील काही सानुनासिक रूपावरून दिसते.

(टीप—यादव-मराठी कालांतील ज्या पोथ्या उपलब्ध आहेत त्यांत अनुस्वार देण्यासंबंधी नियम असा दिसतच नाहीं. राजवाडे-ज्ञानेश्वरी, उद्धवगीता, पंचतंत्र वगैरे अस्सल पोथ्यांवरून प्रकाशित झालेले ग्रंथ पहावेत. त्यांत अनुस्वार लेखकानें मन मानेल तेथें दिले असल्यानें एतत्प्रकरणीं वरील ग्रंथांवर व एकंदर सर्व यादवकालीन मराठी ग्रंथांवर विसंबून चालणार नाही.)

## § १४ मराठी स्वर

यादव-मराठीतील स्वरप्रक्रियेची रूपरेषा आता निश्चित होईल. संस्कृत—प्राकृत—अपभ्रंश या परंपरेनें यादव-मराठीच्या ज्या स्वरप्रक्रिया झाल्या त्याचें हें ऐतिहासिक व औपपत्तिक समालोचन होय. पुढें प्रत्येक स्वरोच्चाराचें मूळ दाखविताना जे आंकडे वापरले आहेत ते येथवरच्या चर्चेतील पोटविभागांच्या परिच्छेदाचे क्रमाक होत.

## § १५ अ

आद्याक्षरातील :

मराठी अ = प्रा० अ < सं० अ क्र० ६—१
= प्रा० अ < सं० ऋ क्र० २—१
= स्वरसंक्षेपामुळें क्र० १०

मध्याक्षरातील :

मराठी अ = सर्व संस्कृत व प्राकृत स्वर.

अंत्याक्षरातील :

मराठी अ = सं० प्रा० अंत्य आ ( स्त्री० नामांचा )
= सं० प्रा० अंत्य अ ( नपुं० नामाचा )

संस्कृत 'इ, ए' आणि 'उ, ओ' यापासून सिद्ध झालेल्या 'इ-उ' शी संयोग पावून मराठी 'अ' चे 'ऐ-औ' हे संयुक्त स्वर होतात. क्र० ९

मराठी अ = सस्कृत ए ( अति क्वचित् ) क्र० ६

## § १६ आ

आद्याक्षरांतील :

मराठी आ = प्रा० आ < सं० आ क्र० ६–१
= प्रा० अ ( द्वित्ताक्षरांतील ) < स० आ-अ क्र०६
= प्रा० अ-आ ( द्वित्त ) < स० ऋ ( द्वित्तांतील ) क्र० २–१

आद्येतर :

मराठी आ = प्रा० आ + आ क्र० ६–२

## § १७ इ

आद्याक्षरातील :

मराठी इ = प्रा० इ < सं० इ क्र० ६–१
= प्रा० इ < सं० ऋ क्र० २–२
= प्रा० ए क्र० ६–१
= सं० अ ( इंगळ < सं० अंगार; निडळ < सं० ललाट )
= सं० ऐ : निवेदु ( नैवेद्य ); विरू ( वैर )

मध्याक्षरातील :

मराठी इ = प्रा० इ < सं० इ किंवा ऋ क्र० ६–१, २
= प्रा० अ <सं० अ ( क्वचित् ) मंजिरी ( सं० मंजरी )
= सं० ऐ : कुचिळें ( कुचैल )

अंत्याक्षरातील :

मराठी इ = प्रा० इआ < सं० इका क्र० १०
= प्रा० सं० ई ( स्त्री० नामाची )
= प्रा० इउ ( म० जावइ < प्रा० जामातिउ )
= प्रा० सं० अंत्य ए
( म० आम्ही-तुम्ही < प्रा० अम्हे-तुंम्हे )
= प्रा० अइ ( दळवइ < प्रा० दळवई )
= स० इक : नागारी ( नागरिक ); गुळहारी.

काही ठिकाणी 'इ' स० 'य' पासून येऊं शकतो. उदा० भीतर ( स० अभ्यंतरम् ); भिजणें ( सं० अभ्यंजते ); विजण ( व्यजन ); जानिवसा ( जन्यवास ); चक्रवीहु ( चक्रव्यूह )

## § १८ ई

( आद्य ) मराठी ई = प्रा० 'इ' ( द्व्यक्षरी शब्दात )
= प्रा० ई < सं० ई + जोडाक्षर. क्र० ६
= प्रा० ई < सं० ऋ + जोडाक्षर. क्र० २-२
= प्रा० इ ( द्वित्तातील ) < सं० ई + जोडाक्षर

( अंत्य ) 'ई' चें स्वरूप निश्चित नाहीं. कारण ती ऱ्हस्व व दीर्घ दोही रूपात आढळते. म्हणून, अंत्य 'इ' चें विवेचन येथें लागू आहे.

य < ई : वीभिचारु ( व्याभिचार ); अतींतु ( अत्यंत )

## § १९ उ

आद्याक्षरांतील :

मराठी उ = प्रा० उ < सं० उ क्र० ६
= प्रा० उ < सं० ऋ क्र० २-३
= मूळ औ, इउ, उ-, ओ-, या स्वरांच्या संक्षेपा· मुळें क्र० १०

---

१ Prof. Turner suggests derivation from MIA "amhehi, tumhehi"–the plural forms. See: B. S. O. S. (London), Vol. VIII, p. 205.

प्रा० ओ > अप० उ

= प्रा० सं० इ ... बुंद (बिंदु); दुपाहार (द्विप्रहर).

अंत्य उ = प्रा० ओ > अप० उ

यादव-मराठीत क्वचित् 'उ' आणि 'अ' ही दोन्ही रूपें एकदमच दिसतात. उदा० 'पाटेफुटे' (लीळाचरित्र, स्मृति० वगैरे.) सं० पट-पासून दोही शब्द निघतात. परंतु अर्थभेद दर्शविण्यासाठींच अशी भिन्न रूपे होत असावीत. दुसरे उदाहरण झरणे व झुरणें (सं० क्षर्) हे आहे.

## § २० ऊ

आद्याक्षरांतील :

मराठी ऊ = प्रा० उ < स० उ किंवा ऋ क्र० २–३

= प्रा० ऊ < सं० ऊ क्र० ६–१

= प्रा० ऊ < स० ऊं किंवा ऋ + जोडाक्षर

'अंत्य ऊ' चे स्वरूप 'अंत्य ई' प्रमाणेंच निश्चित नाही.

याशिवाय आद्य स्वर उ किंवा ओ असलेल्या प्राकृतातील स्वरसमूहाच्या संक्षेपापासूनहि 'ऊ' निघतो. क्र० १०

## § २१ ए

आद्य ए = प्रा० ए < सं० ए: शेत (क्षेत्र); वेताटी (वेत्रयष्टि); शेटी (श्रेष्ठी); देउळ (देवकुल); एं (एन)

< सं० ऐ. तेली (तैल्य); मेहुण (मैथुन)

< सं० इ. देह (दिह्), नेहटी (निकट)

मध्य-अंत्य ए = सं० अय > प्रा० ए-अय : अतिशे (अतिशय), वळें (वलय); जे (जय); पेहे (पयस्); लेणें (रत्न-प्रा० लयण); उभे (उभय)

= स० अ : वेल (वल्लि); सेज (शय्या); मेर (मर्यादा); वेन्ही (का० वरि);

= प्रा० ए < सं० ई : खेळु (सं० क्रीड्–प्रा० खेल)

= सं० इय : नेम (नियम)

= सं० इ : बेल (बिल्व ;) पेढारी (पिंड-); सुवेंझ (सुविद्ध)

= सं० अक.

संक्षेपामुळे येणारा ए < प्रा० अअ < सं० अक, अग, अज, अत, अद.

ए < सं० य : ... वेसन (व्यसन); वेथा (व्यथा); वेवहार (व्यवहार); अंतेज (अंत्यज)

## § २२ ओ

आद्य ओ = प्रा० ओ < सं० ओ : सोळा (षोडश); होट (ओष्ठ); कोंवळीक (कोमल–); जोगा (योग्य)

= प्रा० ओ < सं० औ : मोती (मौक्तिक); सोरट (सौराष्ट्र) कोडे (कौतुक); मोल (मौल्य); वोवरे (वधूवरौ),

< सं० अप : वोपणे (अर्प्); तोवे (तप्त), ओवरी (अप—)

< स० अव : लोणी (नवनीत); नोवरा (नववर); वोदरे (अवद्द)

< सं० उव : सोने (सुवर्ण)

= प्रा० उव < सं० उप : वोळख (उपलक्ष्)

< सं० उ : पोखरिणी (पुष्करिणी); सोवासनी (सुवासिनी)

'ओ' चा 'व' शीं विकल्प होतो. उ० ह० ओल-वोल (आर्द्र); ओठ-वोठ (ओष्ठ); ओपणें-वोपणें (अर्प्); ओहळवोहळ (ओघ); ओझें- वोझें (वह्य)

मराठी ओ[१] = प्रा० सं० अ : चोच (चंचु)

मागील अक्षरांतील 'ओ' मुळें 'मध्य ह' चा 'हो' झालेला यादव-मराठींत क्वचित् दिसतो. उदा० मोहोरलेनि (मधुर); डोहोळा (दोहद). ही लकब विशेषतः कोंकणी भाषेची आहे.

---

१ Dr. Grierson: Linguistic Survey of India, Vol. VII. pp. 157–167

प्रथम स्वर ‘ उ ’ किंवा ‘ ओ ’ असलेल्या प्राकृतातील स्वरसमूहाच्या संक्षेपानें कधी मराठीत ‘ ओ ’ होतो. उदा०

आद्य ओ < सं० ऊ : सोरू ( शूकर ); सोपारे ( शूर्पारक )

## § २३ व्यंजनप्रक्रिया— इतिहास

वर्तमान भारतीय–आर्य भाषातील व्यंजनांची ऐतिहासिक परंपरा अपभ्रंश, प्राकृत याच्या मार्फत थेट संस्कृतापर्यंत जाऊन पोहोचते. ज्या तत्त्वांनीं प्राचीन संस्कृतांतील व्यंजनाची प्रक्रिया झाली त्याचे संपूर्ण विवेचन प्रो० टर्नर यानी ‘ **गुजरातीची वर्णप्रक्रिया** ’[१] यात केले आहे. तें यादव-मराठीलाहि उपयुक्त असल्यानें प्रथम व्यजनप्रक्रियेची ऐतिहासिक रूपरेषा पुढें देतों.

व्यंजनाचा उच्चार अधिकाधिक अस्पष्ट व दुर्बल होत गेल्यामुळें संस्कृतातून तीं व्यजने प्राकृत–अपभ्रंशात उतरताना पुढील प्रकार होतात. ( १ ) अंत्य व्यंजनाचा लोप; ( २ ) व्यंजनसमूहातील वर्णसंयोग; ( ३ ) स्वरांतर्गत व्यंजन मृदु होऊन पुढें त्याचा लोप होणे ( मूर्धन्य व्यंजनाखेरीज ). या तीन दिशानीं व्यजनाची वाढ झाली. पाली या प्राकृतातील प्राचीनतम भाषेंत अंत्यव्यंजनलोप असून जोडाक्षरांतील वर्णसयोगहि झालेला आहे. परंतु स्वरातर्गत व्यंजनलोप मात्र तींत नाहीं. त्याचा आरंभ पुढील प्राकृतांत दिसतो. वरील तीन प्रकारच्या प्रगतीचा विचार चार विभागांत करितां येईल.

( अ ) सं० अंत्य व्यंजन > प्रा० लुप्त > मराठी लुप्त

(आ) सं० आद्य व्यंजन > प्रा० अप० म० अविकृत

( इ ) स्वरातर्गत व्यंजन–संस्कृतातील :

१ सं० कठोर > प्रा० मृदु > म० लुप्त

२ सं० कठोर महाप्राण > प्रा० मृदु महाप्राण–‘ ह ’ > म० ह

( ई ) सं० व्यंजनसमूह > प्रा० द्वित्त व्यंजन > म० पूर्वस्वर दीर्घ + शुद्ध व्यंजन.

> म० द्वित्त

वरील नियम अर्थातच निरपवाद नाहीत. मागधीत व शौरसेनींत

---

१ Gujrati Phonology, J.R.A.S. 1921, pp. 505–508

स्वरांतर्गत व्यंजनलोपाला आरंभ झाल्यावरसुद्धा दंत्य वर्ण कायमच दिसतात. म्हणजे या नियमांनीं प्राकृत-अपभ्रंशाच्या विकासाचें दिग्दर्शनच मात्र होते असें डॉ० कात्रे एतत्प्रकरणी म्हणतात तें योग्य होयें.

## § २४ आद्य व्यंजन

संस्कृतांतील आद्य व्यंजने काहीं अपवाद सोडून अविकृत राहतात. हे अपवाद म्हणजे न, य, आणि महाप्राणासंबंधीं होत. पैकी,

सं० न > प्रा० ण > अप० ण > म० न

सं० नागर > प्रा० णायर > म० नागर

सं० नदी > प्रा० णई > म० नदी

सं० नयति > प्रा० णेइ > म० नेई

सं० य > प्रा० ज > अप० ज > म० ज

सं० युगुल > प्रा० जुउळ > म० जावळें

सं० यत्न > प्रा० जअण > म० जतन

सं० याचना > प्रा० जाअणा > म० जाचना

## § २५ महाप्राणत्व Aspiration

परंतु वरील दोन प्रक्रियापेक्षा अल्पप्राणाचा महाप्राण होण्याची प्रक्रिया अधिक व्यापक स्वरूपाची आहे. प्रो० ब्लोक यानी एकदर इंडो-आर्यन भाषांतील महाप्राणत्वाचा विस्ताराने विचार केला आहे, त्यावरून यादव-मराठीत महाप्राणत्वाचे दोन प्रकार मानावे लागतात, ते असे:

(अ) अल्पप्राणाचा महाप्राण प्राकृतद्वारा आलेला; आणि

(आ) यादव-मराठीने स्वतंत्रपणें, प्राकृताला सोडून, केलेला अल्पप्राणाचा महाप्राण.

---

१ " These principles only express the laws under favourable conditions. Thus, these laws summarise the tendency in a given language which will ultimately reduce the language to a norm---". Dr. S. M. Katre.--B. O. R. I. Vol. XVIII, p. 263

२ L' indo aryen, pp. 59-62

## § २६ परंपरागत महाप्राणत्व

पुढील सं० आद्य अल्पप्राण प्राकृतात व मराठीत महाप्राण होतात.

खेळणे ( क्रीड्–प्रा० खेलइ ); झाड ( जाट–प्रा० झाडं ) ; खापर ( कुर्पर–प्रा० खोप्पर ); खिळा ( कीलक–प्रा० खीलओ ); खुजें ( कुब्ज–प्रा० खुज्ज ); ढुलणे ( दे० डुल–प्रा० ढुल्ल ); फरस परशु–प्रा० फरस ); ~~झोप ( का० जोंप–झोंप~~ ); घागरी ( गर्गरिका-प्रा० घग्गरिआ ); फुल्लि ( पुष्प–प्रा० फुल्ल ); म्हइळी ( महिला ); म्हैस ( महिषी )

वरील महाप्राणत्वाची प्रो० याकोबी यानी दिलेली उपपत्तिच बरीचशी प्रो० ब्लोक मान्य करितातं. ती अशी, की पुढें येणाऱ्या 'र' किंवा 'स' मुळे, महाप्राणत्व येतें. तसेच, प्राकृतात लोपलेल्या संस्कृतातील ऊष्मवर्णामुळेंहि हे महाप्राणत्व येऊं शकेल.

## § २७ स्वतंत्रतः सिद्ध महाप्राणत्व

वरील उदाहरणांच्या बरोबर यादव-मराठीनें स्वतंत्रपणें केलेले आद्य अल्पप्राणांचे महाप्राण आढळतात. प्राकृतात हे अल्पप्राणच आहेत. परंतु यादवकाली यादव-मराठी ही संस्कृत-प्राकृत अल्पप्राणांचे महाप्राण करिते. उदा०

ख : खांक ( कक्षा-प्रा० कक्खा ); खाकरणें ( कखति-प्रा० कक्खइ ); खैवंग ( कट्वांग- ); खोमणे ( दे० कोम )

झ : झळाळ ( ज्वल् )

ठ : ठीकलग, ठीकवणी ( ? )

थ : थडिवा ( तटि )

ध : धा ( दश–प्रा० दह )

फ : फडतरैले ( प्रस्फुट–प्रा० पप्फुड्ड ); फुटा ( पट )

---

१ "Initial 'Jh' in Indo-Aryan", S.M. Katre. ( Calcutta Oriental Journal, II, p. 104. )

२ La langue Marathe, 84

भ : भोळा ( बहुलक ? )

ह : हाउळी ( = समूह ......स० आवली )

या प्रक्रियेचीं उदाहरणें मराठींत अति अल्प आहेत. कोकणींत ती विपुल आढळतात. पुढील वर्णातील महाप्राण लोपल्यामुळें वरील ठिकाणी आद्याक्षरांत महाप्राण येतो.

## § २८ अंत्य आणि मध्य महाप्राणत्व

या प्रक्रियेची उदाहरणें मराठीत थोडीच आहेत.

आंखणे ( अंक् ); वाखळ ( वल्कल ); जाभूळ ( जाब ); मढे ( मृत ); गुंफा ( गुप् ); पंढरपूर ( का० पंडरि ? ); दीठी ( दृष्टि ); आघाओ ( अग्रीयः ); पाढियासणे ( प्रतिभास् ); धुवाठी ( धूलिवटिका ); भारथ ( भारत ); कामाठी ( कर्मवटिका ); हाथिएर ( हत्यार ); वोल्हास ( आर्द्रांश ); आधोली ( आदोलः ); ताथु ( ततु )

## § २९ महाप्राणत्वलोप De-aspiration

ही प्रक्रिया वरील प्रक्रियेच्या अगदी उलट आहे. यात व्यंजनांतील महाप्राणत्वाचा लोप होऊन ते अल्पप्राण होतें. या प्रक्रियेचे दोन विभाग पडतातः—

**१ आद्याक्षरांतः** महाप्राण आद्याक्षराच्या जागी अल्पप्राण आल्याची स्थळे यादव-मराठीत फार थोडी आहेत. कोकणीत मात्र आद्याक्षरातील महाप्राणत्वलोप विपुल आहे. मराठीतील उदाहरणे पुढे देतों—

क < ख : काडणें ( खंड् )

त < थ : तुरतुरूं ( नेपाळी : थुरथुरि )

ब < भ : बाइल ( भार्या–भारिआ–भाइरा )

ट < ठ : टाकितु ( स्था-ष्ठा ); टेवामांडणी ( स्था )

१ यादव-मराठींत आद्य ' म ' क्वचित् ' भ ' होतो. उदा० भासळलें ( मिश्रित )

२ Formation of Konkani–S. M. Katre, B. O. R. I., Vol.18. pp. 362–3

२ आद्येतराक्षरांत :

( अ ) **शब्दांतीं—**

क < ख : भाक (भाषा), साकोपसाकीं (शाखा), जोतीक (ज्योतिष), भीक (भिक्षा), डंकु (दंश-डंख)

ग < घ : सीग्र (शीघ्र), जाग (जंघा)

ज < झ : माजी (मध्य), गूज (गुह्य), साज (संध्या)

ट < ठ : पाट (पृष्ठ), साटि (षष्टि), पालट (पर्यस्त), सातीपाठ (शातिपाठ)

ड < ढ : दीडु (द्व्यर्ध-प्रा० दिवड्ढ), कोड (कुष्ठ), साडेपन्हरे (सार्ध-)

त < थ : हातु (हस्त-प्रा० हत्थ), वीत (वितस्ति)

द < ध : सादि (संधि), खादु (स्कंध), बांद (बंध), निषेदु (निषेध)

प < फ :

ब < भ : गाब (गर्भ)

य < ह : (पाये पाहे-सं० पश्यामि)

( आ ) **शब्दाच्या मध्यभागीं—**

क < ख : दुकाळ (दुष्काळ), सुके (शुष्क-प्रा० सुक्ख), शिकणें (शिक्ष्-सिक्ख), साकुर (शर्करा-प्रा० सक्खरा), साकळ (शृंखला), आइकणें (प्रा० आइक्खइ), विकुरणे (विष्किर)

ग < घ : मगण (महिमन्), सांगड (संघट्ट)

ज < झ : शिजणें (सिध्यति), वाजांत्र (वाद्ययंत्र-प्रा० वज्झयंत्र), समजणें (संज्ञा-प्रा० संझा)

ट < ठ : अडतीस (अष्ट-), पिटणें (पिष्ट-पिट्ठ), घाटणें (घृष्ट)

ड < ढ : अडैच (अर्धतृतीय), हाडगुड (अस्थि-),

त < थ : हातरीती (हस्तरिक्ता), अस्तिति (स्थिति)

द < ध : मदराति ( मध्यरात्रि )

प < फ : आपडणे ( आस्पृष्ट–प्रा० आफ्फुड्ड )

ब < भ : सेबुड ( श्लेष्मन् ), तांबजाली ( ताम्र–प्रा० तांभ )

हीच प्रक्रिया ‘ ह ’ या महाप्राणाच्या लोपालाहि लागू आहे. विशेषत: कांही संख्यावाचक विशेषणात आणि पुल्लिंगी नामाच्या सामान्य रूपात ‘ ह–लोप ’ अधिक दिसतो. उदा०

म० अकरा ( अप० एक्कारह, सं० एकादश )

म० बारा ( अप० बारह–सं० द्वादश )......वगैरे.

तसेच सामान्य रूपाचा प्रत्यय:—

एकवचनी ‘ आ ’ ( अप० अह, सं० स्य )

अनेकवचनी ‘ आं ’ ( अप० आहं, सं० णाम् )

## § ३० मराठी व्यंजनांचे उच्चार

मागें क्र० २३ मध्ये मराठीतील व्यंजनाची चार भिन्न दिशानी होणारी प्रक्रिया पाहिली. ते चार प्रकार असे—

१ सं० अंत्यव्यंजनलोप

२ सं० आद्यव्यंजनविकृति

३ सं० स्वरांतर्गत व्यंजनांच्या दोन प्रक्रिया

४ सं० व्यजनसमूहाच्या दोन प्रक्रिया.

या प्रक्रियामुळें यादव-मराठीची व्यंजनव्यवस्था पुढीलप्रमाणे झाली आहे.

कंठ्य : क् ख् ग् घ्

तालव्य : च् छ् ज् झ्

मूर्धन्य : ट् ठ् ड् ढ्

दंत्य : त् थ् द् ध्

ओष्ठय : प् फ् ब् भ्

दंत्यतालव्य : चॅ् छॅ् जॅ् झॅ्

ऊष्मे : श् ष् स्

अर्धस्वर : य् व्· र् ल़

अनुनासिक : ण् न् म्

वरील व्यजनाचे उच्चार व त्यांची ऐतिहासिक परंपरा पुढें देतों.

## § ३१ कंठ्य व्यंजनें

'क, ख, ग, घ' या कंठ्याचा उच्चार आणि उच्चारस्थाने हीं संस्कृत, प्राकृत, अपभ्रंशाप्रमाणेच मराठीत, कांही फरक न होतां, उतरली आहेत. गोंव्याच्या किरिस्तावांच्या बोलीत कांही ठिकाणी 'ख' चा 'फ' झालेला दिसतो. यादवकालीन ग्रांथिक मराठीत ही प्रक्रिया कोठेंहि नाही.

## § ३२ तालव्य व्यंजनें

संस्कृतातील शुद्ध तालव्याचे उच्चार प्राकृतकाली विकृत झाले. यादव-मराठीतहि प्राकृत-अपभ्रंशाप्रमाणे शुद्धतालव्य व दंत्यतालव्य असे दोन्ह तऱ्हेचे उच्चार आहेत. सर्व तत्सम शब्दात व 'इ-ए' हे स्वर पुढे असणाऱ्या तद्भव शब्दांत 'च, छ, ज, झ' याचे उच्चार शुद्ध तालव्य होतात. इतर स्थळी दंत्यतालव्य होतात. यासंबधी चर्चा प्रस्तावनेत आली आहे. डॉ० कात्रे याच्या मते तर मूळ आर्य भाषेतील शुद्ध तालव्य उच्चार मराठीत नाहीतच. त्याच्या म्हणण्याप्रमाणे शुद्ध तालव्याचे दोन प्रकार होऊन वर्तमान भाषेंत उतरले आहेत.

## § ३२ (अ). तालव्य 'छ'

संस्कृतामध्यें 'छ' हा वास्तविक मूळचा 'च' चा महाप्राण नाही असे मत प्रो० ब्लोक यानीं वाकरनागेलचें अनुकरण करून मांडिलें आहे. संस्कृतांत 'स्वरातर्गत छ' चा उच्चार त्याच्या मतें नेहमीच द्वित्व पावतो. यादव-मराठीपुरतें पाहिल्यास प्रो० ब्लोक याच्या वरील मतास बळकट आधार मिळतो. यादव-मराठीत आद्याक्षरांतील व स्वरांतर्गत 'छ' चा 'स' झालेला अनेक ठिकाणीं दिसतो. (पहा–पुढें क्र० ४७). वर्तमान

---

१ (a) Palato-alveolar, (b) Dento-alveolar. — -Formation of Konkani, 84 (B. O. R. I. vol. 18)

२ La Langue Marathe, 102

मराठींत ही प्रक्रिया इतकी जोराची दिसत नाहीं. याचें कारण ती प्रक्रिया मंद झाली असा नव्हे; तर वर्तमान-मराठींत छ-युक्त शब्द तत्समच अधिक प्रमाणात वापरण्यांत येतात, हे आहे. असो. यादव-मराठीतील 'छ-स' ची प्रक्रिया अति प्राचीन आहे. अशोकाच्या शिलालेखात सं० चिकित्सा याचें चिकिच्छा असें न होता 'चिकिसा' असे रूप होतें. तसेच पुढील उदाहरणें ।चित्य आहेत.

| संस्कृत | पाली |
| --- | --- |
| ककुच्छंद | ककुसंद |
| कृच्छ्र | कसिर |

तसेंच हेमचंद्र स० प्रोञ्छ् याची 'पुंछइ-पुंसइ' अशी दोन रूपे देतो व 'कच्छप-कश्यप' ही दोन्ही रूपे एक मानतो. उलट संस्कृत 'श' चा पाली कधी 'छ' करताना दिसते. उदा० छक (शकृत्), छव (शव), छाव (शाप), छेप्प (शेप) वगैरे. तात्पर्य, मूळ सस्कृत 'छ' मध्ये तालव्यापेक्षा दंत्य व ऊष्मे याचेच उच्चाराश अधिक आहेत. त्यामुळें यादव-मराठीत तद्भवांत किंवा अर्धतत्समात 'छ-स' ही प्रक्रिया विपुल आढळते. 'मराठी छ-स' हे कोणकोणत्या संस्कृत उच्चाराच्या जागीं येतात तें पुढे क्र० ८४ व १०१ मध्ये दिलें आहे.

## § ३३ मूर्धन्य व्यंजनें

इंडो–युरोपियन भाषांतील दंत्य वर्णमालेचे प्राचीन इंडो–आर्यनमध्ये दंत्य आणि मूर्धन्य असे दोन भेद झाले. 'ऋ, ष, र, ल, ए, ओ' या वर्णांच्या सान्निध्यानें प्राचीन इंडो-आर्यनमध्यें दंत्यांचें मूर्धन्यीकरणें होतें. मात्र 'ऋ' किंवा 'र' च्या संपर्कामुळें संस्कृतांत दंत्य व्यंजन मूर्धन्य होतेंच असा नियम नाहीं. 'वर्तते' सारख्या रूपात 'र' असून दंत्यच कायम आहे. परंतु प्राकृतांत मूर्धन्य नियमानें होऊं लागलें. उदा० सं० वर्तते > पाली–वट्टति.

---

१ "Cerebralisation in Sindhi"—Prof. Turner (J. R. A. S. 1924, pp. 555–584)

## § ३४ मूर्धन्यीकरण Cerebralisation

दंत्य व्यंजनाना मूर्धन्यत्व प्राप्त झालेलें पुढील पाच प्रकरणें तपासून ठरविलें पाहिजे.

१ मागें 'र' आला असता
२ मागें 'ऋ' आला असता
३ पुढें 'र' आला असता
४ (अ) स्वरांतर्गत एकेरी दंत्य
(आ) स्वरातर्गत द्वित्त दत्य
(इ) आद्य दंत्य
५ आद्य आणि स्वरातर्गत 'न, ल' असताना.

वरील सर्व ठिकाणी नियमाने मूर्धन्य येतेंच असे नाहीं. दंत्य कायम राहिल्याची अनेक स्थळे आहेत. पुढे मूर्धन्य झाल्याची उदाहरणें क्रमाने देतों—

१ मागे र आला असता—

गांठी (ग्रंथि), पाडिवा (प्रातिपद), आट्ट (आवर्त), साठी (स्यार्थ), वाट (वर्त्मन्), गाढव (गर्दभ), कवडा (कपर्दिक), साडे (सार्ध), दीढ्ढ (द्वयर्ध), वाढणें (वर्धते), वरिपडा (उपरिपत्), पडिसाद (प्रतिशब्द), पढियास (प्रतिभास), अडकणिया (अर्धकणिका)

२ मागें ऋ आला असता—

वाड (वृद्ध), मढे (मृतकम्)

३ पुढें र आला असतां—

एकवट (एकत्र)

४ (अ) स्वरांतर्गत एकेरी दंत्य :

यादव-मराठींत अशा स्वरांतर्गत दंत्याचा बहुधा लोप झाला आहे. उदा० मऊ (मृदु), नई (नदी), खाणें (खादति), कहाणी (कथानिका), दहीं (दधिक), वोवरें (वधूवर)

(आ) स्वरांतर्गत द्वित्त दंत्य :

बहुधा यादव-मराठीत हे वर्ण दत्य म्हणूनच कायम राहतात आणि त्यांच्या मागील स्वर मात्र दीर्घ होतो. अर्थात् येथे मूर्धन्यीकरण नाही. उदा० पूत ( पुत्र–पुत्त ), माथा ( मस्तक–मथ्थअ ), वगैरे. काही क्वचित् स्थळीं मूर्धन्य होतांना दिसते. पहा—हाड ( अस्थि–अथ्थि ), पाटा ( पत्ती )

( इ ) आद्य दंत्य कायम राहतात—

ताक ( तक्रं ), ताबे ( ताम्र ), थेबुटे ( स्तोम ), दूध ( दुग्ध ), दोरी ( दारु ), दिसणें ( दृश्यते ), धूर ( धूम्र ), ताराण ( तारुण्य ), तिवटना ( त्रि– ), थडी ( तटि ), दळवाडे ( दल ), दातिरि ( दंत ), दी ( दिवस ), दिवटी ( दीपयष्टि ), धुळिरा ( धूलि ). क्वचित् काही स्थळीं आद्य दंत्याचे मूर्धन्य होते. उदा०

टिळा ( तिलक: ), टाळु ( ताल: ), टाळे ( तालकम् ), डोहोळा ( दोहद ), डंकी ( दंश् ), डरी-डरणे ( दर् )

५ आद्य 'न' आणि 'ल' अविकृत राहतात—

न : नाव ( नामन् ), नारिएल ( नारिकेल ), नळनी ( नलिनी ), निच ( नित्य ), नेपाळे ( नेपाल ), नेणता ( न + ज्ञा )

ळ : लागी ( लग् ), लळेवडु ( लाल ), लोव ( लोमन् ), लाहो ( लाभ ), लाटु ( लाट )

स्वरातर्गत 'न' आणि 'ल' हे एकेरी असताना बहुश: मूर्धन्य 'ण' आणि 'ळ' होतात. उदा०

न : खाणे ( खादन् ), न्हाण ( स्नान ), वहाणा ( उपानहौ ), गाणे-वाणे ( गायनं-वादनं ), सेणपुंजी ( छगन— ), पाणियेडा ( पानीय-वट ), जीणे ( जीवनं ), साजणे ( सहजन )

ळ : वेळु ( वेल्ल्-ला ), केळी ( कदली ), जाळें ( जाल ), उपळ ( उत्पल ), राउळ ( राजकुल ), कुलाळ ( कुलाल ), अभिळासु ( अभिलाष: ), मेळावा ( मेलापक: ), गोधोळी ( गोधूलि: )

'न' आणि 'ल' हे स्वरांतर्गत व द्वित्त असतांना नेहमी दंत्यच राहतात. क्वचित् कोठें यादव-मराठीत त्यांचें मूर्धन्य झालेलें दिसते. उदा० सळ ( शल्य )

## § ३५ दंत्य व्यंजनें

वरील दत्याची मूर्धन्ये झाल्याची उदाहरणे सोडून इतर सर्व ठिकाणी मूळ प्राचीन आर्य भाषातील दंत्य उच्चार यादव-मराठीत कायम आहेत.

## § ३६ ओष्ठ्य व्यंजनें

प्राचीन आर्य भाषातील ओष्ठ्य व्यंजनाचे उच्चार कायम आहेत. वर्तमान मराठींत इंग्रजी आणि फारशीच्या सपर्कामुळे दिसणारा 'फ' चा दंत्योष्ठ्य[1] उच्चार यादव-मराठीत असण्याचे कारणच नाही.

## § ३७ अनुनासिकें

यादवमराठीत 'ण, न' आणि 'म' या तीनच अनुनासिकाना स्वतंत्र अस्तित्व आहे. 'ञ' आणि 'ङ' या इतर अनुनासिकाचा त्या त्या वर्गातील व्यंजनाशी जोड होतो, आणि अनुस्वार हेच प्रतीक त्याच्याकरिता वापरलेले दिसते. 'आद्य ण, न,म' यादव-मराठीत कायम राहतात. प्राकृतात आद्य 'न'चा 'ण' होई, परंतु मराठीत 'न' राहतो. स्वरातर्गत मध्य 'न' प्राकृतात 'ण' होतो, परंतु मराठींत बहुश: 'न' च राहतो. प्राकृतातील द्वित्त 'ण्ण' चा 'न' झाला आहे. स्वरातर्गत म चा वँ किंवा व होतो.

---

१ (Ph): dento-labial.

२ प्रो० कृ० पां० कुळकर्णी यांनी "न-ण या वर्णांचा उच्चारविपर्यय" या लेखानें न > ण आणि ण > न या प्रक्रियांची ऐतिहासिक दृष्ट्या सविस्तर चर्चा केली आहे. ती प्रस्तुत प्रकरणीं उपयोगी होईल. त्यांचें म्हणणें थोडक्यांत असें—

"न-ण यांच्या उच्चारव्युत्क्रमांत कालनिम्नत्व आहे, तें महाराष्ट्री आणि पैशाची या प्राकृत भाषांच्या कालाचें आहे. हेमचद्र महाराष्ट्रीविषयी "नो णः" (८-१-२२८) आणि पैशाचीसंबंधीं "णो नः" (८-४-३०६) असे नियम देतो. तेव्हां या दोन भाषिकांच्या मिश्रणानें मराठींतील न-ण या वर्णांचा विपर्यय होऊं लागला. या उच्चारभेदाचें कारण आघात हें होय." (पहा : महाराष्ट्र-साहित्यपत्रिका, वर्ष ८, अक २)

प्रो० कुळकर्ण्यांनीं उदाहरणें प्रत्यक्ष बोलभाषेंतून आणि विशेषतः "ग्रामिक भाषेंतून" दिलीं आहेत. अर्थातच शिष्ट, ग्रांथिक मराठींत वरील प्रक्रिया नियमानें होतेच असें नाहीं. ग्रंथ-निविष्ट यादवकालीन मराठींत 'आद्य ण' असलेले शब्द नाहींत. तसेंच मध्याक्षरांतील 'ण' हा आघातापेक्षां सरळ महाराष्ट्रीतून आला असावा असें वाटतें. कसेंहि असलें तरी प्रो० कुळकर्ण्यांची चर्चा मूलगामी आहे हें खरें.

## § ३८ अर्धस्वर Semi Vowels

प्राचीन इंडो-आर्यनमधील 'य' यादव-मराठीत तद्भव शब्दात अति क्वचित् आढळतो. आद्याक्षरात त्याचा 'ज' होतो, स्वरातर्गत एकेरी 'य' चा लोप होतो, आणि जोडाक्षरात त्याचा समानवर्णसंयोग झालेला दिसतो. 'दंत्य वर्ण' आणि 'र' यांच्याशीं युक्त असताना याच्या पुढील वर्णाचे तालव्यीकरण होते. मात्र 'प्राचीन य' नसला, तरी दोन निकटवर्ती स्वरातील 'प्रगृह्य'[1] टाळण्यासाठी मात्र यादव-मराठी 'व' वापरते. 'व' चा उपयोगहि असाच प्रगृह्य टाळण्यास होतो. (पहाः यश्रुति-वश्रुति, प्र० १ क्र० ८)

प्राचीन इंडो-आर्यनमधील आद्य 'व' यादव-मराठीत कायम आहे. तसेच प्राचीन 'र्व–व्य' यातील 'व' प्राकृत 'व्व' द्वारा मराठीत आहे. पंजाबी[2] आणि गुजरातीमध्यें 'व' ची हीच प्रक्रिया आढळते.

## § ३९ र, ल

मूळ इंडो–युरोपीयन मधील 'र-ल' याची प्रक्रिया ऋग्वेदकालीच तीन प्रकारची होई. पुढे 'प्राकृत र-ल' आहेत, परंतु ते सदा 'संस्कृतातील र-ल' च्याच जागी अनुक्रमें येतात असे नाही. या दोन व्यजनातील अभेद प्राकृताप्रमाणें यादव-मराठींतहि आहे. उदा०

मराठी ल = सं० र : पेलिले ( प्रेर् ); अलंग ( अग्र ); वोले ( आर्द्र ); उकलणें ( उत्कृ )

मराठी र = सं० ल

प्राचीन इंडो-आर्यनमधील 'र' चा उच्चार मराठीत सर्व स्थळीं कायम आहे, परंतु 'ल' मात्र स्वरातर्गत असताना 'ळ' होतो.

तसेंच, 'न-ल' याचाहि अभेद क्वचित् यादव-मराठीत आढळतो. उदा० निलळता ( निनलता ), पाल्हैलें ( प्रस्नु ), लिंब-निंब ( निंब )

## § ४० ऊष्मे

प्राचीन इंडो-आर्यनमधील 'श, ष, स' हे प्राकृतकाली ( मागधी

---

१ "Hiatus-tilger"

२ Dr. Jain: Phonology of Punjabi: 141

खेरीज करून ) लोपून एक 'स' मात्र उरला. यादव-मराठींत 'ष' केवळ तत्सम शब्दातच आढळतो. प्राकृताप्रमाणें फक्त 'स' न वापरता यादव-मराठी तद्भव शब्दात 'श' व 'स' हे दोन ऊष्मे वापरते. पुढें 'इ' किंवा 'ए' हे स्वर असल्यास 'श' आणि नसल्यास 'स' अशी साधारणत: मराठीची व्यवस्था आहे. म्हणजे परंपरा अशी—

सं० श–ष–स > प्रा० स > मराठी : श–स

संख्यावाचक विशेषण सं० दश–प्रा० दस यातील 'स' चा 'ह' होऊन पुढे ११ ते १८ या संख्यांत या 'ह' चाहि लोप होतो. अकरा ( एकादश ) वगैरे.

ऊष्म वर्ण अनुनासिकाशी संयुक्त असताना प्राकृतात त्याच्या तीन भिन्न प्रक्रिया होतात. 'श्म, ष्म, स्म' या जोडाक्षराच्या प्रक्रिया अशा—

१ 'म' चा समानवर्णसयोग.

२ ऊष्म वर्णाचा महाप्राण होऊन नंतर व्यत्यास होणें:

श्म < ह्म < म्ह

३ जोडाक्षराची फफ अशी प्रक्रिया होणे.

पैकी यादव-मराठात दुसरी प्रक्रिया विशेष आहे.

## § ४१ महाप्राण–ह

प्राचीन इंडो-आर्यनमधील 'ह' च्या दोन प्रक्रिया होतात.

१ आद्य : मूळ ह कायम

२ आद्येतरः संस्कृत ह आद्य व्यंजनाचा महाप्राण करून स्वतः लुप्त होतें.

यांखेरीज उच्चारसौलभ्याकरिता शब्दातील दोन वर्णांच्यामध्यें यादव-मराठी 'ह' कार घालते.

पुढें यादव-मराठींतील सर्व व्यंजनांची प्रक्रिया तत्कालीन ग्रंथांतील विशेष उदाहरणांसह देतों.

## § ४२ आद्य व्यंजनें : स्पर्श

संस्कृतातील आद्याक्षरातील सर्व स्पर्श यादव-मराठीत कायम राहतात. पुढें क्रमवार चर्चा देतो—

क : कहीं ( कदापि ), कदन ( कर्दन ), कामाठी ( कर्म– ), कीरु ( किल ), कसवटी ( कर्पपट्टिका ), कोवळीक ( कोमल– ), के ( किम् ), काह्याचे ( कस्य– ), काज ( कार्य ), कोडें ( कौतुक ), कुवा ( कूप )

ख : खेळना ( खेल ), खाड ( खड्ड ), खाणे ( खाद्य ), खेर (खदिर), खाणौरी ( खन् )

ग : गजराउ ( गर्ज् ), गाभेवन ( गर्भ– ), गावघेरी ( ग्राम– ), गोसावीणि ( गोस्वामिनी ), गुढर ( का० गुडर ), गहीरु ( गंभीर ), गूज ( गुह्य )

घ : घाडि ( घटि ), घाय ( घात ), घणवट ( घन- ), घसणी ( घृष् ), घाटु ( घाटः ), घामु ( घर्म )

च : चळवळ ( चल्- ), चाकवरा ( चक्र– ), चौकडणे ( चतुर्- ), चौक ( चतुष्क ), चोरमोळा ( चोर- ), चाउरी ( चतुरिका ), चापौल ( चंपकपुष्प ), चोख ( चोष्य ), चौम्हेरि ( चतुर् + मेरा )

छ : 'छ' केवळ तत्सम शब्दातच आढळतो. उदा० छत्र, छाया-मडल. तद्भवांत त्याचा 'स' किंवा 'श' होतो—सेण ( छगण ), साइली ( छाया ), संद ( छंद )

ज : जिणा ( जित ), जिनि ( जीवन ), जियालें ( जीवित ), जिव्हार ( जीवागार ), जानोसा ( जन्यवास ), जाई ( जाति ), जै ( जय ), जेवण ( जेमन )

झ : झांटी ( झाट ), झांकरणें ( झाकृ )

ट[1] : टांक ( टंक ), टका ( टकः )

---

१ 'ट, ठ, ड, ढ' हीं मूर्धन्य व्यंजनें आरंभीं असलेले शब्द यादव-मराठीत आहेत. परंतु ते सर्व ध्वन्यनुकारी असल्यानें त्यांची निश्चित व्युत्पत्ति नाही. शिवाय ते सर्व प्राकृतांत व वर्तमान भाषांत आढळतात. संस्कृतमध्येंहि ते बहुधा शब्दकोशांतच मात्र दिसतात.

ठ :
ड : ठीकवणी, डाडांति, डंबाळ, डोड, डो, ढीव, ढेंढें, ढोंकु, वगैरे.
ढ :
त : ताराण (तारुण्य), तवं (तावत्), तिवटना (त्रिवटिका), तेव्हेळी (तत्— ), तळउपर (तल–), तण्हार (तृणागार), तातले (तप्त), तैसा (तादृश). क्वचित् मृदु होतो: दोंदिल (तुंदिल)

थ : प्राचीन इंडो-आर्यनमध्येंच थ आद्याक्षरी असणारे शब्द फार थोडे आहेत. आहेत ते बहुतेक ध्वन्यनुकारी. उदा० थैथै (थइथइ), थरथरणे थरथरयते)

द : दळवाडें (दलवट), दातिरी (दत्त– ), दी (दिवस), दीठी (दृष्टि), दीदळ (द्विदल), दुआड (दुष्प्राप्त), दारवंठा (द्वार–), दीढु (द्वयर्ध), दाय (दान)

ध : धवळार (धवल–), धवळे (धव–), धाकिन्नला (ध्राक्), धावडहोडी (धाव्–), धुधुळिय (धुद–), धुळिरा–(धूलि–), धायेपण (धात्री–)

प[1] : पडप (पट– ), पढवणे (पठ्), पढियासणे (प्रतिभास्), पाती (पंक्ति), परियेसणें (परिश्रु), पवाड (प्रवृद्ध), पाख (पक्ष), पढियावो (प्रीति), पाणियडा (पानीयवट), पाचाखरी (पंचाक्षरिन्), पाहाती (प्रभात), पुढार (पुरस्कार), पैज (प्रतिज्ञा), पन्हरे (पंचदश)

फ : फळ (फल); फळक (फलक); फूल (पुष्प–प्रा० फुल्ल)

ब : बळिया (बल–); बाहाळी (बहुलता); बाधौडी (बंध; बिजाखर) (बीजाक्षर); बावनें (का० बावन); बाबुली (बाबुल); बोर (बदर)

भ : भंवर (भ्रमर), भारिवसु (भार–), भीगुरटी (भ्रमरी), भूअरी (भ्रम्), भरीया (भृत), भाका (भाषा), भेण (भय), भला (भद्र), भींती (भित्ति), भांगार (का० भंगार), भीख (भिक्षा), भुई (भूमि), भुंवई (भ्रू-)

---

१ 'आद्य प' क्वचित् लोपतो. उदा० ओतना (पूतना).

## § ४३ आद्य अनुनासिक

आद्याक्षरांतील 'न, म' यादव-मराठीत कायम राहतात. प्राकृतात आद्य 'न'चा 'ण' होण्याबद्दल निश्चिति नाही.

न : नळनी ( नलिनी ), नादणें ( नंद् ), नायकवडी ( नायकवट ), नावेक ( नामएक ), निगुती ( नियुक्त ), निच ( नित्य ), निऱ्हा ( निरस ), निलाग ( निर्लाग ), निडळ ( निटिल ), नागारी ( नागरिक ), नडनाचें ( नटनृत्य ), नावानावा ( नाम ), निफन्नली ( निष्पन्न ), नेणणे ( न + ज्ञा )

म : मढ ( मठ ), मधुवा ( मधुपा ), महुरु ( मधुर ), मार्गौते ( मार्गतस् ), मादना ( मर्दन ), मानकुल ( माणिक्य ), मिया ( मया ), मेल्हवनी ( मेल ), मेहुणा ( मिथुन ), मफौरें ( का० मुप्पुरि ), मुडे ( का० मुडि ), मोत्ये ( मौक्तिक ), मऱ्हाठा ( महाराष्ट्रक ), माह्येर ( मातृगृह )

प्राकृतातील आद्य 'ण'चा मराठीत 'न' होतो.

## § ४४ आद्य अर्धस्वर

आद्याक्षरातील 'य' चा तद्भव शब्दात बहुशः 'ज' होतो; 'व, र, ल' हे कायम राहतात. क्वचित् 'व' चा ओष्ठ्य स्वर 'उ' किंवा 'ओ' झालेला यादव-मराठींत आढळतो.

य < ज : जूझ ( युद्ध ), जुझार ( योद्धारः ), जाउळें ( युगुल ), जूआरी ( द्यूतकारी ), जें ( यत् ), जुई ( यूथिका ), जोगी ( योगिन् ), जवळीक ( युत- ), जवं ( यावत् )

व : वच्छ ( वत्स ), वडप ( वृट ) ?, वाजौठी ( वाद्य–यष्टि ), वाटाऊ ( वाटस्थः ), वाणें ( वादन ), वाडी ( वटिका ), वांवरूळ ( वामरूल ), वाणेलग ( वर्ण– ), विसावा (विश्रम् ), वीरढें ( विरूढ ), वोरकल ( का० वोरेकल्लु ), वडील ( वृद्ध ), वोगर ( का० वोगर )

कधीकधीं ओखट-वोखट, ओळगविणें-वोळगविणें, ओघ-वोघ, ओडवणें-

वोडविणें, ओलें-वोले, अशा अनेक जोड्या आढळतात. येथें 'व' या अर्धस्वराचा 'ओ' असा शुद्ध स्वरोच्चार होतो.

व > ब : बरंव (वरम्), चळबळा (चल्?), बावी (वापी), बोजां (ओजस्), बासी (वत्स)

र : राओ (राजन्), रापणें (रंजनम्), राखोंडी (रक्षा), रीतहाती (रिक्तहस्ता), राणीव (राज्ञ-), राउळ (राजकुल), रळिया (रलः), रोस (रोष), रडणे (रुद्)

ल : लळेवडु (लाल-), लाहो (लाभ), लोंव (लोमन्), लागी (लग्), लेहें (लेह्य), लेखा (लेखः), ले (लिप्), लीळाचरित्र (लीला-)

## § ४५ आद्य ऊष्मे

सं० श-ष-स > प्रा० स > मराठी श-स

श > स : सुने (शून्य), सीग (शृंग), मेवाळें (शैवाल), सराटी (शर-), सियाळी (शीत-), सेज (शय्या)

ष > स : साटि (षष्टि), सहा (षट्)

स > स : सकट (सहित), सर (स्वर), सवें (समम्), सराउ (सृ), साकडे (संकट), साचोकार (सत्य-)

श > श : शांखळ (शृंखला), शोखणे (शुष्), शीयाळी (शीतल)

स > ह : हान (सान)

प्राकृतांत 'श' चा 'स' नियमाने होई. यादव-मराठींत 'श-स'-मध्यें अभेद असलेला दिसतो. कारण, शाळ-साळ, शीयाळी-सीयाळी, शांखळ-सांखळ, शर-सर, अशी दोन दोन रूपें अनेक आढळतात. पुढें ए-ई हे दीर्घ स्वर आल्यास 'प्राकृतातील स' चा 'मराठीत श' होतो, हा नियम वर्तमान-मराठीला पूर्णतः लागू आहे; यादव-मराठीला विकल्पानें लागतो. किंबहुना यादव-मराठीचा 'स' कडेच अधिक कल होता असें दिसतें. पुढील रूपें पहा—

सामसाखा ( श्यामशाखा ), सीर ( शिरस् ), सीखर ( शिखर ), सैय्या ( शय्या ), सैत्य ( शैत्य ), सल्ल ( शल्य ), सुचि ( शुचि ), सायासाइली ( छाया ), सत्र ( छत्र ), सीस ( शीर्ष ), सौरियें ( शौर्य ), सल ( छल ), सोरू ( शूकर ), सीखवी ( शिक्ष् )... वगैरे.

वरील रूपे पाहिली म्हणजे वर्तमान-मराठीत ' श-स ' मधील भेदाला जी निश्चिति आली आहे, ती यादवकाली नसून, उलट ' स ' काराचेच प्राबल्य होतें असें दिसते. प्राकृतातें संस्कृतातील सर्व ऊष्म्याचा एक ' स ' होई. अपभ्रंशात ' स ' च राहतो. तेव्हा प्राकृत अपभ्रंशाचा हा ' स ' चा विशेष यादव-मराठीत वर्तमान-मराठी पेक्षां बराच कायम आहे. यादवोत्तर-काली हा प्राकृत विशेष लोपून ' स-श ' मधील भेद स्वच्छ झाला. यादव-मराठी ही प्राकृत-अपभ्रंशाला कशी जोडून आहे त्याचा हा एक पुरावा होय.

ह > ह : हातवसणे ( हस्त- ), हाथोबा ( हस्त-उण ), हडपु ( का० हड्डिपु ), हीरवा ( हरित ), हिव ( हिम ), हिये ( हृदय ), हंसणे ( हस् ).

## § ४६ अंत्य व्यंजनें

संस्कृतात शब्दाती जी व्यंजनें असत ती अनुनासिके, विसर्ग आणि अल्पप्राण कठोर स्पर्श यापैकी असावीं लागत. पैकी, प्राकृतकालीच हीं अंत्य व्यंजने लोपून त्याच्या पुढील प्रक्रिया झाल्या :

१ अल्पप्राण कठोर स्पर्श > अ : विद्युत् > विज्जुअ > विजू
२ विसर्ग > ओ–ए : पुत्रः > पुत्तो > पूतो; ततः > तओ
३ अंत्य अनुनासिक > पूर्वस्वर सानुनासिक व अंत्यवर्णलोप

वरीलपैकीं कोणत्या तरी एका प्रक्रियेनें प्राकृतात अंत्यव्यंजनलोप होई. त्यामुळें पुढें अपभ्रंशांत व यादवमराठीत तद्भव शब्द व्यंजनान्त नाहीत. सर्व स्वरान्त आहेत. व्यंजनान्त शब्द तत्समांतच केवळ दिसतात.

---

१ यादव-मराठींतील ऊष्म वर्णाचा हा विशेष, व त्यांत दिसणारा प्राकृत-अपभ्रंशांचा विशेष, यांचा उल्लेख प्रस्तावनेंत त्या त्या प्रकरणीं राहून गेला आहे. तरी प्राकृताच्या अवशेषांत ' स ' कारप्राबल्याचीहि गणना करावी व यादव-मराठीचें हें एक नियतचिन्ह मानावें.

## § ४७ स्वरांतर्गत व्यंजनें : अल्पप्राण स्पर्श

स्वरांतर्गत व्यंजनापैकीं 'क, ग, च, त, द' याचा लोप झालेला दिसतो. पहा—

क : चाम्हारु ( चर्मकार ), काउळा ( काकोल ), माथा ( मस्तकम् ), महार ( मृतहर ), राउळ ( राजकुल ), देउळ ( देवकुल ), ~~कीवी ( कीटक~~ ), ए ( -अकम् ), ई ( -इका ), आ ( -अकः ), पाती ( पांक्ति ), सेद ( संदूक ), सीवार ( सीमा-प्राकार ), फुलौरा ( पुष्पकार )

ग : सेण ( छगण ), जिव्हार ( जीवागार ), पडदनी ( पटद्विगुण ), दुहवा ( दुर्भगा ), सुहाव ( सुभग ), आर ( अजगर ) जावळ ( युगुल )

च : सुई ( सूचि ), पिसे ( पिशाचकम् ), आण ( वचनं ), मळयपाचौर ( मलयपंचचील ), पाखरी ( पंचाक्षरी )

ज : राओ ( राजन् ), बी ( बीज ), राणींव ( राज्ञ- ), आर ( अजगर ), रायागण ( राजन्- )

त : देशाउर ( देशातर ), से ( स्मृति ), ठीं ( स्थिति ), जूं ( द्यूत ), सें ( शतम् ), सीयाळ ( शीतकाल ), गेले–मेलें–केले ( गत, मृत, कृत ), माह्येर ( मातृगृह ), म्हणियें ( भणितम् )

द : पाओ ( पाद ), सवा ( सपाद ), मऊ ( मृदु ), वाणें ( वादनं ), पाऊण ( पादोन ), पैकु ( पदिक ), सोयेरा ( सहोदर )

प[1] : लावनी ( लापनिका ), गाभेवन ( -पर्ण ), वाओ ( व्याप ),

---

१ 'पाणी' हा शब्द समासांतर्गत असतांना यादव-मराठींत नेहमीं 'वणी' असा होतो. उदा० हातवणी, पायेवणी, कुळथवणी ( = हुलग्याचें पाणी ).

आव्हाट ( अपवाट ), ताओ ( ताप ), सीवारू ( सीमाप्राकार : )

छ–झ : तत्त्वतः हे दोन स्पर्श म्हणजे 'च–ज' या अल्पप्राणांचे महाप्राण असले, तरी त्यांच्या उच्चारांत ऊष्म्याचा अंश असतो. त्यामुळें इतर महाप्राण स्पर्शाप्रमाणें यांची प्रक्रिया न होतां त्याचे बहुधा ऊष्मे होतात. म्हणजे यादव-मराठींत आद्य व स्वरांतर्गत 'छ' चा 'स' होतो. पहा—

साइली ( छाया ), सवसाया ( -छाया ), प्रेतसाया ( -छाया ), सळु ( छलः ), ज्ञानसत्रीं ( -छत्र ), संदु ( छंद ), उसीसे ( उछ्वास ), कासु–कासौटा ( कच्छः ), पुंस ( पुच्छ )

## § ४८ महाप्राण स्पर्श

'ख, घ, थ, ध, फ, भ' या महाप्राण स्पर्शातील स्पर्शत्व जाऊन केवळ महाप्राण 'ह' मात्र उरतो. ही प्राकृतातील प्रक्रिया यादव-मराठीतहि आढळते. पहा—

ख > ह : लिहिणें ( लिख् ), सए ( सखि ), चांपौल ( चंपकपुष्प- प्रा० चंपअफुल्ल ), मुहुरैजे ( मुख- ), मोहोरें ( मुखर )

घ > ह : जौहर ( जतुगृह ), लवलव ( लघुलघु ), खरहातु ( खराघात ), शशीकुनाहो ( -नाथ ), पाहोनरु ( प्राघुर्णक- )

थ > ह : मेहुण ( मैथुन ), वहिला ( प्रथम ), पाहे ( प्रार्थ् ), कहाणी ( कथानिका ), जुई ( यूथिका ), पोहा ( पृथुक )

ध > ह : महुर ( मधुर ), वोवरें ( वधूवर ), दहीं ( दधिक ), वहुमायें ( वधुमाता )

फ > ह : चांपौल ( चंपकपुष्प– > चंपअफुल्ल–प्रा० )

भ > ह : गव्हरु ( गभीर ), सोहोळा ( शुभवेल ), वहिरव ( भैरव ), लाहो ( लाभ ), पढियास ( प्रतिभास् ), ल्हाये ( लभ् ), सुहाव ( सुभग ), म्हणियें ( भणित ), अहीर ( अभीर ).

## § ४९ स्वरांतर्गत मूर्धन्य

संस्कृत वा प्राकृत स्वरातर्गत मूर्धन्य व्यंजनांच्या यादव-मराठींत पुढील प्रमाणे प्रक्रिया होतात.

सं० प्रा० ट–ड > म० ड : निडळ ( निटिल ), कवडा ( कपर्दिका- प्रा० कवड्डिओ ), साकडें ( संकट ), वरिपडा ( उपरि-पत् ), कोडे ( कौतुकं, प्रा० कोड्डिअं ), साडे ( सार्ध-सड्ढ ), साडा ( शाटक ), कुकर्डी ( कुक्कुटी ), खडु ( क्षत : ), लाडु ( लाट : ), वाडी ( वाटिका ), कडु ( कटुक ), मडें ( मृतकं- प्रा० मडअं ), फुडी ( स्फुट ), सकीड ( संकीटक ), कुडी ( कुट )

प्रा० ठ–ढ > म० ठ : ठी ( स्थिति–प्रा० ठिइ ), आठ ( अष्ट ), गाठि ( ग्रंथि ), कामीठा ( कर्मवाटिका ), ठाउवा ( स्था– )

प्रा० ड–ढ > म० ढ : पुढार ( पुरस्कार–प्रा० पुडआर ) उपंढरु ( उत्+पाडुर ), पढियासणे ( प्रतिभास् ), बूढ ( बुध्न )

प्रा० ढ > म० ढ–ह : देहुडी-दी ( द्व्यर्ध-दिवड्ढ-दीढ-दीह )

यादव-मराठीत कांहीं ठिकाणी कठोर स्पर्श आद्य व स्वरांतर्गत मृदु झालेलेहि दिसतात. ही परंपरा प्राकृतापासूनचीच आहे. यादव-मराठींतील उदाहरणें :

क : अनेग ( अनेक ), गडा ( कोटः ), वासुगी ( वासुकी ), गेंद ( कंदुक ), डाग ( तटाक )

च :

ट : किडा ( कीटक ), घडी ( घटिका ), कवाड ( कपाट ), तडी ( तट )

त : दोंदिल ( तुंदिल ), दादा ( तात )

प :

## § ५० अनुनासिक

प्राकृतांत शब्दांतर्गत स्थानीं 'संस्कृत न–ण' याचा 'ण' होई. यादव-मराठींत हीच प्रक्रिया उतरली असून शब्दाच्या मध्यभागातील 'ण' हा संस्कृत 'न–ण' पासून येऊं शकतो. पहा—

सं० ण > म० ण : कणीस ( कणिश ), सेण ( छगण ), म्हणौनि ( भणित्वा ), राणीव ( राज्ञ–प्रा० रण्ण ), दुणवटे ( द्विगुण– )

सं० न > म० ण : वाखाणणें ( व्याख्यान ), पाणियेडा ( पानीयवट ), जीणें ( जीवनं ), न्हाणी ( स्नान ), पाऊण ( पादोन ), कहाणी ( कथानिका ), आंगण ( अंगन ), साजणे ( सहजन ), विणती ( विनति )

सं० ण ( जोडाक्षरांत ) > म० न : पान ( पर्ण ), रान ( अरण्य ), कान ( कर्ण )

सं० ण > म० ळ : वेळुवन ( वेणुवन )

नामविभक्तिप्रत्ययात आणि तद्धितप्रत्ययात 'ण' व 'न' यांचा अनुस्वार होतो, किंवा निकटवर्ती स्वराना अनुनासिकत्व येतें. उदा०

तृतीया ए० व० : अनेक > अप० अएं म० एं
षष्ठी अ० व० : अकानाम् अप० अआ > म० आं
नपुं० प्र० अ० व० : ईनि > अप० ईइं > म० ई

'स्वरांतर्गत म'ची प्रक्रिया त्याच्या शब्दातील स्थानावर अवलंबून आहे.

( अ ) शब्दातर्भागीं 'म'च्या दोन प्रक्रिया झालेल्या यादव-मराठींत दिसतात. एक 'म' चा 'वॅं' होणें, आणि दुसरी 'व' हा निरनुनासिक राहून तत्पूर्व स्वर सानुनासिक होणें. वस्तुतः या दोन प्रक्रिया नसून एकीचेच दोन प्रकार आहेत. म्हणूनच यादव-मराठींत स्वरांतर्गत 'म' हा 'वँ' आणि '॑व' अशा दोहीं रूपांत दिसतो. तसेंच या दोहोंपैकीं अमक्या शब्दात अमकीच प्रक्रिया नियमानें होईल असें नाही. तेव्हा दोहींचीं उदाहरणें एकत्रच देतों.

सं० म > म० वॅ-व : भवंर ( भ्रमर ), विसावा ( विश्रमः ) आविंख ( आमिष ), लोव ( लोमन् ), गोसावीणि (गोस्वामिनी), वावरूळ ( वामरूल ), चवंरे ( चामर ), कुंवरी (कुमरी), नाव ( नामन् ), भुंई ( भूमि ), भूवरी ( भ्रम् ), गाव ( ग्राम ), गहूं ( गोधूम ), पाचवं ( पंचम ), नावेक ( नामएक ), सीव ( सीमा ), रवण ( रमण ), धवें (धाम)

यादव-कालातील ज्या अस्सल पोथ्या उपलब्ध आहेत त्यांत अनुस्वाराची व्यवस्था नियमित नाही. ज्ञानेश्वरीची राजवाडे–प्रत, उद्धवगीता, धवळे, स्मृतिस्थळ, दृष्टांतपाठ वगैरे अस्सलावरून छापलेल्या ग्रंथातहि अनुस्वारांची दुर्दशाच आढळते. तेव्हा प्रस्तुत प्रक्रियेच्या दोन प्रकारा-संबंधी निश्चित मत देता येत नाही.

( आ ) विभक्तिप्रत्ययात व ताद्धितप्रत्ययात संस्कृतांतील 'म' चा मराठीत अनुस्वार होतो. ही प्रक्रिया न-प्रमाणेच आहे. उदा०

लट् प्र० पु० ए० व० : आमि > अप० आइं > म० ईं
लट् प्र० पु० अ० व० : आमः > अप० आओं > म० ऊं-ओं
नपुं० प्र० पु० ए० व० : अकम् > अप० अअं > म० एं

## § ५१ स्वरांतर्गत य-व

( अ ) १ संस्कृत य > मराठी-लोप किंवा अ : मोर ( मयूर ); सुआळें ( -आलय ); निरइं ( निरय ); उदिम् ( उद्यम ); इसाळु ( विषयालु ): अतिशे ( अतिशय ); वळें ( वलय ); रसाएन ( रसायन ); उभे ( उभय ); पेहे ( पयस् ); पेणें ( प्रयाण-? ); सैंवर ( स्वयवर ); भासुर ( भयासुर ); सराठी ( शरयष्टि )

२ प्राकृतातील प्रगृह्यभेदक य > म० य : सायर ( सागर ); सोयरे ( सहोदर ); पायिक ( पादिक ); सीयाळ ( शीतकाल )

३ सं० य > ज : देज ( देयम् ); पेज ( पेयम् )

४ सं० अय > म० ए : वळें ( वलय ); एं ( अकम्-प्रा० अयं )

५ सं० य > प्रा० य > म० व : माव ( माया ); सावुली (छाया) ; उपावो (उपायः) ; न्यावो (न्याय) ; रावो (राजन्)

(आ) १ सं० प > प्रा० व > म० व : वावर (प्राकार); दीवी (दीपिका–प्रा० दीविआ); तावो (तापः-प्रा० तावो); रावा (राजन्–प्रा० रावो); वावी (वापी–प्रा० वावी); ओवरी (उपरिका)

२ सं० अव > प्रा० ओ > म० ओ : हो (भवति–प्रा० होति) लोणीचें (लवणत्य); वोवरें (वधूवर); नोवरा (नववर); वोदरे (अवद्द); नातोडु (नप्तृवत्)

३ सं० व > म० ब (क्वचित्) : आरबाई (-रव); कोंडबार (-द्वार)

## § ५२ र

संस्कृतांतील स्वरांतर्गत र यादव-मराठीत कायम राहातो. उदा० चाम्हार (चर्मकार); माझार (मध्यगृह); मरें (मृतं), पोखरिणी (पुष्करिणी); सोरट (सौराष्ट्र); सोरू (शूकर:); वरवड (उपरिपत्); विरूं (वैर); वेव्हारा (व्यवहारकः)

## § ५३ ल

स्वरांतर्गत 'ल' बहुतेक ठिकाणी 'ळ' होतो. उदा० अभिळाखु (अभिलाषः); दळवइ (दलपतिः); राउळ (राजकुल); उपळीं (उत्पल); वेळु (वेलः); केळी (कदली); मेळाओ (मेलापकः); बहळ (बहुल); काळ (कालः); लीळाचरित्र (लीला-); फळक (फलक)

## § ५४ स्वरांतर्गत ऊष्मे

'संस्कृतांतील श, ष, स' हे ऊष्मे प्राकृतात एक 'स' म्हणून रहात. यादव-मराठींत तद्भव शब्दांत 'श' आणि 'स' हे दोन ऊष्मे आहेत.

संस्कृतांतील ऊष्म्यांच्या पुढील भिन्न भिन्न प्रक्रिया यादव-मराठींत दिसतात.

श > स : सामसाख (श्यामशाखा), आसु (आशा), पटिसाळा (प्रतिशाला), पिसें (पिशाच), पासीं (पार्श्वे), नासणें (नश्), कस्मळ (कश्मल), पसीमा (पश्चिम),

पारिसी ( परिश्रय ), पास ( पाश ), सरिस ( सदृश ), सोहोळा ( शुभवेल : ), किंसौरु ( किशोर )

ष > स : सीस ( शीर्ष ), कसवटी ( कर्षपट्टिका ), साहाण ( पाषाण ), वरिस ( वर्ष ), वासुट ( विषवत् ), भास ( भाषा ), आविस ( अमिष )

स > स : पसरणे ( प्रसृ ), पढियासणें ( प्रतिभास ), हंसें ( हास्य ), कापुस ( कर्पास )

स-ष > ख : खुड्डुगुण ( षट्-), मूखक ( मूषक ), उपखा ( उपवास ), असेख ( अशेष )

स, श > ह > अ : पांतु ( पश्यंतु ), पाह ( प्रकाश ), दिहां ( दिवस )

## § ५५ ह

१ 'स्वरातर्गत ह' चा कधी लोप होतो.
सावासु ( सहवास ), सोयरा ( सहोदर ), दुइता ( दुहिता ), सपाती ( सहपंक्ति ), सी–तृ० ए० व० प्रत्यय ( सहितं )

२ क्वचित् यादव-मराठीत दोन वर्णांमध्ये सुलभोच्चाराकरिता हकार घातला जातो.

सोहोपे ( सोपें ), सोहोज्वळ ( सोज्ज्वळ ), अन्हवानी ( अन्+उपानह् ), चाम्हारू ( चर्मकार : ), मेह्लन ( मीलन ), व्हेळीं ( वेल : ), मोहडा ( मुद्रा ); निऱ्हास ( निरास ), चौथाहार ( -स्तर ), सहंश्रुति ( संसृति ), माहियेर–माहेर ( मातृगृह–प्रा० माइघर ), हिदोळा ( आदोलकः ), तण्हार ( तृणागार )

## § ५६ कांहीं विशेष प्रक्रिया

यादव-मराठीत आद्य व स्वरांतर्गत व्यंजनाच्या कांही विशेष प्रक्रिया आढळतात. त्यातील कांहीं अपवादात्मक होत व इतर नियमबाह्य नसल्या तरी गुंतागुंतीच्या आहेत. म्हणजे प्राकृत अपभ्रंशांतून ते शब्द मराठीत येतांना एकाहून अधिक प्रक्रिया त्यांच्या ठायी झाल्या आहेत. अशा विशेष प्रक्रियांचीं काही उदाहरणें पुढें देतों.

द्र > ञ > न : नीनिली ( निद्रित )
द > ड > ळ : डोहोळा ( दोहद ), केळी ( क्रीडा )
र > ळ : इंगळ ( अंगार ), अढाळ ( अधार ), साळाक ( शार ), अखळ ( अक्षर )
ड, द > ज : सावज ( श्वापद ), गाजिव ( गांडीव ), माजिरा ( मादक )
र > ड : पुढारु ( पुरस्कार )
ग्न > ज्ञ : लज्ञ ( लग्न )
ख > क्ष : क्षेदु ( खेद )
ध > ख : संबोखीले ( संबोध- )
थ > ख : पाखा ( पश्यथ-द्वि० पु० अ० व० )
च > थ-प : सिंथितु ( सिच् ), सिपा ( सिंच् )
च > स : सवडा ( चर्म- )

## § ५७ प्राकृताच्या छटा : द्वित्त वर्ण

प्राकृत-अपभ्रंशांतील द्वित्त व्यंजने मराठीत येताना साधीं, एकेरी होतात, व बदली तत्पूर्व स्वर दीर्घ होतो. परंतु यादव-मराठींतील काही शब्दांत प्राचीन द्वित्त्व शिल्लक राहिलेलें दिसतें व कांहीं ठिकाणीं ते अकारण आलें आहे. हे सर्व अपवाद होत. उदा०

वान्नरु ( वानर ), वन्नमाळी ( वनमाली ), मत्त ( मत ), विगुत्तले (विगुंत-), मन्नोरथु ( मनोरथ ), गंधफुल्ली (-प्रा० फुल्ल), तिल्लक ( तिलक ), लल्लाट ( ललाट ), निल्लजें ( निर्लज्ज-प्रा० निलज्ज ), सल्ल ( शल्य-प्रा० सल्ल ), नील्लळ ( निलाल )

## § ५८ संयुक्त व्यंजनें ( Conjuncts )

संस्कृतांतील संयुक्त व्यंजनें प्राकृतांत भिन्नवर्ण संयोगानें द्वित्त व्यंजनें होत. भिन्नभिन्न संयुक्त व्यंजनांच्या भिन्न प्रक्रिया प्राकृतांत होत असल्यानें, तेथें द्वित्त व्यंजनाचे विविध प्रकार आढळतात. हीं द्वित्त व्यंजनें प्राकृतांत व पुढें अपभ्रंशांत तशींच राहिलीं. नंतर अर्वाचीन इंडो-आर्यन भाषांच्या आरंभकालीं मात्र त्यांतील द्वित्त्व लोपून तीं व्यंजनें साधीं, एकेरी झालीं

आहेत व त्यामुळे बिघडणारा शब्दाचा तोल सांभाळण्यासाठी पूर्वस्वर दीर्घ झाला आहे.

यादव-मराठींतील संयुक्त व्यंजनांची होणारी प्रक्रिया पुढील प्रकरणें तपासून अजमाविता येईल—

१ स्पर्श + स्पर्श : ( अ ) समवर्गीय ( आ ) विषमवर्गीय

२ अनुनासिकयुक्त जोडाक्षरें

३ स्पर्श + य

४ स्पर्श + र

५ स्पर्श + ल

६ स्पर्श + व

७ स्पर्श + ऊष्मे

वरील सर्व प्रकारांचीं उदाहरणें पाहिल्यास प्राचीन संयुक्त व्यंजनांची व्यवस्था यादव-मराठी कशी लाविते हें दिसेल.

## § ५९ स्पर्श + स्पर्श

**( अ ) समवर्गीय :—**

क्क : चिखलु ( दे० चिक्कल ); कुकडी ( कुक्कुटी )

च्च : उच–उच ( उच्च )

च्छ : कासोटेकारु ( कच्छ– ); कासव ( कच्छप ); तुसें ( तुच्छ ); पुसणे ( प्रच्छ् )

ज्ज : लाज (लज्जा); काजळु (कज्जल); पैज (प्रतिज्ञा-प्रा० पइज्जा)

ट्ट : पाटें ( पट्ट ); पाटण ( पट्टन )

ड्ड : उडणें ( उड्डयते ); आड– ( का० अड्ड )

त्त : पातळ ( पत्तल ); चीत ( चित्त ); भीतभंग (भित्ति-); माताइते ( मत्त– ); ...... ·क्वचित् च होतो ... प्राच्चिन्ना ( प्राक्तन–त्त ).

द्ध : बूझ ( बुद्धि : ); जुझारू ( योद्धारः ); सुवेंझु ( सुविद्धः )

प्प : पिंपळ ( पिप्पल )

**(आ) विषमवर्गीय :-**

ट्क > प्रा० क्क > म० क : सक (षट्क)

त्क > क्क : उकलणें (उत्कल्); उरुक (उत्कर्ष)

त्ख > ख्ख : उखणणें (उत्खन्); उखेंडी (उत्खेद:)

ड्ग > ग्ग-किंवा ड्ड : खाड (खड्ग)

द्ग > ग्ग : मोगर (मुद्गर)

द्घ > घ्घ : उघडणें (उद्घट)

क्त > त्त : मोती (मौक्तिक); भातु (भक्त); रितें (रिक्त) रातला (रक्त); पांती (पंक्ति)

प्त > त्त : सात (सप्त); तातली (तप्त); नातोंडु (नप्तृ), जागसुता (-सुप्त)

क्थ > थ्थ > त : शीत (सिक्थ)

ब्द > द्द : सादु (शब्द)

ग्ध > ध्ध : दूध (दुग्ध)

ब्ज > ज्ज : खुजें (कुब्ज)

ब्ध > ध्ध : लाधलें (लब्ध)

त्प > प्प : उपळ (उत्पल); उपजणें (उत्पद्यते); परावर (परात्पर)

द्भ > भ्भ : उभाव (उद्भाव)

द्ध > ध्ध-झ्झ : वेंझ (विद्ध)

द्ध > ध : उधट (ऊद्धत)

## § ६० अनुनासिकयुक्त जोडाक्षरें

### स्पर्श + अनुनासिक

१ कंठ्य + न-म = कंठ्य :--

क्न > क्क : मोकळीक (मुक्न-?)

ग्न > ग्ग : लाग (लग्न), आगि (अग्नि), नागवें (नग्न), उबग (उद्विग्न), आगियेल (अग्नि-)

क्म > क्क :
ग्म > ग्ग :

२ ज + न = ण :—

ज्ञ > ण : राणी ( राज्ञी ), राणीव ( राज्ञ ), जाणविता ( ज्ञापय- ), जानवे ( यज्ञोपवीतम् ), आण ( आज्ञा )

३ त्न > त्त : सवत ( सपत्नी ), आइती ( –यत्न )

द्न > द्द : ही प्रक्रिया संस्कृतकालीच होत होती असें दिसतें. उदा० सं० भिन्न < भिद् + न; छिन्न < छिद् + न

प्न > प्प : सपाइलें( –स्वप्न...? )

त्म > प्प : आप, आपण ( आत्मन्–प्रा० अप्पणो )

## § ६१ अनुनासिक + स्पर्श

अनुनासिक आणि स्पर्श ही संस्कृतात एकत्र आली असतां त्यामुळें स्वरांना जे अनुनासिकत्व येतें त्याची चर्चा मागें क्र० १३ मध्यें केलीच आहे. त्या भिन्न भिन्न प्रक्रियाचा विचार पुढीलप्रमाणें करिता येईल—

ं–क : कांकण ( कंकण ), आखणे ( अंक् ), कुंकू ( कुंकुम )

ं–ख : साखळ ( शृंखला )

ं–ग : इंगळ ( अंगार ), आगण ( अंगन ), सींगवटी ( श्रृंग ), आगाविणें ( अंग् ), रंगाशिले ( रंग– )

ं–घ : जाधिवा ( जंघा )

ं–च[1] : वाचणें ( वंचयति ), माचा ( मंचक ), पांचाखरी ( पंचाक्षरी ), चोंच ( चंचु )

ं–ज : मांजिठें ( मंजिष्ठ ), पांजिरा ( पंजर )

ं–झ : वांझौटी ( वंध्या–प्रा० वंझा ), सांझवेळ ( संध्या–प्रा० संझा )

ं–ट : वांटा ( वंट ), कांटा ( कंटक )

ं–ठ : सुंठ ( शुंठि ), कंठि ( कठ– )

---

१ क्वचित् ‘ं– च’ याची ‘न्ह’ अशी प्रक्रिया होते–पन्हरें ( पंचदश–पण्णरह )

-ड : मांडणें ( मंड् ), दांड ( दंड ), मुंठणें ( मुंड् ), सोंड ( शुंडा )

-त : आतौरी ( अंतःपुरिका ), दातिरी ( दंत- ), आंत ( अंतर ), भींतर ( अभ्यंतर ), आति ( अन्ति-लट्. तृ० पु० अ० व० )

-थ : पाथ ( पंथ ), काथेकारु ( कंथा- )

-द : सेदुर ( सिंदूर ), चादिणे ( चंद्र- ), आनदणें ( आनंद् )

-द्र : प्रा० न्द : साद ( साद्र ), चादिणे ( चद्र- )

-ध : आंधणा ( अधस् ), राधवणा ( रंध्- ), आंधारैले ( अंधकार- ), खादेवरि ( स्कध- )

-ध्र > प्रा० न्ध :

-प : चापौल ( चंपकपुष्प ), सापडणे ( सपत् ), सांपे ( संप्रति )

-फ : दुःखगुंफा ( -गुफ्- ? )

-ब : उंबर ( उदुंबर ), निंबौळी ( निंब- ), लांब ( लंब )

-भ : खांबु ( स्कंभ ), कुंभार ( कुंभकार )

## § ६२ अनुनासिक + अनुनासिक

( १ ) प्राकृतातील 'द्वित्त न्न-ण्ण' हे यादव-मराठीत एकेरी होतात, व त्यामुळे तत्पूर्व स्वर दीर्घ होतो. मात्र मराठीत येणारे एकेरी अनुनासिक बहुशः दंत्य ( न ), व क्वचित् मूर्धन्य ( ण ) असतें.

ण्ण > न : पान ( प्रा० पण्ण ), कान ( प्रा० कण्ण ), सुने ( शून्य-प्रा० सुण्ण )

ण्ण > ण : वाण ( वर्ण-प्रा० वण्ण )

न्न > न : कदन ( कदान्न ), आन ( अन्य-प्रा० अन्न )

( २ ) प्राकृतातील 'द्वित्त म्म' मराठींत एकेरी होऊन तत्पूर्व स्वर दीर्घ होतो—

चाम्हारु ( प्रा० चम्मआर ), कामारी ( प्रा० कम्मआरी ), चामक ( चर्मक )

( ३ ) दोन विषम अनुनासिक संयुक्त असल्यास त्यांतील दुसरें प्रभावी ठरतें व पहिलें दुसऱ्यांत मिसळतें—

म्न > प्रा० न्नं :
न्म > प्रा० म्म : उमाणे (उन्मान), उमलणे (उन्मीलन), **उमाळा** (उन्मेलः)

## § ६३ अनुनासिक + अर्धस्वर

**[१] अनुनासिक + यः—**

अनुनासिक प्रभावी ठरते व 'य' चा त्याच्याशी सयोग होतो—
राना (अरण्य); मान (मन्या); साम (साम्य); ताराण (तारुण्य), आनौते (अन्यतः); जानवसा (जन्यवास)

**[२] र युक्तः:—**

म्र > ं-ब : तांबे (ताम्र), आंबा (आम्र)
र्ण > न-ण : सोने (सुवर्ण); जुने (जीर्ण), वाण (वर्ण)
र्म > म : कामारी (कर्म-), चाम्हारु (चर्मकार), चामाठी (चर्मयष्टि)

**[३] लयुक्त :—**

म्ल > ं-ब : आंब (आम्ल)

**[४] वयुक्त :—**

न्व >
ंव >

## § ६४ अनुनासिकयुक्त ऊष्मे

(१) स्न, ष्ण > न्ह : उन्हाळे (उष्ण-), न्हाणी (स्ना-) पान्हा (प्रस्नव), कान्हु (कृष्ण)
(२) श्म : मिसुरे (श्मश्रु)
ष्म :
स्म : विसुरैला (विस्मृ-), मसणवट (स्मशान-)

## § ६५ य-युक्त जोडाक्षरें

(१) 'कंठ्य, तालव्य, मूर्धन्य, ओष्ठ्य स्पर्श + य' यात स्पर्श प्रभावी ठरतात, आणि 'य' त्यांत मिळून जातो-

१ मराठी निम्होळ (सं० निम्न) ही व्युत्पत्ति बरोबर असल्यास हा अपवाद ठरतो.

क्य : सींकें ( शिक्य )
ख्य : वाखाणिले ( व्याख्यान )
ग्य : लागणें ( लग्यते ), जोगा ( योग्य )
घ्य :
च्य : चूताकुर ( च्यूत- )
ज्य : जगजेठी ( -ज्येष्ठ- ), जोइसपण ( -ज्योतिष- )
ट्य : तुटणें ( त्रुट्यते ), फोडणे ( स्फुट्यते )
ड्य : जाडी ( जाड्य )
ढ्य :
प्य : लपणे ( लुप्य )
फ्य :
ब्य :
भ्य : भीतर ( अभ्यंतर ), भिजणे ( अभ्यंज्- ? )

( २ ) दंत्य स्पर्श + स : यात प्रथम 'य' मुळें दंत्याचें तालव्य होतें व नंतर हें तालव्य प्रभावी ठरून त्यांत 'य' सामावतो.

त्य > च्य > च्च : अढैच ( अर्धतृत्य ), नाच ( नृत्य ), निच ( नित्य), साचोकारे ( सत्य ), लोणीचें ( लवणत्य )

थ्य > छ्य > छ्छ :

द्य > ज्य > ज्ज : आजि ( अद्य ), विजू ( विद्युत् ), वाजौटी ( वाद्ययष्टि ), खाजें ( खाद्य ), वाजांत्र ( वाद्ययंत्र ), जूआरी ( द्यूत-)

ध्य > झ्य > झ्झ[1] : साझ ( संध्या ), माझार ( मध्यगृह ), वांझ ( वंध्या ), जुझता ( युध्य-)

( ३ ) 'ल, व, श, ष, स + य' : येथे प्रथम वर्णात 'य' सामावून जातो व पहिलें व्यंजन प्रभावी ठरतें.

ल्य : कालि ( कल्य-), तेली ( तैल्य-), मोल ( मूल्य ), सल्ल

---

१ क्वचित् 'ध्य' (स्वरांतर्गत) चा ढ होतांना दिसतो. उदा० ढवसाओ (अध्यवसायः)

( शल्य ), पालक ( पल्यंक ), सेलाटी ( शल्ययष्टि )

व्य : वेव्हारा ( व्यवहारक ), वावरू ( व्यापार ), वाघ ( व्याघ्र ), विंजण ( व्यजन ), वेग्र ( व्यग्र ), वाओ ( व्याप ), चक्रवीहु ( चक्रव्यूह )

श्य : दिसे ( दृश्यते ), नासे ( नश्यति ), सालेपण ( श्यालकत्व )

ष्य : होईल ( भविष्यति–प्रा० भविस्सहि ) ...वगैरे भविष्ये लृट्-मध्यें. क्वचित् क्ष होतो. उदा० मनुक्ष ( मनुष्य ), सीक्षे ( शिष्य )

स्य : काश ( कास्य )

त्स्य : मासोळी ( मत्स्य )

( ४ ) 'र्य' आणि 'ह्य' या जोडाक्षरात मात्र 'य' प्रभावी ठरून प्रथम वर्ण 'र–ह' हे त्यात मिसळतात—

र्य > य्य > ज्ज : जी ( आर्य ), काज ( कार्य ), आजा ( आर्यक ),

क्वचित् र्य > र : तुरे ( तूर्य )

ह्य > य्यह > ज्झ : वोझें ( वह्य ), गूज ( गुह्य ), माझें (मह्यम् ? )

य्य > ज्ज : शेज ( शय्या )

## § ६६ र-युक्त जोडाक्षरें

र-युक्त जोडाक्षरात 'र' हा दुसऱ्या व्यंजनांत सामावला जाऊन दुसरें व्यंजनच प्रभावी ठरते.

( १ ) 'र' हे दुसरे व्यंजन असलेलीं उदाहरणें—

क्र : वाकुडें ( वक्र– ), चाकवारा ( चक्र– ), ताक ( तक्र ), केणें ( क्रयण )

ग्र : जागें ( जागृत ), गाव ( ग्राम ), गाठि ( ग्रंथि ), आघाओ ( अग्रीय ), गावार ( ग्रामकार ), आगळें ( अग्र–ल ), उघाणी, ( उद्ग्रहणीक )

घ्र : वाघ ( व्याघ्र ), घाणि ( घ्राण )

त्र : वितुटी ( वित्रुट् ), पातें ( पत्र ), पाटसुत ( पट्टसूत्र ), आंतडें ( अंत्र ), जेथु ( यत्र )

प्र : पाथर ( प्रस्तर ), पसर ( प्रसर ), पाहरा ( प्रहर ), पहिला ( प्रथम ), पाह ( प्रकाश ), पेणें ( प्रयाण ), पसाय ( प्रसाद ) पाहुणरु ( प्राघुणक– ), कानवाथरु ( कृष्णप्रस्तर–व )

द्र : मुदी ( मुद्रिका ), मोहडा ( मुद्रा ), निजैला ( निद्रित ), दाम ( द्राम )

भ्र : भावु ( भ्रातृ ), भवर ( भ्रमर )

म्र > –ं ब : पहा मागे क्रमाक ६३

ध्र : धाडी ( ध्राडि : )

श्र : सासू ( श्वश्रू ), विसावा ( विश्रम ), पारिसे ( परिश्रय ), शिन ( श्रम ), शोणितेपुरी ( श्रोणित– )

स्र : मावुसी ( मातृश्वसा )

छ्र : उसाण ( उच्छ्रयण )

रयुक्त दंत्य स्पर्शाचा विचार मागे क्रमाक ३४ मध्यें केला आहे.

( २ ) ‘र’ हें पहिलें व्यंजन असतांना—

र्क : साकुर ( शर्करा ), माकोडा ( मर्कटकः )

र्ग : घागरी ( गर्गरिका ), मागु ( मार्ग )

र्घ : महाघ ( महार्घ )

र्च : कूंचा ( कूर्चक )

र्ज : गुजर ( गुर्जर ), मांजरी ( मार्जारी– ), भावजइ ( भ्रातुर्जाया ), गाजणें ( गर्ज् ), फूजिती ( स्फूर्ज् )

र्प : वोपणें ( अर्प् ); सोपारें ( शूर्पारक ); कापड ( कर्पट ); कोंपर ( कूर्पर ); सापु ( सर्प )

र्ब : दुबळा ( दुर्बल ); निबल ( निर्बल )

र्भ : गाभेवन ( गर्भवन ); दुहवा ( दुर्भगा )

र्ण : मागें पहा क्रमांक ६३

र्म : मागें पहा क्रमांक ६३

र्त, र्थ, र्द, र्ध : मागें पहा क्रमांक ३४

र्य : मागें पहा क्रमांक ६५

र्ल : निलागु ( निर्लोग ); निलजें ( निर्लज्ज )

र्व : येथें प्रथम 'र' चा 'व' होऊन नंतरची प्रक्रिया कधीं व न होता साधें 'व्व' असें रूप होतें. या दोन्ही प्रक्रिया यादव-मराठीत आढळतात. उदा० चावणें ( चर्वति ); वरील ( उर्वरित )

र्व > र्र : ( क्वचित् ) सरेगाउ ( सर्वगत ); पेर ( पर्व )

र्श : पासीं ( पार्श्व ), पास ( स्पर्श )

र्ष : घासणें ( घर्षति ); सीस ( शीर्ष )

## § ६७ ल-युक्त जोडाक्षरें

( १ ) ल्+म : मागे पहा क्रमाक ६३

ल्क : वाकळ ( वल्कल... ? )

ल्ग : आवगणें ( आवल्ग् )

प्ल, ल्प : कापणी ( कल्प्... ? ), पोहणे ( प्लवते- )

ल्प > ल : आलुमालु ( अला... ? )

( २ ) 'ल+य, व, ह'...यात 'ल' प्रभावी ठरून 'य, व, ह' याचा त्यांत समावेश होतो. उदा०

ल्य : मागे पहा क्रमांक ६५

ल्व : बेल ( बिल्व )

ल्ह : उलाटयंत्र ( उल्हाट )

( ३ ) 'ल' द्वितीय वर्ण असताना-

र्ल : मागें पहा क्रमांक ६६

ल्ल : पालवी ( पल्लव )

## § ६८ व-युक्त जोडाक्षरें

( १ ) 'कंठ्य, तालव्य, मूर्धन्य स्पर्श + व' : यांत स्पर्श प्रभावी ठरून 'व' त्यांत सामावतो.

क्व : पिकैलें ( पक्व ); तवंक ( तक्वम् )

ज्व : जरु (ज्वर); जाळु (ज्वाल); उजळता (उज्ज्वलता)
च्छ्व : उसासें (उच्छ्वास)
ट्व: खटाग (खट्वाग); खाट (खट्वा)

(२) दंत्य स्पर्श + व : दंत्य हे 'व' मध्यें सामावून शेवटी दोहोंचा मिळून ओष्ठय स्पर्श होतो. जसें, त्व > व्व > प्प

त्व : 'पण' भाववाचक प्रत्यय (त्वन्)

द्व : बारा (द्वादश); उबगैला (उद्विग्न); ही प्रक्रिया क्वचित् होते. नेहमी द्व > द्द हीच प्रक्रिया आढळते. उदा० दारवंठा (द्वार-); दीप (द्वीप); दुणो (द्विगुण); ददीया (द्वंद्विन्); दुपहारी (द्विप्रहर)

ध्व : उभा (ऊर्ध्व)

(३) ल्व > ल मागे पहा क्रमाक ६७

(४) ऊष्मे + व : ऊष्मे प्रभावी आणि 'व' चा त्याशीं संयोग.

श्व : पासी (पार्श्व); सावज (श्वापद); उसासितांति (श्वस्); आसुआर (अश्वकार)

ष्व : माउसी (मातृष्वस्रिका)

स्व : संवधुर (स्वयंधुर); सवें (स्वयं); सभावी (स्वभाव-); सर (स्वर); गोसाविणी (गोस्वामिनी); सूपवती (स्वप्

(५) व्य-र्व : 'य' आणि 'र' हे 'व' मध्ये सामावले जातात. मागे पहा क्रमांक ६५-६६

(६) ह्व + व > ब्भ : जीभ (जिव्हा-प्रा० जिब्भा); आभावणें (आव्हा)

## § ६९ ऊष्मे-युक्त जोडाक्षरें

(१) ऊष्मे आणि स्पर्श ही एकत्र आल्यास प्राकृतात त्याचा द्वित्त महाप्राण स्पर्श होतो. यादव-मराठींत हा स्पर्श एकेरी होऊन त्यातील महाप्राणत्व कधीं कायम राहतें तर कधी लोपतें. उदा०

श्च : विंचू (वृश्चिक); निचेष्ट (निश्चेष्ट); निचिंत (निश्चिंत)

ष्क : विखुरणें (विष्किरति); सुकें (शुष्क); पोखरिणी (पुष्करिणी); खीखींद (किष्किंध); दुकळु (दुष्काळ)
ष्प : निफन्नले (निष्पन्न)
ष्ट : आठै (अष्ट); मूठ (मुष्टि); पीठी (पिष्ट); उवेढा (उत्+वेष्ट); मांजिठी (मंजिष्ठ); वाजौठी (वाद्ययष्टि); आतुटी (आतुष्ट)
ष्ट्र : उंट (उष्ट्र)
ष्ठ : होट–ओठ (ओष्ठ); कोड (कुष्ठ); जगजेठी (जगज्जेष्ठ); पैठण (प्रतिष्ठान); पीढें (पृष्ठ); सेठी (श्रेष्ठिन्)
स्क : खाबु (स्कंभ); खादु (स्कंध)
स्त : आथुर (आस्तृ); पाथर (प्रस्तर); तोकडे (स्तोक); थोबडे (स्तोभ); थोंवेकारी (स्तबक); माथा (मस्तक); हातु (हस्त); पालटु (पर्यस्त); चोरथरा (–स्तर:); वोथर (उपस्तृ); विसीर्ण (विस्तीर्ण); हाती (हस्तिन्)
स्थ : थोरु (स्थविर); ठी (स्थिति); थाउ (स्थः); थैर (स्थिर)
स्प : फासणे (स्पृश् –?)
स्फ : फुटणे (स्फुट्); फुडे (स्फुट); फुजिती (स्फूर्ज्)

तात्पर्य, यादव-मराठीचा कल प्राकृतांतील महाप्राण कायम ठेवण्याकडे आहे. 'हातु, तोकडें, पालटु, ऊंट, सुके' अशी महाप्राण लोपल्याचीं उदाहरणें क्वचित् आढळतात. कोकणीत मात्र नियमानें महाप्राणाचा लोप होतो[१].

यादव-मराठींत क्वचित् कांहीं ठिकाणीं स्पर्श वर्ण ऊष्म्यांत सामावला जातो. म्हणजे वरीलच्या उलट प्रक्रिया होते. वर्तमान-मराठींत ती नाहीं. यादव-मराठींत याचीं उदाहरणें अति विरल आहेत व तीं अपवादात्मक मानावींत. जसें—

पसीम (पश्चिम)

---

१ Formation Of Konkani S. M. Katre (B. O. R. I. Vol. 19, p p. 3 )

(२) स्पर्श + ऊष्मे : याच्या विविध प्रक्रिया होतात. त्या अशाः—

क्ष > ख : आखर (अक्षर); सीखवी (शिक्षापयति); उपखा (उपेक्षा); पांखिरू (पक्ष); खर (क्षर); उखारला (उत्क्षारित्); खणौखणीं (क्षण–); खेंव (क्षेम); रुखराय (वृक्षराज); खेवण (क्षिप्); खीर (क्षीर); आख्यवानी (आक्षवाण); खादवखाल (–प्रक्षल्)

क्ष > च्छ > श : माशी (मक्षिका–प्रा० मच्छिआ); लस्मि (लक्ष्मी); कुसि (कुक्षि); सूत्र (क्षेत्र); रीस (ऋक्ष); सुरी (क्षुरिका)

त्स > च्छ – श–स : मदमछर (मत्सर); वच्छहरण (वत्स); उछावो (उत्सव); वछलु (वत्सल); वासरू (वत्स–); मासा (मत्स्य); उसंग (उत्संग)

क्ष > झ : झरणें (क्षर्); विझणें (वि + क्षि...?)

प्स > छ-स : आसरे (अप्सरस्)

क्ष > ह : सिहाणा (शिक्षमाणः –?)

यादव-मराठीत 'सं० क्ष' च्या 'ख, स, झ' अशा तीन प्रक्रिया आढळतात. पैकी झ–प्रक्रिया विरल आहे. ख, स–प्रक्रिया मात्र ०च्ची प्राकृतापासून थेट वर्तमान आर्य भाषापर्यंत विकल्पानें व जोडीनें रूढ दिसतात. छ–प्रक्रिया अथर्ववेदात सापडते इतकी जुनी आहे, 'क्ष–ख' हा विकार महाभारतात दिसतो. (उदा० क्षेटका–'खेट'). प्राचीनकाळी सं० क्ष–च्या 'छ' आणि 'ख' अशा दोन प्रक्रिया काहीं प्रमाणात स्थानभिन्न होत्या. म्हणजे प्राच्य शिलालेखात 'ख' आणि पश्चिम शिलालेखांत 'छ' होई, असें मत सर्वमान्यं आहे. यादव-मराठींत 'क्ष' च्या पुढील भिन्न प्रक्रिया आढळतातः—

सं० क्ष > ख : वर पहा.

स० क्ष > स–श :

सं० क्ष > ख किंवा स : कांख–कांस (कक्ष); आख–आंस (अक्ष)

सं० क्ष > छ–स : ऊस ( इक्षु–प्रा० इच्छु ); शेत ( क्षेत्र–प्रा० छेत्त ) वरीलपैकीं सं० क्ष > प्रा० छ > म० स हीच प्रक्रिया सर्वांत अधिक होत असल्यानें व त्याबाबत मराठीचें सिंहली आणि गुजराती या दोन भाषांशीं साम्य असल्यानें, प्रो० ब्लोक यानीं मराठीला पाश्चात्य भाषाविभागात घातली आहे.

( ३ ) ऊष्मे + अनुनासिक : मागे पहा. ( क्र० ६४ )

( ४ ) ऊष्मे + य – र – व : यात ‘ र, य, व ’ हे ऊष्म्यांत सामावले जाऊन ऊष्मे कायम राहतात. मागे पहा क्र० ६६

( ५ ) र + ऊष्मे : र ऊष्म्यांत सामावला जातो. पहा – क्र० ६६

श्य, ष्य, स्य : पहा क्रमाक ६५

श्र, ष्र, : पहा क्रमांक ६६

श्व, ष्व, स्व : पहा क्रमाक ६८

( ६ ) ह्क, ह्ख, ह्प >अनुक्रमे क्क, ख्ख, प्प.

( ७ ) म + ह >भ : भानवस ( महानस – प्रा० म्हाणस )

## § ७० वर्णव्यत्यास[२] ( Metathesis )

वर्णव्यत्यासाची यादव-मराठींतील उदाहरणे—

उरफाटे ( विपरीत ); हळू (लघु–प्रा० हलुअ ); सातवराओ (सामंतराज); कुऱ्हाड ( कुठार ); तळपदी ( दलपति ); [illegible] ( उत्कर्ष ); चाहा ( इच्छा ); ल्हाइजे ( लभ्यते ); भुजंकु ( भुजक ); अचवटे ( अवचट );

---

१ La langue Marathe : 101

२ प्रो० कृ० पां० कुळकर्णी यांनीं “ मराठी शब्दोच्चारांतील एक चमत्कार, अर्थात्–वर्णविपर्यय ” या लेखांत प्रस्तुत वर्णप्रक्रियेचा ऐतिहासिक व औपपत्तिक दृष्ट्या विचार केला आहे. हेमचंद्रानें दिलेलीं उदाहरणें ( प्राकृत व्याकरण ८–२–११६ ते १२४ ) व मराठीतील उदाहरणें तपासून प्रो० कुळकर्णी यांनीं वर्णविपर्ययाची प्रक्रिया ही निरपेक्ष नसून सापेक्ष असल्याचें व ‘ र, ण, ल, न, च, ह, य ’ या वर्णांचा विशेषानें व्यत्यास होत असल्याचें दाखविलें आहे. वर्णव्यत्यासाचीं यादव–मराठींतील वरील स्थळें या विधानास पोषकच आहेत... ... ( पहा : महाराष्ट्र-साहित्यपत्रिका, वर्ष १२, अंक ७ वा )

वाहाना ( उपानह् ); प्रजन्य ( पर्जन्य ); निभर्षिले ( निर् + भाष् ); गुजरध्वनि ( गर्ज् ); राण ( नगर–रअण ); अलंग ( अग्र + ल ); लुहडी ( लगुड ); रावणे ( वर्ण – वरण ); तवंक ( तक्रन् ); आरऊ ( अंकुर )

## § ७१ समवर्णलोप ( Haplology )

मळयपांचोर ( -पंचचोर ); वादुकें ( वावदूक ); भवनीं ( भवननीं ); रिकामा ( रिक्तकर्म ); वाद्यंत्र ( वाद्ययंत्र ); गुप्तावेओ ( गुप्तावयव )

## § ७२ वर्णागम ( Prothesis )

'ए' आणि 'ओ' याच्या पूर्वी अनुक्रमे 'य' आणि 'व' आल्याची उदाहरणें यादव-मराठीत विपुल आहेत. त्यावरून यादवकालीन बोली-मराठीचें स्वरूप कळूं शकेल. वर्तमान-मराठीत 'य' आणि 'व' केवळ अशिक्षितांच्या बोलण्यात येतात. यादव-मराठींत, विशेषतः नागर ग्रंथांत, 'ए–ओ' च्या मागे 'य-व' घालण्याचा स्वभावच दिसतो. तत्कालीन ग्रांथिक भाषेंत जर इतके वर्णागम होत, तर बोली-भाषेत किती तरी अधिक होत असतील त्याची कल्पना येते.

अ : अस्त्रीया ( स्त्री ); अस्तवन ( स्तवन ); अस्तीति ( स्थिति ); अवोझें ( वह्य )

य : येकु ( एक ); येर ( इतर>एर ); यकांत ( एकात ); यकवंकी ( एकवंकी ); येतुल ( इयत्– ); त्येज ( तेजस् )

व : वोखटें (ओखट); वोखद (औषध); वो (अहो); वोपणं ( अर्प् ); वोरकल (का० ओरेकल्लु); वोल (आर्द्र–ओल); वोस ( उदास); वोगर (का० ओग्गर); वोतवरु (ओतवर); वोवर (आवार ); वोंकार ( ओंकार ); वींगुळी ( अंगार–इंगळ )

अशा तऱ्हेचा वर्णागम प्राकृतांत फारच थोडा होता. वर्तमान भारतीय भाषातहि तो विशेष नाहीं. बंगालींत तो अति क्वचित् दिसतो. परंतु

१ Origin and development of Bengali, S. K. Chatterji, pp. 377—

प्राकृतात नसलेला हा वर्णागम यादव-मराठींत विपुल आहे. द्राविडी-सारख्या परभाषेचा संपर्क अधिक लागल्याने, यादव-मराठीत वर्णागम विशेष आहे असे वाटतें.

## § ७३ स्वरभक्ति ( Anaptyxis )

संस्कृतातील संयुक्त व्यंजनात प्राकृत भाषा एक स्वर घालून तें जोडाक्षर फोडीत. प्राकृताचा हा स्वभाव यादव-मराठींत विशेषत्वानें दिसतो. वर्तमान-मराठीपेक्षा स्वरभक्ति यादवकालीं निःसंशय अधिक प्रमाणांत होती. आज जी स्वरभक्तीचीं रूपें अशिक्षिताच्या बोलीतच मात्र दिसतात, ती यादवकाली ग्रांथिक मराठीत होती. उदा०

आरिसा (आदर्श); वरिस (वर्ष); हाथिएर (हत्यार); सुनिये (शून्य); पुरता (पूर्त); दुरंधर (दुर्धर); परिवस (स्पर्श); असकता ( आसक्त ); बहिरव (भैरव); लबधु (लुब्ध); सोआग ( स्वाग ); निगुती ( नियुक्ति ); परमुख्य (प्रमुख); सदगदा (सद्गद); अहलाद (आल्हाद); भानवस ( महानस ); सौरिये ( शौर्याणि ); मुगुते ( मुक्त ); दरुसन ( दर्शन ); जतन ( यत्न ); आरत ( आर्त ); वरीसावो ( वर्षाव ); सवादु ( स्वाद ); सीरीगीरी ( श्रीगिरि ) नाहाण ( स्नान ); परावर्ण ( प्रावर्ण ); आथरुतें ( आस्तृत ); समसान ( श्मशान ); कुजातर ( कुयंत्र )

## § ७४ स्पर्शागम ( Insertion of Plosives )

संस्कृतातील अनुनासिक+ल–र या जोडाक्षरातील दोन घटकामध्यें प्राकृतात कधी त्या अनुनासिकाच्या वर्गातील घोष स्पर्श घातला जाई. पुढें यादव-मराठींत ल–रचा त्या घोष स्पर्शाशीं संयोग होई. अशा तीन भिन्न प्रक्रिया संभवतात—

सं० म्र > ं–द्र > ं–ब्र : आंब्रा (आम्र); तांब्रें (ताम्र); आंब्रुट (अमृत)

सं० न्र > ं–द्र > ं–द : ~~पंधस ( पंचदश–प्रा० पण्णरह )~~

सं० म्ल > ं–ब्ल > ं–ब : आंब ( आम्ल )

## § ७५ आद्यव्यंजनलोप ( Aphoeresis )

आद्याक्षरांतील य, व, यांचा क्वचित् लोप होऊन त्यांच्या जागीं स्वर मात्र राहातो. उदा०

व : ओलांतरणें (वेलांतर–); ओतपली (वोतपली); इसाल (विषयाल–)
य : ए (येई); एंति (येताति); एस्वदा (यशोदा); सएमु (संयम); जएजए (जयजय); रसाएन (रसायन)

## § ७६ स्वरलोप ( Syncope )

स्तवे (अस्तवे); वरील (उर्वरित); शेखीं (अशेष); पैठिया (उपविष्ट); वाहाना (उपानह्); वाए (अर्पयति–अव्व); ढवसाओ (अध्यवसायः)

## § ७७ व्यंजनसंधि

यादव-मराठीत क्वचित् कोठें–विशेषतः महदंबेच्या धवळयात–एका शब्दातील दोन व्यंजनाचा संधि झालेला दिसतो. वास्तविक व्यंजनसंधि हा संस्कृत भाषेचा विशेष आहे; प्राकृत, अपभ्रंश व मराठीचा नव्हे. परंतु मराठीत, ग्रांथिक भाषेत नसले, तरी बोलीत व्यजनसंधि होतात हें खरें. उदा० "तो पड्ला", "तो बोल्ला"–(पडला, बोलला). यादव-मराठीतहि बोलताना असे संधि निःसंशय होत. ते ग्रंथनिविष्ट नसले तरी मुखनिविष्ट खचित होते. महादंबेचे धवळे हे तोंडानें गावयाचे असल्यामुळे त्यांत व्यंजनसंधि अनेक आढळतात. इतर ग्रंथ वाचले जात, तर ढवळे गायिले जात हा भेद नीट पाहिला पाहिजे. पुढे काही व्यंजनसंधींची उदाहरणे धवळयांतून देतों.

श्री (शिरीं); श्रणागत (शरणागत); नग्री (नगरी); तृग (तुरग); सैंवर (स्वयंवर); वेव्हारा (व्यवहारकः); केशवद्या (–देव > देय); संघ्रो (संग्रह); वऱ्हाडीक (वरहाट—?); नृत्यकोणी (नैऋत्य—); मनोर्थु (मनोरथ); व्रीदु (विरुद); अन्मोदित (अनुमोदित)

## § ७८ यादव-मराठींतील व्यंजनप्रक्रियेची रूपरेषा

येथवर भाषाशास्त्राच्या नियमाप्रमाणें होणाऱ्या सर्वसामान्य व वैयक्तिक स्वभावाप्रमाणें होणाऱ्या विशेष अशा दोन प्रकारच्या व्यंजनप्रक्रिया यादव-मराठीसंबंधी पाहिल्या. त्यावरून एकंदर व्यंजनप्रक्रियेची रूपरेषा

मांडितां येईल. मागें स्वरप्रक्रियेची रूपरेषा ज्या पद्धतीनें दिली आहे त्याच पद्धतीनें हीहि पुढें देतो. आंकडे याच भागांतील त्या त्या परिच्छेदाचे आहेत. ही रूपरेषा आद्य, मध्य व अंत्य अक्षरातील व्यंजनाची पहाणे आहे. परंतु अंत्य व्यंजन प्राकृतकाळींच लोपलें. अर्थात् ते यादव-मराठीत नसल्यानें त्याची चर्चाच उद्भवत नाहीं. पुढें प्राकृत हा शब्द प्राकृत-अपभ्रंश अशा दोहींकरिता योजिला आहे.

## § ७९ क

( १ ) आद्यः—

मराठी क < प्रा० क < सं० क क्रमांक ४२
< प्रा० क < स० क्र क्रमाक ६६, कोसु ( क्रोश ); केणे ( क्रयण )
< प्रा० क < स० क्ल, किलेस ( क्लेश )
< प्रा० क < स० क्व कढणे ( क्वथ् )

( २ ) मध्यः—

मराठी क < प्रा० क्क < सं० क्न – क्र० ५९
< सं० त्क – क्र० ५९
< सं० क्म– क्र० ६०
< स० क्य – क्र० ६५
< स० क्र – क्र० ६६
< स० र्क – क्र० ६६
< स० ल्क – क्र० ६७
< सं० ष्क – क्र० ६९
< सं० क्क – क्र० ६८
< सं० ट्क – क्र० ५९
< सं० कः मुकें (मूक-प्रा० मुंक्क), एक (प्रा० एंक्क)

## § ८०. ख

( १ ) आद्यः—

मराठी ख < प्रा० ख < सं० ख – क्र० ४२
< सं० क्ष – क्र० ६९
< सं० क – कोळि ( क्रीड् )
< सं० ख्य – क्र० ६५
< सं० स्क : खादा ( स्कंध ); खांब ( स्कंभ )

( २ ) मध्यः—

मराठी ख < प्रा० क्ख < सं० क्ष – क्र० ६९
< सं० श्क – क्र०
< सं० ष्क – क्र० ६९
< सं० स्क – क्र० ६९
< सं० ख्य – क्र० ६५
< सं० थ – क्र० ५६
< सं० क्त : तीखट ( तिक्त )

## § ८१ ग

( १ ) आद्यः-

मराठी ग < प्रा० ग < सं० ग क्र० ४२
< सं० ग्र क्र० ६६
< प्रा० घ < सं० गृ : घर ( गृह ); घेपे ( गृण्ही )

( २ ) मध्यः—

मराठी ग < प्रा० ग < सं० क क्र० ४७
< प्रा० ग्ग < सं० द्ग क्र० ५९
< सं० ग्न क्र० ६०
< सं० ग्य क्र० ६५
< सं० ग्र क्र० ६६
< सं० र्ग क्र० ६६
< सं० ड्ग क्र० ५९

< सं० ल्ग   क्र० ६७

## § ८२ घ

(१) आद्यः—

मराठी घ < प्रा० घ < सं० घ – क्र० ४२
< प्रा० घ्घ < सं० घ्र – क्र० ६६

(२) मध्यः—

मराठी घ < प्रा० घ्घ < सं० द्घ – क्र० ५९
< सं० घ्न –
< सं० घ्र – क्र० ६६
< सं० र्घ – क्र० ६६

## § ८३ च

(१) आद्यः—

मराठी च < प्रा० च < सं० च – क्र० ४२
< सं० त्य : चा-ची-चे (त्यत्)
< सं० च्च – क्र० ५९

(२) मध्यः—

मराठी च < प्रा० च्च < सं० त्य – क० ६५
< सं० श्च – क्र० ६९
< सं० च्य – क्र० ६५
< सं० र्च – क्र० ६६

## § ८४ छ

(१) आद्य मराठी छ < प्रा० छ < सं० छ – क्र० ४२

(२) मध्य मराठी छ < प्रा० छ < सं० त्स्य : मदमछ्लु (–मत्स्य :)

यादव-मराठींत तद्भव शब्दात मध्य छ क्वचित् येतो. बहुतेक ठिकाणीं त्याचा स होतो.

त्स—छ ही प्रक्रिया अति प्राचीन आहे. संस्कृत " चिकित्सा " याचें अशोकाच्या शिलालेखांत " चिकिच्छा " असें एक रूप होतें.

## § ८५ ज

(१) आद्य मराठी ज < प्रा० ज < सं० ज – क्र० ४२
< प्रा० ज्ज < सं० ज्य – क्र० ६५
< प्रा० ज्ज < सं० ज्व – क्र० ६८
< प्रा० ज्ज < सं० द्य – क्र० ६५
< प्रा० ज < सं० य – क्र० ४४

(२) मध्य मराठी ज < प्रा० ज < सं० ज : पांजिर (पंजर)
प्रा० ज्ज < सं० ज्ज-ज्ञ : क्र० ५९
< सं० ञ्ज – क्र० ५९
< सं० द्य – क्र० ६५
< सं० ज्व – क्र० ६८
< सं० र्ज – क्र० ६६
< सं० र्य – क्र० ६५
< सं० य्य – सेज (शय्या)
< सं० र्य : पेज (पेय);
दुजें ( द्वितीय ); क्र० ५१

## § ८६ झ

(१) आद्य मराठी झ < प्रा० झ < सं० झ – क्र० ४२
< सं० ध्य – क्र० ६५
< सं० ध्व

---

१ द्वितीय—तृतीय येथें 'य' ऐवजीं 'य्य' हा आदेश प्रो० ब्लोक मानतात. त्यांच्या मतें हा " य्य " वैदिक भाषेतील होय. पहा—
La langue Marathe, 106

< सं० क्ष – क्र० ६९
< सं० ज

(२) मध्य मराठी झ < प्रा० ज्झ < सं० झ – क्र० ६५
< सं० ध्य – क्र० ६५
< सं० क्ष – क्र० ६९

## § ८७ ट

(१) आद्य मराठी ट < प्रा० ट < सं० ट क्र० ४२
< प्रा० त < सं० ट (क्वचित्) – क्र० ३४

(२) मध्य मराठी ट < प्रा० ट्ट < सं० अनुनासिक + ट : काटी (कंटक)
< सं० ट्व – क्र० ६८
< सं० र्त : क्र० ३४
< सं० ट्य : क्र० ६५

## § ८८ ठ

(१) आद्य मराठी ठ < प्रा० ठ < सं० स्थ : क्र० ६९

(२) मध्य मराठी ठ < प्रा० ठ्ठ < सं० अनुनासिक + ठ : काठ (कंठ)
< सं० ष्ठ : क्र० ६९
< सं० ठ : मठ (मठ)
< सं० र्थ : क्र० ३४
< सं० स्थ : क्र० ६९

## § ८९ ड

(१) आद्य मराठी ड < प्रा० द < सं० द (क्वचित्) : डंक (दंश), क्र० ३४

(२) मध्य मराठी ड < प्रा० ड < सं० ड : सोंड (शुंडा), मांडव (मंडप)

< स० ट: क्र० ४९
< सं० ऋ + त : क्र ३४
< प्रा० ड्ड < सं० र्द क्र० ३४
< सं० ड्डु : उडणें (उड्डी),
क्र० ५९
< प्रा० ड्ढ < सं० र्ध : क्र० ३४
< प्रा० ड < सं० र : क्र० ५६

## § ९० ढ

(१) आद्य मराठी ढ प्रा० ढ < मूळ संस्कृत अनिश्चित
(२) मध्य मराठी ढ प्रा० ड्ढ < सं० र्ध — क्र० ३४
< सं० ऋ + ध : वाढ (वृद्ध), क्र० ३४
< सं० ठ : मढु (मठ); पढ (पठ्)
< स० ढ : दाढ (दृढ)
< स० थ : सढळ (शिथिल)
< सं० ष्ट, ष्ठ : क्र० ६९

## § ९१ ण

(१) आद्य मराठी ण नाही
(२) मध्य मराठी ण < प्रा० ण < सं० न : क्र० ५०
< सं० ण : क्र० ५०
< प्रा० ण्ण < स० र्ण : (क्वचित्) : क्र० ६३
< प्रा० ण्ण < सं० ज्ञ : क्र० ६०

## § ९२ त

(१) आद्य मराठी त < प्रा० त < सं० त : क्र० ४२
< सं० त्र : तीन (त्रीणि)
< सं० त्य :

(२) मध्यमराठी त < प्रा० त्त < सं० न्त : क्र० ६१
< सं० त्त : क्र० ५९
< सं० क्त : क्र० ५९
< सं० प्त : क्र० ५९
< सं० त्न : क्र० ६०
< सं० त्र : क्र० ६६
< सं० त्व :
< प्रा० त्थ < सं० स्त, स्थ : क्र० २९
< प्रा० त्थ < सं० क्थ : क्र० ५९
(क्वचित्)

## § ९३ थ

(१) आद्य मराठी थ < प्रा० थ < सं० स्त : क्र० ६९
< सं० स्थ : क्र० ६९
(२) मध्य मराठी थ < प्रा० त्थ < सं० त्र : क्र० ६६
< सं० र्थ : क्र० ३४
< सं० स्त : क्र० ६९
< सं० स्थ : क्र० ६९
< सं० न्थ : क्र० ६१
< सं० च[1] : (क्वचित्) क्र० ५६

## § ९४ द

(१) आद्य मराठी द < प्रा० द < सं० द : क्र० ४२
< सं० द्र : क्र० ६६
< सं० द्व : क्र० ६८
(२) मध्य मराठी द < प्रा० द्द < सं० द्द : क्र० ५९
< सं० द्ब : क्र० ५९
< सं० द्र : क्र० ६६
< सं० र्द : क्र० ६६

---

१ ही प्रक्रिया (थ < च) यादव-मराठींतच काय ती दिसते. हिचा उल्लेख कोणी करीत नाहीं. पहा— "सिंथितु" (सिंचू)

< सं० द्ध : क्र० ६८<br>
< प्रा० ध < सं० ध : क्र० २९<br>
(महाप्राणत्वलोप)

## § ९५ ध

(१) आद्य मराठी ध < प्रा० ध < सं० ध : क्र० ४२<br>
(२) मध्य मराठी ध < प्रा० ध्ध < सं० न्ध : क्र० ६१<br>
< सं० ग्ध : क्र० ५९<br>
< सं० ब्ध : क्र० ५९<br>
< सं० र्ध : क्र० ६६<br>
< सं० ध्र : क्र० ६६<br>
< सं० द्ध : क्र० ५९

## § ९६ न

(१) आद्य मराठी न < प्रा० न–ण < सं० न : क्र० ४२<br>
< सं० न्य : नेसणे (न्यस्)<br>
(२) मध्य मराठी न < प्रा० ण्ण < सं० ण्य : क्र० ६३<br>
< सं० र्ण : क्र० ६३<br>
< सं० ण्व : क्र० ६३<br>
< प्रा० ण्ह < सं० क्ष्ण : सानें (श्लक्ष्ण)<br>
< सं० ष्ण : कानवाथरु<br>
(कृष्णप्रस्तर)<br>
< सं० श्न :<br>
< सं० स्न :<br>
< प्रा० न्न–ण < सं० न्न : क्र० ६२<br>
< सं० न्य : क्र० ६३<br>
< सं० ज्ञ : क्र० ६०<br>
< सं० म्न : क्र० ६२

## § ९७ न्ह

(१) आद्य मराठी न्ह < प्रा० न्ह < सं० स्न : क्र० ६४

(२) मध्य मराठी न्ह < प्रा० ण्ह < सं० स्न : क्र० ६४ पान्हा (प्रस्नु)
< सं० ष्ण : क्र० ६४ ऊन्ह (उष्ण)
< प्रा० ण्णर < सं० चद : साडेपन्हरें (पंचदश)

## § ९८ प

(१) आद्य मराठी प < प्रा० प < सं० प : क्र० ४२
< सं० प्र : क्र० ६६
< सं० प्ल : क्र० ६७

(२) मध्य मराठी प < प्रा० प्प < सं० त्प : क्र० ५९
< सं० त्म : क्र० ६०
< सं० प्र : क्र० ६६
< सं० र्प : क्र० ६६
< सं० ल्प : क्र० ६७
< सं० त्व : क्र० ६८
< सं० प्य : क्र० ६५
< सं० च : क्र० ५६
(क्वचित्)
< प्रा० प्फ < सं० फ : क्र० २९

## § ९९ फ

(१) आद्य मराठी फ < प्रा० फ < सं० फ : क्र० ४२
< सं० स्फ : क्र० ६९
< सं० स्प : क्र० ६९
< सं० प : (क्वचित्)
क्र० २७

(२) मध्य मराठी फ < प्रा० प्फ < सं० स्फ : क्र० ६९
< सं० ष्फ : क्र० ६९
< सं० ष्प : क्र० ६९

## § १०० ब

(१) आद्य मराठी ब < प्रा० ब < सं० ब : क्र० ४२

< सं० द्व : क्र० ६८
< सं० ब्र : क्र० ६६
< सं० व : क्र० ४४
(२) मध्य मराठी ब < प्रा० ब्ब < सं० र्ब : क्र० ६६
< सं० ब्र : क्र० ६६
< सं० र्व : क्र० ६६
< प्रा० ब्भ < सं० भ : क्र० २९
< प्रा० म्ब < सं० म्र-म्ल : क्र० ६३

## § १०१ भ

(१) आद्य मराठी भ < प्रा० भ < सं० भ : क्र० ४२
< सं० भ्र : क्र० ६६
< प्रा० म्ह < सं० मह : भानवस (महानस) क्र० ६९-७
(२) मध्य मराठी भ < प्रा० ब्भ < सं० द्भ : क्र० ५९
< सं० भ्य : क्र० ६५
< सं० र्भ : क्र० ६६
< सं० भ्र : क्र० ६६
< सं० व्ह : क्र० ६८

## § १०२ म

(१) आद्य मराठी म < प्रा० म < सं० म : क्र० ४२
< सं० म्र :
< सं० म्ल :
< सं० स्म : क्र० ६४
(२) मध्य मराठी म < प्रा० म्म < सं० न्म : क्र० ६२
< सं० म्य : क्र० ६३
< सं० र्म : क्र० ६३
< सं० ल्म : क्र० ६३
< प्रा० म्ह < सं० ष्म : क्र० ६४
< सं० श्म : क्र० ६४

< सं० स्म : क्र० ६४
< सं० क्ष्म : पाकळी
(पक्ष्मन् ?)

## § १०३ म्ह

(१) आद्य मराठी म्ह < प्रा० म्ह < सं० म : क्र० २६
(महाप्राणत्व येऊन)
< सं० भ : म्हणौनि (भण्)

(२) मध्य मराठी म्ह < प्रा० म्म < सं० र्म : चाम्हारु (चर्मकार)
< सं० म्न : निम्होळ (निम्न)
क्र० ६२

## § १०४ य

(१) आद्य मराठी य < प्रा० ए < सं० ए :
< सं० अइ :
< सं० य : (तत्सम शब्दांत)

(२) मध्य मराठी य < प्रा० य < सं० स्पर्श : क्र० ५१...

संस्कृतातील क, ग, च, ज, त, द, प यांचा प्राकृतांत लोप झाल्यानें जें "प्रगृह्य" निर्माण होतें तें टाळण्यासाठीं मराठींत मध्यभागीं हा य येतो.

## § १०५ र

(१) आद्य मराठी र < प्रा० र < सं० र : क्र० ४४
< सं० वृ : क्र० २ रुख (वृक्ष)

(२) मध्य मराठी र < प्रा० र < सं० र : क्र० ५२
< सं० ल : क्र० ५६

## § १०६ ल

(१) आद्य मराठी ल < प्रा० ल < सं० ल : क्र० ५५
< सं० र : (क्वचित्) लेणें
(रत्नं...?)

(२) मध्य मराठी ल < प्रा० ल्ल < सं० ल : क्र० ६६
< सं० ल्य : क्र० ६५
< सं० ल्व : क्र० ६७
< सं० ल्ल : क० ६७
< सं० द्र : वोल (आर्द्र),
भला (भद्र)
< सं० ल्प : क्र० ६७

## § १०७ ळ

(१) आद्य मराठी ळ नाहीं.

(२) मध्य मराठी ळ < प्रा० ल < सं० ल : क्र० ५३–५४
< प्रा० ल–ड < सं० ट–ड : क्र० ५६
< प्रा० ल्ल < सं० ल्य : क्र० ३४ सळ (शल्य)
< प्रा० र < सं० र : क्र० ५६ साळांक (शर–)

## § १०८ व

(१) आद्य मराठी व < प्रा० व < सं० व : क्र० ४४
< सं० व्य : क्र० ६५
< सं० व्र : क्र० ६६
< प्रा० उव < सं० उप : वाहाना (उपानह्)
< प्रा० ओ < सं० ओ–औ : क्र० ४४
वोखद (औषध)

(२) मध्य मराठी व < प्रा० व < सं० प : क्र ५१
< सं० स्पर्श : य–प्रमाणें क्र० ५१
(हा 'व' प्रगृह्यभेदक आहे. क्र० ८)
< प्रा० वं < सं० म : क्र० ५०

## § १०९ ष

यादव-मराठींत ष केवळ शुद्ध तत्सम शब्दांतच येतो.

## § ११० श

(१) आद्य मराठी श < प्रा० स < सं० श : क्र० ४५

(२) मध्य मराठी श < प्रा० स < सं० श : तत्समात

< सं० स्य : क्र० ६५ (क्वचित्)

< सं० र्श : पार्शी (पार्श्वे)

< प्रा० च्छ < सं० क्ष : क्र० ६९-२

माशी (मक्षिका)

< प्रा० च्छ < सं० त्स :

## § १११ स

(१) आद्य मराठी स < प्रा० स < सं० श, ष, स : क्र० ४५

< सं० श्र : क्र० ६६

< सं० श्य : क्र० ६५

< सं० श्ल : क्र० ६७

< सं० श्व : क्र० ६८

< सं० स्य : क्र० ६५

< सं० स्र : क्र० ६६

< सं० स्व : क्र० ६८

< प्रा० छ < सं० क्ष : क्र० ६९

< सं० छ : क्र० ४२

< सं० त्स : क्र० ४२

(२) मध्य मराठी स < प्रा० स

< सं० श, ष, स : क्र० ५४

< प्रा० स्स < सं० र्श : क्र० ६६

< सं० श्र : क्र० ६६

< सं० श्य : क्र० ६५

< सं० ष्य : क्र० ६५

| | | | |
|---|---|---|---|
| | < सं० स्य | : | क्र० ६५ |
| | < सं० स्र | : | क्र० ६६ |
| | < सं० स्ठ | : | क्र० ६७ |
| | < सं० श्व | : | क्र० ६८ |
| | < सं० च्व | : | क्र० ६८ |
| | < सं० स्व | : | क्र० ६८ |
| | < सं० र्ष | : | क्र० ६६ |
| < प्रा० च्छ | < सं० क्ष | : | क्र० ६९ |
| | < सं० प्स | : | क्र० ६९ |
| | < सं० च्छ्व | : | क्र० ६८ |
| | < सं० त्स | : | क्र० ६८ |
| | < सं० च्छ | : | क्र० ५९ |
| | < सं० छ्र | : | क्र० ६६ |
| | < सं० त्स्य | : | क्र० ६५ |

## § ११२ ह

(१) आद्य मराठी ह < प्रा० ह < सं० ह : क्र० ४५
< सं० स : क्र० ४५
< सं० स्वर : क्र० २७
हान (अन्य) महाप्राणत्वानें

(२) मध्य मराठी ह < प्रा० ह < स० श, स क्र० ५४
< सं० ख, घ, थ, ध, फ, भ,
(स्पर्शत्वलोपानें); क्र० ४८
< सुलभोच्चाराकरितां : क्र० ५५

---

# भाग दुसरा
## प्रत्ययप्रक्रिया
### नामविभक्ति
### § १ लिंग

यादव-मराठींत पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग अशीं तीन लिंगें आहेत. ही परंपरा संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश यांच्या द्वारा आलेली आहे. इंडो-युरोपीयन भाषात लिंगाला गौणत्व असून नामाची जाति, म्हणजे सचेतनत्व वा अचेतनत्व, हेंच मुख्य होयें, व त्या दृष्टीने इंडो-युरोपीयनमध्यें नपुंसकलिंगी नामांचा एक वेगळाच गट पडतो. परंतु इंडो-आर्यनमध्यें सजीवतेला महत्त्व नसून नैसर्गिक लिंगभेदाला आहे. आर्य भाषांतील लिंगविचार प्रो० ब्लोकें यांनी विस्ताराने केला आहे. त्यावरून मराठीनें लिंग-भेदांची जुनी परंपरा कायम ठेवलेली दिसेल. यादव-मराठींत त्या त्या लिंगाचे कांहीं विशिष्ट अंत्य स्वर दिसतात. उदा०

— अ : तिन्ही लिंगीं, पण विशेषतः पुल्लिंगीं व नपुंसकलिंगीं.

— आ : पुल्लिंग व स्त्रीलिंग

— एं : नपुंसकलिंग ( सोनें, बोणें )

— ऐ : पुल्लिंग व स्त्रीलिंग

—ओ, औ : फक्त पुल्लिंग ( ब्रह्माओ, गोल्हो, मांडौ )

म्हणजे विशिष्टीकरणाला आरंभ होत होता. यादव-मराठींत लिंगबदल मात्र फार जोराचा दिसतो. प्राकृतांत, अपभ्रंशांत तो होताचें. "णायकुमारचरिउ"-मध्यें

परियणाइं ( परिजनः ), किंकराइं ( किंकरः )

दीणइं ( दिनः ), कुंभइं ( कुंभः )

---

१ J. Lohmann's 'Genus and Sexus'

२ J. Bloch : L'indo-aryen, pp. 150

३ Hemchandra I. 31-36; IV 445

अशीं पुल्लिंगाचें नपुंसकलिंग झाल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. अपभ्रंशाचीच परंपरा मराठीनें चालू ठेविली. यादव-मराठींतील कांहीं लिंगबदल पहा.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| स्नेहो | (न०) | – शिशु० | १०१ | सं० | स्नेहः |
| विवसी | (स्त्री०) | – शिशु० | १३२ | सं० | विवासः |
| अंतोर | (न०) | – शिशु० | २४० | सं० | अंतःपुरिका |
| पोफळी | (स्त्री०) | – शिशु० | २९८ | सं० | पुष्पफलः |
| गांव | (न०) | – स्मृ० | २१२ | सं० | ग्रामः |
| भीतरु | (पु०) | – उद्ध० | ३९९ | सं० | अभ्यंतरम् |
| झुंजि | (स्त्री०) | – उद्ध० | ४४९ | सं० | युद्धम् |
| आंधारें | (न०) | – उद्ध० | ८१७ | सं० | अंधकारः |
| वेलें | (न०) | – उद्ध० | ७३० | सं० | वेलः–ली |
| फुला | (पु०) | – ऋ० | ५११ | सं० | पुष्पम् |
| कणव | (न०) | – ऋ० | ४८० | सं० | कृपा |
| मन | (पु०) | – ऋ० | ६२२ | सं० | मनस् |
| प्रणये | (न०) | – स्मृ० | ११४ | सं० | प्रणयः |
| गीतु | (पु०) | – स्मृ० | ९० | सं० | गीतम् |
| कळी | (स्त्री०) | – लीला० | १-३६ | सं० | कलिः |
| कटकें | (स्त्री०) | – लीला० | १-५४ | सं० | कटकः–कम् |
| सांखळे | (न०) | – दृ० | ८१ | सं० | शृंखला |
| सुनें | (न०) | – उद्ध० | ३२८ | सं० | श्वन् (पु०) |

अशीं अनेक उदाहरणें आहेत. काहीं ठिकाणीं मात्र लिंग साभिप्राय बदललेलें दिसतें. उदा०

"काळें भवंडिलीं बापुडीं : **जीवपशुवें**।" ऋ० १७७

येथें 'पशु' हें बुद्धयाच हीनत्वदर्शनाकरितां नपुंसकलिंगी केलें आहे. तसेंच—

"**तें ब्राह्मण** एकसर साबडें।" —शि० २०४

कांहीं नामें संस्कृताप्रमाणें मूळ लिंगांतच ठेविलीं आहेत. वर्तमान मराठींत त्यांत लिंगबदल दिसेल. उदा०

जन्म (न०) – उद्ध० ३६७
काच (पु०) – उद्ध० ६२२
स्वप्न (पु०) – दृ० १०४

पुल्लिंगी नामांचें स्त्रीलिंग बनविण्याकरिता 'ई' व 'ईणि' हे प्रत्यय साधारणतः वापरले जातात. पहा—

देउळ—देउळी (लीला० १-५९)
कळदिवा—कळदिवी (लीला० १-३८)
महार—महारी (दृ० ४८)
मळ—मळी (दृ० ६७)
तेली—तेलिणी (लीला० १-११)
गोसावी—गोसावीणी (दृ० ६२)
मढ--मढी (स्मृ० ६५)
पाथर--पाथरी (स्मृ० १८)

वरील लिंगबदलाची उदाहरणें पाहिली म्हणजे नैसर्गिक लिंगभेदाचा व व्याकरणांतील लिंगभेदाचा कधींतरी एकभाव होता किंवा नाहीं हा प्रश्न पुढें येतो. यादव-मराठीसारखी प्रगल्भ भाषा पाहिली तरी ती निसर्गसिद्ध वा अर्थसिद्ध लिगाला सोडून केवळ शब्दाच्या रूपावरून लिंगनिश्चिति करते. वरील यादीत "फला" (पु०), "कटकै" (स्त्री०), "सांखळें" (न०) ही नामें अनुक्रमें आकारान्त, ऐकारान्त व एकारान्त आहेत म्हणूनच त्यांस तीं तीं लिंगें प्राप्त झालीं आहेत. शब्दरूपावरून लिंग ठरविण्याचा जो प्रकार यादव-मराठींत दिसतो, तोच हॉटेंटॉटसारख्या[१] रानटी भाषेंतहि आहे. पुरुषवाचक व स्त्रीवाचक शब्दाना नित्य लागणाऱ्या अंत्यप्रत्ययावरून या रानटी भाषेनें इतर शब्दाची लिंगव्यवस्था करून टाकली आहे. तात्पर्य, भाषा सुसंस्कृत असो वा रानटी असो, अमक्या शब्दाचें अमुक लिंग कां,

---

१ "Sex-distinction arose from the possibly accidental circumstance that the nouns indicating man and woman were formed with different derivative suffixes, and these suffixes thus began to indicate the distinction of sex in nouns where it could be distinguished"—
—Comp. Grammar of S. African Langs. by Bleek, pp. 123

या प्रश्नाचें उत्तर मिळेलच असें नाहीं. येस्पर्सन[1] या भाषाशास्त्रज्ञाच्या मतें तर हें लिंगकोडें कधींच सुटणार नाहीं.

## § २ वचन

यादव-मराठींत एकवचन व अनेकवचन अशीं दोन वचनें आहेत. अनेकवचनांत अर्थात् द्विवचन आलेंच. स्वतंत्र द्विवचन महाराष्ट्रींत[2] नाहीं, अपभ्रंशांत नाहीं. अर्थात्, यादव-मराठींतहि तें नसावें. परंतु क्वचित् कोठें द्विवचनाचीं रूपें आढळतात. पैकी राजवाड्यांनीं "शशि-सूर्यां" एवढें एकच सप्तमीच्या द्विवचनाचे रूप दिलें आहे. महानुभाव ग्रंथात आणखी पांचसात तरी शुद्ध द्विवचनें सांपडतात. सर्वांची एकच याद पुढें देतों—

१ शशिसूर्यां ( सं० शशिसूर्ययोः ) – ज्ञा० ७–३२
२ उपानहौ ......ऋ० २०५; स्मृ० २१८, लीला० १-७३
३ उपानौह, उपानौ — स्मृ० १७९
४ उपाहानउ — लीला० १–७२
५ श्रीचरणां ( सप्त० द्विव० ) — लीला० १–५७
६ चक्रवाकें — शि० २९९
७ करौ -- वच्छ० १०६
८ मायबापां -- वच्छ० ४०७
९ करां जोडौनि ( सं० कराभ्याम् ) – वच्छ० ३८६
१० ग्रामौ, द्वौ, पाषाणौ ( चिकुर्डे ताम्रपट—राजवाडे )

वरील रूपांत एक विशेष आहे. उपानह्, चरण, कर, चक्रवाक् या शब्दांच्या सदा जोड्याच असतात. म्हणजे द्वैताची कल्पना त्यांत स्वच्छ आहे. अशा नामांचीं द्विवचनी रूपें क्वचित् आढळतात. 'करौ' आणि 'उपानहौ' हीं रूपें तत्सम म्हणून सोडलीं तरी, इतर रूपांतील द्विवचन स्पष्ट मराठी आहे. किंवा, दुसरी एक उपपत्ति लावता येईल. वरील द्विवचनांपैकीं कांहींचीं प्रातिपदिकेंच मूळांत संस्कृत द्विवचनावरून घेतलेलीं असावींत. सर्व

---

१ Jesperson: 'Language', pp. 393

२ हेमचंद्र, प्राकृत व्याकरण, ३–१३०

महानुभाव ग्रंथांतून 'उपानह्' या नामाचें एकवचन वा अनेकवचन न आढळतां सदा 'उपानहौ' किंवा 'उपानौ' असें द्विवचन आढळतें. हें या दृष्टीनें चिंत्य आहे. कसेंहि असलें तरी यादवकालीं द्विवचनाची, द्विभाव-दर्शक नामांपुरती कां होईना, परंतु अंधुक आठवण होती हें निश्चितें. मात्र एवढ्यावरून महाराष्ट्री व अपभ्रंश भाषाच्या व्याकरणांत द्विवचनाचा उल्लेख न केल्याबद्दल वररुचि–हेमचंद्रांची दृष्टि "पाणिनीप्रमाणें सर्वंकष नव्हती व ते दडपेबाजीचे नियम देतातें" ही राजवाड्याची टीका अयोग्य होय.

## § ३ नामविभक्तिप्रत्यय

नामरूपाच्या प्रक्रियेचा विचार येथें तीन दृष्टींनीं करणें आहे.

१ प्रत्ययसाधित रूपें : Synthetical

२ अर्धप्रत्ययसाधित रूपें : Quasi Synthetical

३ शब्दसाधित रूपें : Analytical

प्रथम प्रत्ययविभक्तींचें विवेचन करतों. एतद्विषयीं सामान्य चर्चा प्रस्तावनेंत केली आहे. येथें प्रत्ययाची परंपरा देतों. उदाहरणें मुख्यतः ज्ञानेश्वरी व महानुभावी ग्रंथ यांतून घेतलीं आहेत. मात्र, जेथें विशेष कारण पडलें तेथें शिलालेख–ताम्रपटांतून रूपें देतों. तीं ससंदर्भ आहेत.

## § ४ पुल्लिंगी नामें

यादवकालीं पुल्लिंगी नामाच्या अंतीं पुढील स्वर आढळतात...

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऐ, ओं, औ.

---

१ पंडित भीष्माचार्य या महानुभावीय वैयाकरणानें द्विवचनाचा उल्लेख केला आहे. तो म्हणतोः–

"सलिंग पदांचिए तीनि वचनें असति : एकवचन : द्विवचन : बहुवचन : 'देव आले' येथ द्वित्व बहुत्व असें भणौनि द्विवचन बहुवचन : तेंचि द्वित्व बहुत्व प्रकरणवशें आनिजे"
—पंचवार्तिक ( संपा० मोने )

वरील, एक तर परंपरागत रूढिदर्शक आहे, किंवा यादव-मराठींतील पुसट द्विवचनाचें द्योतक आहे.

२ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान, २०

३ राजवाडे ओकारान्त पु० नामांचा उल्लेख करीत नाहीत. त्यांनीं ज्ञानेश्वरीपुरतेंच पाहिलें आहे. महानुभावी ग्रंथांत हीं रूपें आहेत.

पैकीं अकारान्त नामांचा विचार प्रथम विस्तारानें करतों, म्हणजे इतरांचा उलगडा सहज होईल.

## § ५ अकारान्त पुल्लिंगी

**प्रथमाः**—एकवचन—१ गणेशु, रसु, वैद्यु, सूर्यु, जीउ, उगऊ, प्रसऊ, संभहु, सींहु, दत्तु, गाउ, गांवु [तासगांव ताम्रपट]

२ आश्रो, विषो, उपाओ, अतिसो, राओ, भाओ, तांओ, आओ, प्रीयो, न्यावो, उपद्रो, सिंहिप्रो [नागांव शिलालेख], माहो

अशीं ओकारान्त व उकारान्त रूपें आहेत. अर्थात् 'उ' व 'ओ' असे दोन भिन्न प्रत्यय होते. परंतु दोहींची व्युत्पत्ति व परंपरा एकच आहे. तीं अशी—

म० ओ-उ < अपभ्रंश उ < प्रा० ओ < सं० स्

'उ' कारान्त रूपें मराठीनें अपभ्रंशापासून घेतलीं.

आश्रो [आश्रयः], विषो [विषयः], माहो [माघः], हीं रूपें ओकारान्त होतात. तेव्हां य्-व् हे ऊष्मे व ह् हा महाप्राण उपांत्य असतां ए० व० ओकारान्त होई. यांत उच्चारसौलभ्य आहे. परंतु यावरून राजवाडे[2] नियम बांधतात, कीं "यान्त्य, वान्त्य व हान्त्य शब्दांचीं ए० व० ओकारान्त होतात." हा नियम मात्र थोडा सैल करावासा वाटतो. प्राकृतांतील 'ओ' प्रत्ययच पुढें 'उ' झाला हें खरें. परंतु अपभ्रंशांतहि क्वचित् कोठें 'ओ' कारान्त प्रथमा दिसते. उदा०

"जलुल्लोलभंगा : सिरे णत्थि गंगा ।

गले णत्थि **सप्पो** : मणे णत्थि **दप्पो** ।" णायकुमार० २-३-१०

येथें सप्पो, दप्पो (सर्पः, दर्पः) आणि 'भविसयत्तकहा' मधील 'घोसो'

---

१ हेमचंद्र : प्राकृत व्याकरणम्, ८-३-२

२ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान, ८

'वणिंदो' हीं रूपें ए० व० चीं होत. म्हणजे बहुशः उ आणि क्वचित् ओ अपभ्रंशांत होता. एकाच प्रत्ययाचीं नवींजुनीं अशी दोन रूपें अपभ्रंशाप्रमाणें यादव-मराठींतहि आहेत. विशेषतः, 'उगउ' (उगमः), 'जीउ' (जीवः), 'संभहु' (संभवः), 'गावुं' (ग्रामः) हीं यान्त्य, वान्त्य व हान्त्य याचीं उकारान्त रूपें महानुभावात नित्य आढळतात. मार्कड-शिलालेखांत 'उपांगराउ' व इ० स० १३०० तील गोमातकी ताम्रपटात 'देऊ' (देवः) अशीं रूपें आहेत. नागांव-शिलालेखातील 'सिहिप्रो' या रूपांत कोठें य्, व्, ह् नाहीं. तात्पर्य, राजवाडे-नियम किंचित् विकल्पाने मानावा. अपभ्रंशद्वारा आलेला 'उ' व मूळचा प्राकृत 'ओ' असे दोन प्रत्यय यादव-मराठी वापरी. पुढें यातील 'उ' तेवढा राहिला, आणि शेवटीं तोहि गेला. प्रत्ययी विविधतेचा हा एक पुरावा आहे.

याशिवाय "आचार्यो (ऋ० ६६), स्पर्शो (ऋ० १४९)" अशी अशुद्ध रूपें विरल आहेत. परंतु तीं उपेक्ष्य होत.

**अनेकवचन**—"जन, जीव, गाव, अभिप्राय-ये, ठाय-ये" यातील 'ये'-कारान्त नामे वस्तुतः अकारान्तच आहेत. म्हणजे अकारान्त पुल्लिंगी नामाच्या अ० व० चा असा भिन्न प्रत्यय नव्हता. क्वचित् ए० व० चा 'उ' कार लागे, परंतु अविकृत रूपेंच अधिक. या प्रयत्यलोपाची परंपरा अशी—

सं० अस् > प्रा० आ > अपभ्रंश अ > म० प्रत्ययलोप
सं० पुत्राः > प्रा० पुत्ता > अप० पुत्त > म० पूत

'भविसयत्तकहा' या अपभ्रंशकाव्यांतील कलस, जणविद, नरिंद, पहिय हीं रूपें अकारान्तच आहेत. भाषेचा एकविधतेकडील हा कल होय. तरीहि यादव-मराठींत क्वचित् कोठें विकृत रूपें आढळतात. ही अर्थात् प्राकृतातील रूपांचे शेष होत. यांतील कांहीं पुढें देतों—

गजराउं (उद्ध० ६०६), निःकलंका (ऋ० १५), अनाथे आम्ही (ऋ० १६४), ब्रह्मवीदां (ऋ० ५७८), 'एकि मूर्ति त्रय भागा' (स्मृ० २५३) हे सर्व प्राकृतांतील प्रत्ययाचे शेष होत. विशेषतः,

"वेलापूर तेथल ध (र्म) स्थल वाटेस्वराचे गुण **मठअ** केले" या वेळापूर-शिलालेखातील 'मठअ' हें रूप पहा.

सं० मठाः > प्रा० मठा–मठइ > मठअ > मठ

अशी 'मठअ' ही मधली पायरी दिसते. तात्पर्य अ० व० चें रूप पुल्लिंगी ए० व० प्रमाणें झालें होतें. तरी अधून-मधून जुने अवशेष आढळतात. मालवण येथील श० १५८५ च्या लेखांत 'बैसके, पुरुसे' अशीं एकारान्त अनेकवचनें आढळतात.[1]

**द्वितीयाः**—प्राकृतात द्वितीयेचीं रूपें प्रथमेहून भिन्न होत. परंतु विकल्पानें[2] प्र० अ० व० रूप द्वि० अ० व० च्या ठायी वापरलें जाई. म्हणजे एकविभतेला आरंभ झाल्याचें सूक्ष्म चिन्ह प्राकृतात आहे. मराठीनें अर्थात् द्वितीया प्रथमेप्रमाणेंच बनविली व ही लकब अपभ्रंशद्वारा आली. ए० व० 'ठाओ, प्रभाओ, पाहोनरु' आणि अ० व० 'टाळु', 'कर्माभिमानु' अशीं रूपें आहेत. परंतु यादव-मराठीत क्वचित् प्रथमेपासून भिन्न अशी सप्रत्ययी द्वितीया आढळते. उदा०

"ना तरि राणीव सांडावी : कापडें भगवावीं ।
वारानशी सेवावी : **तापसां** होओनि "॥ शिशु० ४७५

याखेरीज 'श्रीकृष्णां' (वच्छ० ९८) सारखी अनेक रूपें आहेत. याशिवाय श्री० नेने[3] अशा द्वितीयेची इतर उदाहरणें देतात. परंतु तीं चतुर्थीचीं होत. मात्र सप्रत्ययी द्वितीया मराठीनें प्राकृतापासून घेतली, अपभ्रंशापासून नव्हे.

**तृतीया**—एकवचन—

१ मेघें, ईश्वरें, नायकें (पंढरपूर शिला०), गाढवें (परळ शिला०), चावुंडरायें (श्रवणबेळगोळ), उच्छाएं

२ पढियंतेन, सेतुगुडेन (पंढरपूर शिला०), सुनेन, देवें पुरुषेण (नेवासें शिलालेख)

३ मोळिकारां, अंधकारां, रामदेवा, वातां

---

१ राजवाडे : ज्ञानेश्वरींचें व्याकरण, पान २९

२ हेमचंद्र : प्राकृत–व्याकरणम्, ८–३–४

३ ह० ना० नेने : ज्ञानेश्वरदर्शन (साहित्यखंड), पान ३७

पहिल्या दोन प्रकाराची व्युत्पत्ति स्पष्ट आहे.

सं० एन > प्रा० एण > अप० एण-एणं > म० एं-एन. अपभ्रंशांत नासिक्यवर्णयुक्त [ एन ] व सानुनासिक [ एं ] अशीं दोन्ही रूपें होत. उदा०

'जणेण' < सं० जनेन [ णायकुमार० ]

'सखेवें' < सं० संक्षेपेण [ सावयधम्म० १ ]

म्हणजे सं० एनपासून एं व एन अशी दोन रूपें अपभ्रंशाप्रमाणें यादव-मराठी वापरी. प्रो० ब्लोक, प्रो० टर्नर[१] आदि सर्वांचें हेंच मत आहे. डॉ० ग्रीयर्सन[२] मात्र हा प्रत्यय अपभ्रंशातील 'अहि' या सप्तमीच्या ए० व० पासून व्युत्पादितात. परंतु त्यानें तृतीयेच्या अनुस्वाराची उपपत्ति लागत नाही. शिवाय निष्कारण दूरान्वय होतो तो वेगळाच.

२. तृतीयेच्या 'आ'कारान्त ए० व० चा उल्लेख राजवाडे करीत नाहीत. 'वेगा', 'कृतकार्या' इत्यादि तृतीयेच्या अ० व० पुरते मूळ शब्द त्यांच्या मतें आकारान्त होते[३]. परंतु राजवाड्याचें हें विधान भ्रांत आहे. मूळ अकारान्त नामाची 'आ'कारान्त तृ० ए० व० पुढें देतों.

"**मोळिकारां** धाडोळिता रानें : जेवि मोळिए जोडलें बावनें।"–ऋ० ४५

"जेणे **कृतकार्यां** होइजे"–ज्ञा० १–२५ [ सं० येन कृतकार्येण भूयेत ]

"तिहीं **मनुष्यां** होइजे। मृत्युलोकी"—ज्ञा० १४–२७०

"सर्व प्रकारी धावा। करी पा **वेगां**"—ज्ञा० १७–१७३८

"**रामदेवां** देहावसान माडिलें"—स्मृ० ६१

"तो **वातां** काबळा सीरकला"—लीळा० ३, पान ४४

हींच 'आँ' कारान्त रूपें अनेकवचनांत आहेत. पहा—

"**नवरसां** भरवी सागर"— ज्ञा० १२।११

"जैसें स्वप्निचेनि अमृते: **अमरां** न्हविजे।"–ज्ञा० ९–१४३

"तूंते **बोलां** पाहे हृषीकेशी"—शि० ८६

---

१ R. L. Turner : Phonetic Weakness of Terminational Elements in I. A. ( J. R. A. S. 1927, pp. 227–239 )

२ Linguistic Survey of India, Vol. VII

३ राजवाडे–ज्ञानेश्वरीचें व्याकरण. पा० ३३.

"निवृतां सांघातें प्रवृत्ती जेउ भवे"—स्मृ० ५८

"सावीवां करितां बीजें : तरि दोंशाचि आनंदें फुले।"—ऋ० २०६

पोरवाडी ताम्रपट क्र० २ मध्यें 'आदर्षा' असें तृ० अ० व० आहे. श्री० मोडक यांच्या मतें हीं आकारान्त रूपें सामान्य विभक्त्यन्त नसून, केवळ क्रियाविशेषणें आहेत. हें मत चिन्त्य आहे.

"स्वभावें वाटा येतां। जरि परपडा जाला अवचितां।"—ज्ञा० ६।१६८

यांतील 'अवचितां' याशीं सामान्य दिसतें म्हणून वरील रूपें क्रियाविशेषणाचीं आहेत असें नव्हे. उलट, सं० एन > एं या प्रत्ययावरूनहि 'एं > आँ' अशी प्रक्रिया संभाव्य नाहीं. अर्थात् 'आँ'कारान्त तृतीया परंपरागत नसून यादव-मराठीनें ती एकविभक्तीच्या न्यायानें बनविली. 'अ'कारान्त पुल्लिंगी नामाची चतुर्थी, पंचमी व षष्ठी या आकारान्त होतात. तसेंच 'आ'कारान्त पुल्लिंगी नामाची तृतीया, विकल्पानें 'आं'कारान्त होई. (करें, श्रोतां, डोळां). तेव्हां, परंपरा सोडून, स्वतंत्र असे आकारान्त तृतीयेचें रूप यादव-मराठीनें साम्यभावानें बनविलें. याविषयीं अधिक चर्चा सामान्यरूप-प्रकरणांत पुढें आली आहे. [पहा क्र० २४]

**अनेकवचन—**

१ परिमळीं, वेदीं, मोपाळी, पंडितीं

प्रत्यय—सं० एभि : > प्रा० एहिं > म० हिं–इं

अपभ्रंशांत गुणिहिं, पुण्णहिं, वयणहिं (भविसत्तकहा) अशीं रूपें आहेत.

२ 'आं' कारान्त अनेकवचनें ए० व० सारखींच होतात व त्यांची चर्चा एकवचनाच्या शेवटी केली आहे[१].

**चतुर्थी।**—चतुर्थी विभक्ति प्राकृतांत लोपली. परंतु पिशेल 'पुत्ताअ', 'देवत्ताए' यांसारखीं कांहीं प्राकृतांतील चतुर्थीचीं रूपें देतो. अपभ्रंश-काव्यांतून चतुर्थी दिसते. उदा०

१ भा० इ० सं० मं० अहवाल, शके १८३६

२ 'राजवाडे-ज्ञानेश्वरीचें पुरातत्त्व'—भा० इ० सं० मं० त्रै०, व्हॉ० १५.१

३ हेमचंद्र ८–४–३३५ (मोडक-नेन याद, व्हॉ० १५।१९)

"पणिवि पडिहहो" (णायकुमारचरिउ १-८-१२)
"रायहो रक्खिय" (णायकुमारचरिउ ३-८-१६)
"मुत्तिय" (मौक्तिकाय) — भावनासंधिप्रकरण
"सायरगयहिं समिलहिं"— सावयधम्म० २

अपभ्रंशात ए० व० "हो, हु, आसु" आणि अ० व० 'हिं, हुं' असे चतुर्थीचे प्रत्यय दिसतात. मराठीनें चतुर्थीचें रूप अपभ्रंशांतूनच घेतलें.

एकवचन—ब्राह्मणा (धवळे-पू० १६), श्रीकृष्णराया, अघासुरा, सागरा, ठाया, "स्वर्गा-नरका जाये" (वेळापूर शिलालेख)

अनेकवचन—ए० व० प्रमाणेंच होऊन सानुनासिक असतें. या रूपांची प्रत्ययपरंपरा अशी—

सं० आय > प्रा० आअ, आए > अप० हो, हु > म० आ
सं० पुत्राय > प्रा० पुत्ताअ > अप० पुत्ताहो-हु > म० पूता

पंचमी:—पंचमीचीं आर्ष विभक्तिरूपें फार विरळ आहेत. 'हून'-साधित रूपेंच वापरण्याची प्रथा दिसते. तरीहि प्रत्ययसाधित रूप अधून-मधून आढळतें. उदा०

एकवचन—संसारा (बच्छ० ३९), नगरासु (गोम्मातकी ताम्रपट), देशा (ज्ञा० ८७९)

सं० संसारात् > प्रा० संसाराउ > म० संसारा
सं० नगरात् > प्रा० सो > म० सु

अशी ही आर्ष रूपांची परंपरा आहे. परंतु असें रूप एकादे. नित्याची रूपें—
"स्वर्गौनि, ठाओनि, मेघौनि, मूळाहूनि, मठाहौनि"

प्रत्ययपरंपरा अशी—

म० "ऊन, हून, औनि, हौनि, ऊनि, हूनि" < हु, हुं, हो, आउ (अपभ्रंश) < सो, हिंतो, सुंतो, हिं (प्राकृत). अपभ्रंशात 'दोषहिं रहिउ' (सावयधम्म० ५), 'गिरिरायहो', 'सग्गहो' (णायकुमार०) अशीं पंचमीचीं रूपें होतात. त्यांपासून मराठी आलीं. सिंधींतहि आँ (सं० आत्) प्रत्ययानें पंचमी साधली जाते. असें असतां, युरोपीय भाषा-

शास्त्रज्ञांनीं या विभक्तीचे वाभाडे काढले आहेत. बीम्स[1] या प्रत्ययाची व्युत्पत्ति 'होऊन' या भूतकृदंतापासून लावतो व ही अर्ध-प्रत्ययी विभक्ति ठरवितो. प्रो० ब्लोक[2] 'होऊन' या कृदंतजन्य उभयान्वयी निपाताकडे बोट दाखवितात. प्रा० कुलकर्णी याच मताचे आहेत. परंतु प्राकृत 'हिंतो, सुंतो'पासून उपपत्ति नीट लागत असतां मुद्दाम आडवळणांत शिरण्याचें कारण नाहीं.

**षष्ठीः**–एकवचन–" नंदा (नंदन), गणनाथा (गोमातकी ताम्र० ), पोगुवाअ ( नागांव शिला० ), बोला, भीष्मा, हातातळीं, पापा भेणें "

अपभ्रंशांत " रायस्स, णायस्स, जयंधरासु, णरणाहहो " अशीं रूपें आढळतात ( णायकुमार० )–षष्ठीचे प्रत्यय अपभ्रंशात " स्स, सु, आसु, हो, हु " असे एकवचनीं होते. त्यांवरूनच प्राचीन मराठीतील षष्ठी निघाली. तिची प्रत्ययपरंपरा अशी—

सं० स्य > प्रा० स्स > अप० स्स, हु, हो > म० आ

सं० पुत्रस्य > प्रा० पुत्तस्स > अप० पुत्रस्स, पुत्तहु > म० पूता

अनेकवचन—रूपें ए० व० प्रमाणेंच होतात. मात्र ती सानुनासिक असतात. प्रत्ययपरंपरा—

सं० आम् > प्रा० आण–णं > अप० हं > म० आ

सं० पुत्राणाम् > प्रा० पुत्ताणं > अप० पुत्ताहं > म० पूता

( देवे[4]– असें एक षष्ठीचें रूप आढळतें. परंतु तें अपवादात्मक होय. )

**सप्तमीः**—एकवचन—१ पायीं, लोकीं, गर्भें, पाशें, मार्गीं, ठायीं.
२ प्रसादां, रांजनां, निंबा, द्रोणां, दिहा, उसंगां, कुहा, अघासुरां, सागरां

---

१ " This can be called quasi-synthetical form, synthetical by origin, but not so in the manner of its employment, "—Comparative Grammar : pp, 233,

२ J. Bloch: " Formation de la langue Marathe, "

३ मराठी भाषा, उद्गम–विकास, पा० ३३६

४ " वेळोवेळां देवेचरणा लागती तिया बाळा । " ( धवळे पू० ५७ )

अनेकवचन—१ विषै ( यीं ), आचारीं, गांवीं
२ दीसां, विचारां, नगरां, (पीरवाडी शिलालेख ), वारां–मासां

एकवचन आणि अनेकवचन यांची रूपें सारखींच आहेत. त्यात दोन प्रकार मात्र स्वच्छ दिसतात. एक ' ई ' कारान्त व दुसरीं ' आ ' कारान्तें. पैकीं ' ई ' व ' एं ' कारान्त हीं एकच होत. त्याची परंपरा—

एकवचन--सं० स्मिन् > प्रा० म्मि, म्हि > अप० हिं, इं > म० ई–ए

अनेकवचन—सं० सु > प्रा० सु, सुं > अप० हिं, इं > म० ई

ईकारान्त रूपाची व्युत्पत्ति लागते, व तत्पोषक प्राचीन रूपेहि अपभ्रंशांत मिळतात. जसें,

" अट्ठमइ, गयउरि, वयणिं, पकई, अच्छेतएं " ( भविसत्तकहा )

" सग्गि, णरि, णरकोट्ठइं, तरंगहि, दियंतहि " (णायकुमार० ) अशीं सप्तमीचीं रूपें आहेत. परंतु यादव-मराठींतील ' आ ' कारान्त रूपाची[१] उपपत्ति यांपासून लागूं शकत नाहीं. प्रा० कुळकर्णी[२] हा ' आं ' सं० ' अंतर् ' या अव्ययापासून व्युत्पादितात. म्हणजे, त्यांच्या मतें ' आं ' कारान्त रूपें हीं शुद्ध-प्रत्ययी नाहींत. ही उपपत्ति तितकी शास्त्रशुद्ध वाटत नाहीं. शब्दयोगी अव्ययाचें वर्णप्रक्रियेने प्रत्ययांत रूपांतर होऊं शकेल व त्यानुसार आ < त < आंत < अंतर ही प्रक्रिया नियमाला धरून आहे. परंतु ' आंत ' हें शब्दयोगी तत्कालीं रूढ असतां पुन्हा तज्जन्य आं प्रत्यय वापरात असणें संभवनीय नाहीं. अर्थात् ' आंत ' हें शब्दयोगी व ' आं ' प्रत्यय हीं एकाच काळीं रूढ नसावींत. तर मग 'आं' प्रत्ययाची उपपत्ति कोणती ? याचें उत्तर असें, की हीं रूपें 'आकारान्त' पुल्लिंगी नामाच्या सप्तमी-

---

१ ' आं ' कारान्त रूपांचा उल्लेख राजवाडे करीत नाहींत. परंतु यादव-मराठींत तीं बिपुल आढळतात. उदा० "समसतां नगरां गांवीं " ( पीरवाडी ताम्रपट )

२ कृ० पां० कुळकर्णी, " मराठी भाषा, उद्गम–विकास ", पान ३३८

वरून साधलीं गेलीं. आकारान्त नामांचीं सप्तम्यन्त रूपें 'मामां, गळां' अशीं 'आँ' कारान्त होतात. त्यावरून 'अ' कारान्त नामाचीं वरील रूपें साधलीं. किंवा असेंहि असूं शकेल, कीं एकविभक्तीच्या नादानें चतुर्थी, पंचमी व षष्ठी यांच्याप्रमाणेंच सप्तमीचेंहि एक रूप आँकारान्त बनलें गेलें. यासंबंधीं अधिक चर्चा सामान्यरूपावरील प्रकरणांत आली आहे.

संबोधनः—

एकवचन—कृष्णा, अर्जुना, पंडितो, पाठको, बापेया, इंद्रेया, कृष्णेया, विठ्ठले

अनेकवचन—बापेया, चांगदेवो, राउळो, देवहो, अहो

महाराष्ट्री-अपभ्रंशांतील पूत, पूता (ए० व०) व पुत्तहों (अ० व०) या रूपांवरून मराठीचें संबोधन सिद्ध होतें. मात्र, "इंद्रेया, पाठको" हीं नियमाला सोडून होणारी रूपें महानुभावी ग्रंथांत आहेत. अर्थात्, राजवाडे त्यांचा उल्लेख करीत नाहींत.

## § ६ आकारान्त पुल्लिंगी

यादव-मराठींतील आकारान्त पुल्लिंगी नामें तीन तऱ्हांनीं सिद्ध होतातः—१ सं० अक – प्रा० अअ- म० आ (गळा, घोसा, घोडा)

२ सं० ऋ – प्रा० उ, अर[2]- म० आ (पिता, कर्ता)

३ सं० अन् – प्रा० अ, आण[2]–म० आ (राजा, आत्मा)

यांचीं रूपें पुढें देतों—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | गळा, डोळा, थडिवा, तांबीया<br>बतैठा, ब्रह्मा, पाऱ्हु, पाऱ्हाओ | डोळे, कपडे, घोडे, गोवळे |
| द्वि० | ,, ,, ,, | ,, ,, ,, |

---

१ 'पूतांनो' सारखीं नासिक्यवर्णयुक्त संबोधनें यादव-मराठींत नाहींत. तीं नंतर आलीं. फादर स्टीफन्स तीं देतो. पहा—त्याचें 'व्याकरण'—५८ ते ६१

२ हेमचंद्र ८–३–३९, ४०

तृ० ब्रह्मदेवराजां ( वेळापूर शि० ) ब्रह्मां, मासां, डोळां, खीळां, जाणता, महात्मां, मुकेनि, मुकिएण, नाथोबायें — डोळेनि, कोल्हकोल्हाम, बाबायें, बापकां

च० भलेतेया, व्यवहारेया, अनामआ

पं० ठाउनि — जाणतेयांपूनि

ष० राजया, घोडेया, खांडेआ, आत्मेया — पाजेआ, आत्मेआं

स० गळां, दारवंठा, माथां, देव्हारा, पाडिवा, माथेआ, पवाडेआ, वेढेआ — डोळेआं, डोळां, गळां

सं० कान्हा, कान्हो — महात्मेहो, रायेहो

प्रथमेची ' पान्हु, पान्हाओ ' अशीं रूपे अकारान्ताच्या साम्याभासानें होतात. तृतीयेची रूपे ' आ ', ' एन–ण ' व ' यें ' या विविध प्रत्ययांनीं सिद्ध होतात. आकारान्त नामांचीं पंचमीचीं रूपे विरल आढळतात.

आकारान्त नामाच्या विभक्तिरूपांची उपपत्ति संस्कृत ' एतत् ' या सार्वनामिक रूपांपासून राजवाडे लावतात ती युक्तच आहे. सार्वनामिक बीजापासून प्रत्यय साधणे हा प्रत्येक भाषेचा स्वभाव आहे.

## § ७ इ–ईकारान्त पुल्लिंगी

हीं दोन तऱ्हांनीं सिद्ध होतातः—

१ सं० इ – म० ' इ ' कारान्त ( हरि, यति, ऋषि )

२ सं० इन्– म० ' ई ' कारान्त ( विवेकी, ज्ञानी, संन्यासी )

यांचीं रूपें—

| एकवचन | अनेकवचन |
|---|---|
| प्र० ज्ञानिया, संतोषिया, पक्षिया, व्यभिचार्या, कामिया, बोटिया, | द्री, संन्यासिये, पक्षिये, परमार्थिए, विराहे, मुनी, |

---

१ ज्ञानेश्वरांचें व्याकरण, पान ३१

| | | |
|---|---|---|
| | (गोमांतकी ताम्र०), अधिकारिया मळिया ( नागांव शिला० ), प्राणीया | कवी, पापीए, गौळी |
| द्वि० | ... ... ... | ... ... |
| तृ० | यतीं, योगियें, पारधिया, धातुर्वादियें, वनमालीए, रुक्मियें, गोसाविया, गोसावीं | पक्षी |
| च० | ऋषी, रोगिया, संन्यासीया, क्षीराब्धा, केशिया | परिवारिआ, कवी, कूर्मी, गौळिआ, योगिआ, वैरिआ |
| पं० | आगीहूनि | दरिद्रियाहूनि |
| ष० | पक्षिया, गुणिआ, गौळिया, सागातीया, वन्ही, रोगिआ | वऱ्हाडिया, विवेकिया |
| स० | दीं, पाणीं (= हातांत) | दरिद्रिया |
| सं० | स्वामिया, जोगिया, आनंदमूर्ते, जगजेठी | पापीये, उपवासीये |

पैकीं 'इ'कारान्त तत्सम नामें संस्कृतातील प्रत्यय लागून चालवीत असा प्रकार दिसतो. परंतु, नियम मात्र नाहीं. दोही रूपें सारखी करण्याकडे कल होता.

## § ८ उ-ऊकारान्त पुल्लिंगी

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | एदु, वायो, वसो, कडुवा | बंधू, विंचू, पशुं |
| द्वि० | ,, ,, ,, ,, | ,, ,, ,, |
| तृ० | मनु, भिक्षु, विंचुवें, हेतु, वाटाउवें, वाल्वें | विंचुवां |
| च० | वारुवा | वेळुवा, पशुवां, वारुवां, तरुं |
| पं० | ... ... ... | ... ... ... ... |
| ष० | विंचुवा, पशुवा | विंचुवां, पशुवां |
| स० | रिवु | आणुआणीं |
| सं० | एदु, भानु, बंधो | ... |

'ई' कारान्त नामाप्रमाणें 'ऊ' कारान्ताचीं रूपेंहि सार्वनामिक प्रत्ययानीं सिद्ध होतात.

## § ९ ऐकारान्त पुल्लिंगी

सस्कृतातील 'इ' कारान्त नामातील व्यंजनलोपानें यादव-मराठींतील 'ऐ' कारान्त नामे सिद्ध होतात. उदा०

संο दलपतिः > प्रा० दलवइ > म० दळवै

यांचीं पुढील रूपें आढळतात—

प्र० सेणवै (नागांव शिलालेख), दलवै

तृ० दलवैएं, दलवी

च० दलवैया

## १० ओकारान्त पुल्लिंगी

राजवाडे यांचा उल्लेख करीत नाहींत. कदाचित् त्याना ते अकारान्त नामांचींच रूपें समजत असावेत. तीं महानुभावी ग्रंथांत खालीलप्रमाणें आहेत.

वरो (उद्ध० ७२५), ब्रह्माओ (ध० पू० २६), गोल्हो (स्मृ० ३३), दादो (स्मृ० १८२), डो (स्मृ० २००), पो (लीला० ३-३०) शिवाय 'डोचें' 'वरोची' अशी चान्त रूपेंहि आहेत.

## § ११ औकारान्त पुल्लिंगी

सं० मंडपः > प्रा० मंडवउ > अप० मंडउ > म० मांडौ

प्र० मांडौ, वोडौ, बिडगौ, अनुभौ

## § १२ अकारान्त नपुंसकलिंगी

**नपुंसकलिंगी नामें:**—यादव-मराठींत नपुंसकलिंगी नामांच्या अंतीं पुढील स्वर आढळतात—अ, इ, ई, उं, एं

अकारान्त नपुं० नामें हीं सर्व संस्कृतांतील अकारान्त नामांपासूनच सिद्ध होतात. उदा० "घर, दळ, दुध, पोर"

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | न्हाण, प्रणये, आश्चर्यें, कार्यें, केळ, अंतराळु, अंबरुं, मनु | वेळें, तमें, दुधेंतेलें, नारिएळें, सोनेकेळें, दैन्यु |
| द्वि० | तुपा, तेला, कुटुंबें, अमृतूं (शिवाय प्र० प्रमाणें) | सकळां (शिवाय प्र० प्रमाणें) |
| सं० | परब्रह्मा | बायें हो, पोरें हो |

इतर सर्व विभक्त्यांचीं रूपें पुल्लिंगी अकारान्ताप्रमाणें होतात. वरील रूपांपैकीं कांहीं उल्लेखनीय आहेत:—

(१) प्रत्ययपरंपरा अशी—

प्र० ए० व० : सं० म् > प्रा० ँ > म० अविकृत

प्र० अ० व० : सं० आनि > प्रा० आणि, आइँ > अप० अइं > म० एं

(२) प्रथमेद्वितीयेखेरीज इतर विभक्त्यांचीं रूपें पुल्लिंगी अकारान्त नामांसारखी करण्याचा गुण यादव-मराठीनें संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश अशा परंपरेनें उचलला आहे.

(३) अपभ्रंशांत प्रथमा, द्वितीया यांच्या अनेकवचनांचींच रूपें तेवढी अकारान्त पुल्लिंगी नामांहून भिन्न आहेत. अपभ्रंशांत "तणाइं, गोट्ठणाइं, धणइं" हीं अनेकवचनी रूपेंच मात्र पुल्लिंगाहून भिन्न आहेत. एकवचन अपभ्रंशांत पुल्लिंगी नामाप्रमाणें 'उ'कारान्त आढळतें. यादव-मराठीनें एकवचन व अनेकवचन यांत हा भेद केलेला नाहीं. तींत दोन्ही वचनाचीं रूपें पुल्लिंगाहून भिन्न आहेत. या एका बाबतींत यादव-मराठीनें अपभ्रंशाला सोडून संस्कृत-प्राकृत महाराष्ट्रीला धरलें आहे.

(४) प्रणये, आश्चर्यें, प्रमेए, अशीं प्रथमेचीं एकारान्त वा येकारान्त रूपें आढळतात तीं वस्तुतः अकारान्तच होत. अन्त्य 'य'मुळें तीं एकारान्त भासतात.

(५) अंतराळु, मनु, अंबरुं, या प्रथमेच्या रूपांत 'उ'कार पुल्लिंगाच्या साम्यामुळें लागला आहे.

(६) सप्तमी द्वितीया ओळखता येईल अशी कांहीं अकारान्त नपुंसकलिंगाचीं रूपें:—

"मां वाढिमचि गुळ जेविताचि तवि प्रीतीचें प्रमाण राखतें।"

—स्मृ० ४५

"मग वाईचीं तेला आणिकें।" —लीळा० ३, पा० ३५

"मग कुडुवें घेउनि गांवाचि गेले।" —स्मृ० ९८

(७) 'शिशा' (सं० शीर्षम्) सारखें आकारान्त प्रथमेचें रूप क्वचित् आढळतें. परंतु एकटें दुकटें असल्यानें तें उपेक्ष्य होय.

(८) तृतीयेचीं पुल्लिंगाप्रमाणें "विश्वां, बीजां, शास्त्रां, दुषां, बळा, द्वारां" अशीं आकारान्त रूपेंहि आढळतात. त्यांची उपपत्ति पुल्लिंगी रूपांप्रमाणेंच होय.

(९) "गाउनि, तोंडूनि, ग्रामूनि, तोंडौनि, आणौनि, अंतराळौनि" हीं पंचमीचीं रूपें पुल्लिंगासारखींच आहेत. परंतु तीं अधिक प्रमाणांत येतात.

(१०) "हृदा, दळां, खेळनां, नीरा, वृंदावनां, तीर्थी" अशी सप्तमीची रूपेंहि पुल्लिंगाप्रमाणें आहेत.

(११) 'भेणे' (शिशु० ४०) सारखें तृतीयेचें रूप प्रत्ययाची द्विरुक्ति होऊन होतें.
सं० भयेन > प्रा० भयेण > अप० भएण > म० भेण+एँ
रूपांच्या एकविधतेकडे लक्ष लागल्यानें अशीं रूपें शास्त्राला सोडून होतात.

(१२) 'सौरम्यूं' (शि० ३७७) व 'भेणूं' (शि० १४३) हीं अनुक्रमें सप्तमीचीं व तृतीयेचीं रूपें एकविधतेच्या नादानेंच 'उ'कार घेतात. पुल्लिंगी प्रथमेचा एकवचनी उकार असा वाटेल तेथें लागूं शके.

## § १२ इ-ईकारान्त नपुंसकलिंगी

हीं नामें संस्कृतांतील अकारान्त नपुंसकलिंगी नामांवरूनच सिद्ध होतात. अर्थात् अकारान्त नपुंसक नामांची प्रक्रिया त्यांना लागू आहे. उदा०

सं० मौक्तिकम् > प्रा० मोत्तिअँ > म० मोती
सं० दधिकम् > प्रा० दहिअँ > म० दहीं
सं० नवनीतम् > प्रा० लवणीअँ> म० लोणी

यादव-मराठींत यांचीं खालील रूपें आढळतात.

मोतियें (प्र० अ० व० ) --ऋ० ५१५
पाणियें-एं ( तृ० ए० व० ) --स्मृ० २००
पाणिया ( तृ० ए० व० ) --ली० ३
बांदिएं (सप्त० ए० व० ) --वच्छ० ४६३

## § १४ उंकारान्त नपुंसकलिंगी

हीं नामें तीन रीतींनीं सिद्ध होतात—

१ संस्कृत अंत्य वर्णाचा लोप होऊन : कुंकु ( कुंकुम ), गाउ (ग्रामः)

२ 'रु' हा स्वार्थे प्रत्यय लागून : लेकरुं, पाखिरुं, बटिकुरुं

३ संस्कृत 'उ' कारान्त नामांपासून : आसु ( अश्रुः ), पशु (पशुः)

यांचीं रूपें खालीलप्रमाणें आढळतात.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | तारुं, गोरुं, हातिएरुं, पाखिरुं, हातिरुं, हातिरुवें, आसुं | आसुवें, पशुवें, गोरु, वटिकुरुये पाखिरुवें, गाउवें, गोवळरुवें |
| द्वि० | ... ... ... | ... ... ... |
| तृ० | पाखिरुवां, गोरुवां, लेंकरुवें, किडरुवें | लेंकरुवी |
| च० | लेंकरुवा | लेकरुवां, वासुरुवा |
| पं० | ... ... ... | ... ... ... |
| ष० | लेंकरुवा | पाखिरुवां, गाउआ |

क्वचित् एकवचनाचें रूप अनेकवचनीं वापरलें जाई.
जसें—" तवं तेथं **गोरूं** चरूं आलीं । "—स्मृ० ७४

---

१ लिंगबदल

क्वचित् अनेकवचनाचें एकवचनीं वापरलें जाई. म्हणजे दोन वचनांचीं रूपें सारखीं करण्याकडे कल होता.

## § १५ एंकारान्त नपुंसकलिंगी

हीं नामें मूळचीं अकारान्तच असें राजवाडे मानतात तें योग्य आहे. परंतु संस्कृत 'एतत्' व 'इदम्' या सर्वनामांपासून अपभ्रंशद्वारा निघालेलें एं हें सर्वनाम लागून हीं नपुंसक नामें झालीं आहेत हें राजवाड्यांचें मत मात्र सर्वांशीं सत्य नाहीं. 'म्हणियें', 'बोलनें' अशा कांहीं क्रियानामांची उपपत्ति 'ए' प्रत्ययानें लागू शकेल. पण "खतें, जातें, भांडें, सासुरें" इत्यादींची वाट काय ? तेव्हां आकारान्त पुल्लिंगी नामांच्या ठायीं जो 'अक' हा संस्कृत प्रत्यय मानला तोच येथें मानला पाहिजे. म्हणजे एकारान्त नपुंसक नामांची सिद्धि सार्वनामिक प्रत्ययानें न होतां, अंत्यवर्णप्रक्रियेमुळें होते. अकारान्त नामें तत्सम व एकारान्त तद्भव असा भेद राजवाडे करतात, तोहि अयुक्त होय. कारण "घर, न्हाण, दुध, गाव, पोर, केळ" अशीं अनेक अकारान्त नपुंसक नामें तद्भवच आहेत. अर्थात् तत्सम वा तद्भव या दृष्टीनें न पाहता 'अक' युक्त व 'अक'-विहीन सिद्ध या भूमिकेवरूनच पाहिलें पाहिजे. यांचीं रूपें—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | आळें, आंधारें, साकडें, पन्हे, लेणें, सासुरें, खतें, ठाउवें, झुंझणें | साकडीं, मुकियें, सुनीं, सोनेखैरीं |
| द्वि० | ,, ,, ,, ,, | ,, ,, ,, ,, |
| तृ० | आलेया, चांदिणेनि, मुराडिवें, बोलना | सांकडीं |
| च० | उसीसेया, म्हणिया | आळेयां |
| पं० | ... ... ... | ... |
| ष० | लेणया, पन्हया, आलेआ | पन्हयां |

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण. पान ४०–४१

स० [illegible], [illegible], धुमियें, [illegible]
मडकां, जातां

**स्त्रीलिंगी नामें**:—यादव-मराठींत स्त्रीलिंगी नामांच्या अंतीं पुढील स्वर आढळतात—

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ

## § १६ अकारान्त स्त्रीलिंगी

हीं नामें खालील रीतींनीं सिद्ध होतात.

१ सं० आ > प्रा० आ > अप० अ > म० अ
(सं० आशा > प्रा० आसा > अप० आस > म० आस
सं० निद्रा > प्रा० णिद्दा > अप० णिद्द > म० नीज)
२ सं० इ-ई > प्रा० ई > अप० ई > म० अ
(सं० रुक्मिणी > म० रखमीण
सं० रात्रि > म० रात – त्र)
३ सं० अ > प्रा० अ > अप० अ > म० अ
(सं० पेय > प्रा० पेज > म० पेज
सं० प्रभात > अप० पहात > म० पहाट)

पैकीं, संस्कृत आकारान्तापासून होणारीच अधिक. त्यामुळें प्रथमेचें एकवचन सोडून इतर रूपें आकारान्त स्त्री० नामाप्रमाणेंच होतात.

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | भाष, सांखळ, साळ, चुळु, बरव, आश, आणु, आलु, नारिएल | बाहलीं, माया, डांगा, नारिएळी |
| द्वि० | ,, ,, ,, ,, | ,, ,, ,, |
| तृ० | सांखळा, आंमडवा, ओला, काती, दाढे, हावा, [illegible]वा, चाडे, माया, पाहाटा, कणवे | सांखळाँ, मायाँ |
| च० | उत्तरे, खेवा, ओ[illegible], नवळीके, बाहले, पसीमा | |
| पं० | ... ... ... | ... ... |

| | | |
|---|---|---|
| ष० | जाणिवेचा, मांडे | |
| स० | कासळे, सेजे, पेजां, घेडे, पूर्वे, विहीरां पाहाळां, रात्रियें, होडां | वहाणां, रात्रें |
| संबो० | माए | |

## § १७ आकारान्त स्त्रीलिंगी

१ सं० आ > प्रा० आ > अप० आ > म० आ
( सं० बाला > म० बाळा, सं० रेषा > म० रेखा )
२ सं० ऋ > प्रा० आ > म० आ
( सं० मातृ > म० माता )

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | जटा, माला, देवता, नौकु, जमनु, नम्रतु, विद्युल्लतु | देवता, जटै, कल्पलतु |
| द्वि० | ... ... ... | ... ... ... |
| तृ० | सभा, कृपा, छाया, रेखां, माता, बाळां, लीले, गीते | पिपासीं, माला |
| च० | वीद्ये, लाह्या, वाचे, भिक्षे, जसोदा | बाळां, देवांगनां |
| पं० | ... ... ... | ... ... ... |
| ष० | कथे, देवते | सरितां, देवतां |
| स० | दीशें, द्वारकेंसी, मणिकर्णिकेंसि, अवस्छां, क्रीडां | कळां, दीशीं |
| संबो० | रंभे, रंभाई | |

## § १८ इ-ईकारान्त स्त्रीलिंगी

१ सं० इ > प्रा० इ > अप० इ-ई > म० इ-ई
( सं० बुद्धि > म० बुद्धि )
२ सं० ई > प्रा० ई > अप० ई > म० ई
( सं० पुरी, भीमकी > म० पुरी, भीमकी )
३ मराठी " ई-ईणि " हे स्त्रीलिंगी प्रत्यय लागून
( तेलीणि, हडपिणी, कुळी )

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | मुदी, कुसि, फुह्ली, दीवी, कासुवी, पाहाटी, राथीभाडी, बहिणि, गोडिआ, कांटी | मासीआ, बाळीया, सीवीया, बाइया, महात्मी, वोविया, घाया, हडपिनी, अंतौरिया, वेलिए, तीखणीया, भवै, हीरडिया, **कांटीआं**[1] |
| द्वि० | ,, ,, ,, | ,, ,, ,, |
| तृ० | मुंगीयें, देवकिया, दिठीं, आवडीं, पृथ्वीया, आबइया, माऊलीए, बाइं, डोइएं, बाइया | परीया, परी, मुंगा, बुद्धीया, उपासिनीं, ओविअें, मालतिआ। |
| च० | कुंतीये, दिठी, कीटकीये, भिये, मुखश्रीया, भीमकीय, देवी, पींडीए, वनाश्रिया, वैजयंतिया | दीवीया, विरहिणीं |
| पं० | ... ... ... | ... ... ... |
| ष० | स्त्रिये, घडिये, देवकीये, काटीये, खेडकुळीया | तुरया, आगुलिआ |
| स० | खळीयें, थडिवा, करिणीयें, मोळिएं, झोळिएसि, रातिवें, देउळीएं, उपंगळीएं, नदीं, डोणिं | दाडीया, थडिवा |
| संबो० | भीमकीये, सए, आवै, रूपै, गौराये, उभै, आइ, कृशोदरीए | महात्मेहो |

## § १९ उ-ऊकारान्त स्त्रीलिंगी

१ सं० उ > प्रा० ऊ > म० उ–ऊ

(सं० ऊरुः > प्रा० उरू > म० उरु – रू[1])

२ सं० उक > प्रा० उअ > म० ऊ

(सं० भालुक > प्रा० भालुअ > म० भालू)

---

१ "कांटीआं कांटी झाडावी।" – शिशु० ४९४

या नामाचीं खालील रूपें आढळतात –

प्र० अ० व० : उरु, जानु, भालुआ ( शि० ९०१ )

तृ० ए० व० : उजुया

## § २० ए–ऐकारान्त स्त्रीलिंगी

१ सं० इ > प्रा० अइ (व्यंजनलोपामुळें) > म० ए-ऐ (सं० स्मृति > प्रा० सइ > म० से; सं० संवृत्ति > प्रा० सव्वइ > म० सवे : सवै )

२ सं० इका > प्रा० इआ > म० ऐ (सं० जृंभिका > प्रा० जंभिआ — म० जाभै )

३ ‘ ई ’ या स्त्रीलिंगी प्रत्ययाने (कटकै, आवजै, फडै )

या नामाचीं पुढील रूपे आढळतात—

प्र० ए० व० : सेवै, से, सवे, बाहे, साधे, कटकै, कठीये, फडै, राउतै, एकवंकै, चावटै, जाभै

प्र० अ० व० : ठाणवैया, सेया, शाळैया

तृ० ए० व० : रूपैया, कटकैये

तृ० अ० व० : कटकैया, साधी

च० ए० व० : आवजैए

स० ए० व० : कडीएं

हीं रूपे ईकारान्ताप्रमाणेच होतात.

## § २१ स्त्रीलिंगी नामांचे विशेष

स्त्रीलिंगी नामाचीं वरील सर्व रूपें पाहून त्यात पुढील विशेष आढळतात.

(१) प्रथमेच्या एकवचनात क्वचित् आढळणारा ‘ उ ’ कार (आशु, नम्रतु, लतु ). हा मूळचा नसून पुल्लिंगाच्या साम्याभासानें येणारा आहे. ‘ उ ’काराचे यादव-मराठींतील प्राबल्य यावरून दिसेल.

(२) ‘ ई ’कारान्त नामाचे क्वचित् आढळणारें आकारान्त असें प्रथमेचें एकवचन. उदा०

"याची **मोडिया** साडौं न शके" – शिशु० १३५

हीं आकारान्त रूपें प्राकृत काळींहि होतीं. तात्पर्य, प्राकृतातील काही विकल्प यादव-मराठींत कायम आहेत.

(३) अकारान्त पुल्लिंगी नामांचीं कांहीं तृतीयेची आकारान्त रूपे मागें पाहिलीं. तशीच काही आकारान्त तृतीया ईकारान्त स्त्रीलिंगी नामाचीहि आढळते. (उदा० "बुद्धीआ, मुंगा, परीयां") पहा —

"मुंगीयाचें मढे तें **मुंगांचि** काढावे की गा।" –स्मृ० ५९

"ऐसेया **परीयां** पवित्र : करावे शरीरयंत्र।" –उद्ध० ४११

प्राकृतात 'ई'कारान्त स्त्रीलिंगाचा तृतीयेचा 'हिं–हि' असा अनेकवचनी प्रत्यय आहे. अर्थात् आकारान्त तृतीया प्राकृत-अपभ्रंशात नाहीं. यादव-मराठीनें हा 'आ' प्रत्यय नावीन्यानें लिंग व अत्य वर्ण याच्या उपाधिभेदातीत लावण्यास आरंभ केला.

(४) पुल्लिगी–नपुंसकलिगी नामात न दिसणारी सप्तमीच्या अनेकवचनी 'सु' प्रत्ययाची ओळख क्वचित् कोठे स्त्रीलिंगांत आढळते. पहा—

"तवं भणावे हरिहरि : **मणिकर्णिकेंसि**।" – शिशु० १३७

"तो यादवासी राज्य करी : **द्वारकेंसी**।" – शिशु० ३७

"हा हो तुम्ही **ओळिपसि** कैसे जेविलेति।" स्मृ० १५९

वरील जाड ठशाचीं रूपें सप्तमीचीं आहेत. या सप्तमीच्या 'सि' प्रत्ययाची परंपरा अशी —

ं० सु > प्रा० सु–सुं > अप० हिं० > म० इं–सि

ं० नदीषु > प्रा० नईसु > अप० नईहिं > म० नदिएसिं

अर्थात्, अपभ्रंशात लोपलेले 'स्' हे व्यंजन पुनः यादव-मराठीत प्रकट

---

१ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण, ८–३–२८

"स्त्रियां वर्तमानादीकारान्तात् सेर्जस्–शसोश्च स्थाने आकारो वा भवति।"

होऊन ' सि ' हा प्रत्यय क्वचित् दिसतो. येथें मराठीनें अपभ्रंशाला सोडून प्राकृताला धरलें आहे.

(५) इ-ईकारान्तांतील भेद दिसत नाही. तो अपभ्रंशकालींच लोपला होता.

## § २२ अनेकवचन

यादव-मराठींतील नामांचे एकवचनाचे व अनेकवचनाचे प्रत्यय संस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंशद्वारा सिद्ध होतात. मात्र अनुनासिक ही जी तिन्ही लिंगीं द्वितीयेपासून संबोधनापर्यंतच्या अनेकवचनाची नियत खूण तिचें विवेचन करणें आहे. पूतॉं (द्वि०), पूती (तृ०), पूतॉं (च०), पूतॉंऔनि (पंचमी), पूताँ (ष०), पूती (स०), पूताँहो (संबो०) या सात विभक्त्यांच्या अनेकवचनात अनुनासिक नियमानें आढळतो. या अनुनासिकाची उपपत्ति राजवाड्यानी पल्हवी व जुनें फारसी या भाषांतील अनेकवचनी ' आन् ' प्रत्ययापासून लावण्याचा प्रयत्न केला आहे, तो फोल होय[१]. बाकी, त्याच्याहि लिहिण्यात मेळ नाही. एकदां " हा अनुनासिक आगंतुक म्हणजे प्राकृतेतर आर्यभाषांतून आला असला पाहिजे " (पान २४) असे म्हणून नंतर " अनेकवचनाचा अनुनासिक फारसीचा संसर्ग होण्यापूर्वीचा आहे " (पा० ७४) असें विरुद्ध विधान ते करितात. राजवाड्यांच्या सिद्धातातील विसंगति चि० वि० वैद्यांनीं[२] उत्तम दाखविली आहे. एतावता, या अनुनासिकाची परंपरा अशी होय:—

सं० णाम् ( ष० अ० व० ) > ऑं
सं० आन् ( द्वि० अ० व० ) > ऑं
सं० आनि ( नपुं० प्र० अ० व० ) > आँ

प्रथमा, द्वितीया व षष्ठी याच्या रूपाचा पगडा बसल्यानें अनेकवचनी अनुनासिक उत्पन्न झालें. महाराष्ट्रीत व अपभ्रंशांतहि तृतीया, षष्ठी, सप्तमीं, या अनेकवचनी विभक्तिप्रत्ययांचे अंत्य स्वर सानुनासिक आहेत. जसें,

---

१ वि० का० राजवाडे—" ज्ञानेश्वरीचें व्याकरण " पान २४

२ चिं० वि० वैद्य—" निबंध आणि भाषणें ", पान १२९ (१९२७)

वच्छहिं, देवहिं ... तृ०
वच्छाणं, देवहं ... ष०
वच्छेसुं, देवहिं ... स०

वरील रूपांशीं एकविधता पावून यादव-मराठींत द्वितीयेपासून सर्व विभक्त्या अनेकवचनी अनुसासिक घेतात.

अनेकवचनाबाबत आणखी एक विचार आहे. अनेकवचन प्रत्ययानें दाखविण्याऐवजीं एकाद्या गणवाचक शब्दानें दाखविण्याची रीत प्रत्येक भाषेंत आढळते. उदा० ओरिया भाषेंत 'मान' या गणवाचक शब्दानें अनेकवचनाचें काम होतें. जसें—

"जाल—जालमान" (=जाळी)
"भार—भारमान" (=ओझी)

यादव-मराठीत अशीं कांहीं रूपें आढळतात. उदा०

"जयाचेया आंगउत्रा विटे शृंघारु **कामिनीजनाचा**।" उद्ध० ३९३
"तैं मुळ पाठविलें ऋषिशृंगासि। **वधुजनातें**।"–उद्ध० ४२०

येथें 'जन' शब्दानें अनेकवचन व्यक्त होतें. अपभ्रंशातहि 'घोडेअहोगणु' असें शब्दसाधित अनेकवचन आहे. परंतु एवढ्यावरून प्रत्ययी अनेकवचनाची उपपत्ति या गणवाचक-शब्दसाधित किंवा 'प्लेओनॉस्टिक' पद्धतीत शोधणें अयोग्य आहे. फार तर, दोन्ही रीती यादव-मराठीत रूढ होत्या, इतकेंच म्हणता येईल. होर्न्लें या दोहोंत संबंध जोडूं पहातो म्हणूनच राजवाडे त्याच्या भाष्याला 'गप्पाष्टक' म्हणतात. मात्र वर्तमान-मराठींतील 'पुरुषमाणसें', 'मूलमंडळी' इत्यादि प्रयोग पाहून होर्न्लेंच्या गप्पाष्टकातील सत्यांश दिसेल.

## § २३ अर्धप्रत्ययसाधित विभक्ति

**प्रत्ययात्मक शब्दयोगी**:—येथवर प्रत्ययी नामविभक्तिप्रक्रिया

---

१ "These socalled Nominative Plural forms are elliptic phrases which must be filled up by supplying some collective noun as लोक, गण–" The Pleonastic Construction; Hornle: Gaudian Grammar, pp. 213—214

पाहिली. शुद्ध प्रत्ययांनीं सिद्ध होणारीं नामरूपें यादव-मराठीत विस्कळित झाली व एका विभक्तिरूपाचा दुसऱ्याशीं घोंटाळा होऊं नये म्हणून शब्दयोगी जोडून नामरूपें साधण्याची प्रथा कशी निघाली याचें सविस्तर विवेचन मी प्रस्तावनेत या प्रकरणी केलें आहेच. येथे या दोन प्रकारातील मधल्या पायरीचें आलोचन करतो. प्रत्ययी नामविभक्ति विस्कळित झाली म्हणून हरघडी वापरात असणाऱ्या विभक्तींची रूपें ओळखणें कठिण होऊं लागलें. तेव्हा त्या त्या विभक्तीचे निदर्शक असे प्रत्यय यादव-मराठीनें मूळात स्वतंत्र अस्तित्व असणाऱ्या शब्दापासून बनविले. तृतीया, चतुर्थी व षष्ठी या तीन विभक्तींना हे प्रत्ययात्मक शब्द लागत. पंचमीचा वापर फार थोडा असल्याने तिच्या बाबत हा प्रश्न उद्भवला नाही. मात्र, हे प्रत्यय मूळ संस्कृतसिद्ध प्रत्ययापासून अलग मानले पाहिजेत. किंबहुना हे प्रत्यय नसून प्रत्ययात्मक शब्दयोगी आहेत हेंच अधिक खरें. शुद्ध प्रत्यय आणि शुद्ध शब्दयोगी याऱ्यांतील हा दुवा किंवा संधिकाल प्राकृत अपभ्रंशावरून कसा निष्पन्न होतो व त्याची अति सूक्ष्म बीजें प्राकृतात कशीं आढळतात हे मी प्रस्तावनेत लिहिलेच आहे. पुढें ही प्रत्ययात्मक शब्दयोगी देतो.

**तृतीया :— ' सिं-सीं '** ...

सं० सहितम् > प्रा० सहिइं > अप० सहिं > सी

राजवाडे 'सि' प्रत्यय सं० समम् पासून व्युत्पादून हा तृतीया-सप्तमी योग मानतात. असा योग मानण्याचे वास्तविक कारण नाहीं. 'समम्' पेक्षां 'सहितम्' हाच शब्द तृतीयेशी अधिक निगडित आहे व शिवाय तो स्वतंत्र-पणेंहि शब्दयोगी म्हणून मराठीने वापरलेला दिसतो. पहा—

"तैं नित्ययाग**सहितें** । सृजिली भूते समस्ते ।" —ज्ञा० ३।८६

असा स्वतंत्र वापर 'समम्'चा नाहीं. अर्थात् सहितम् हें शब्दयोगी व तज्जन्य 'सिं' प्रत्यय हीच जोडी युक्त होय. शिवाय तृतीया-सप्तमीच्या योगाचें येथें कारण पडत नाहीं. 'सिं' रूपात 'समम्'पेक्षां 'सहितम्' चाच अर्थ अधिक व्यक्त कसा होतो तें पहा—

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ९

" ऐसांही तोडीजे तरि **मूळांसि** वेलि हातासि ये।" ह० ३५

(=मूळासकट, सहित)

" एक वेळ कवीस्वरबास **सांगातियेंसि** अटना गेले होते।" ह० १०

( =सागात्यांसह )

" वैजोबा **गाडेनिसिं** निगाले।" –स्मृ० ८५

( =गाड्यासह )

" अर्जुनु असे पातु। तो दलभारु समस्तु। **संभ्रमेंसीं**॥"

–ज्ञा० १–१७६

तात्पर्य, व्युपत्ति आणि अर्थ दोन्ही दृष्टया 'सहितम्' हेंच बरोबर वाटतें. डॉ० भांडारेकरांचें मत मात्र राजवाड्यासारखेंच आहे.

**चतुर्थी**:—(१) **सिं, सीं, शीं**—

सं० आर्श्वे > प्रा० आस्सइ > अप० आस्सिं > म० सिं–सीं

बीम्स हा प्रत्यय षष्ठीच्या 'स्य' पासून व्युत्पादितो. त्याचें म्हणणें राजवाड्यानी योग्य तऱ्हेनें खोडले आहे. " शेषे षष्ठी " हें सूत्र मानून सुद्धां या चतुर्थीला षष्ठीचा अर्थ प्राप्त होऊ शकत नाही. डॉडरेटचें मत असेच आहे.[२]

**रूपें**—

"श्री विठल **देवरायासि**" (पंढरपूर शिलालेख)

"नातरि पवनु **मेघासि** विहे। की **अमृतासि** मरण आहे।"

—ज्ञा० २–१४

क्वचित् या प्रत्ययात्मक शब्दयोगीच्या पुढें शुद्ध शब्दयोगी जोडलें जातें. पहा:—

"जें **आर्तासि कारणें**: संसारश्रमाचे विसंवणे।"–ऋ० ४४

" जे **काळासि वरि** वज्रांगी: ते कृपादृष्टी गगनमार्गी।"

–ऋ० २१६

---

१ Wilson Philological Lectures. pp, 251

२ 'Si is, as if, the abraded form of a separate word implying propinquity'—W. Doderet (B. S. O. S. Vol. V)

(२) थें-तें

सं० अर्थे > प्रा० अथ्थे > म० थें-तें

पैकी ज्ञानेश्वरीत व महानुभावी ग्रंथांत केवळ तेन्त्य रूपेंच आहेत. "शाखातें, कृष्णाते, सदनाते" अशीं रूपें होतात. थेन्त्य रूपें खालील प्रमाणे आढळतात—

"नायकाथें, उखेथे, माथे, तुथे"—उषाहरण (चोंभा)

'तुथें'—(निवृत्तिदेवकृत गीतेची समओवी टीका)

"माथें, स्मार्ताथे, तितिराथे" (गद्य पंचतंत्राची जुनी प्रत) संपा० प्रा० पोतदार, पृ० २३-२७

थेन्त्य रूपे इ० स०१६००तील फादर स्टीफन्सच्या ख्रिस्त-पुराणांतहि येतात. अर्थात् थेन्त्य रूप असणे हा प्राचीनत्वाचा पुरावा नाही. एकाच प्रत्ययाची हीं दोन रूपे होत.

चतुर्थीचा 'ला' प्रत्यय यादव-मराठीत नाही व म्हणून त्याचा विचारहि कर्तव्य नाहीं. लागीं-लागोनि याची चर्चा पुढे शुद्ध-शब्दयोगीत केली आहे.

षष्ठीः—(१) चा-ची-चें

स० त्यत् > प्रा० च्च > म० च

राजवाडे म्हणतातः "वस्तुतः या 'च' ला षष्ठीचा अर्थ स्वार्थी नाहीं. षष्ठीच्या रूपाला जोडला जाऊन षष्ठीचें उसने सामर्थ्य त्याच्या ठायीं भासमान होते." प्राकृतातहि षष्ठीची चान्त रूपे सापडतात--

अह्मेच्चयं < सं० अस्माकम्

तुह्मेच्चयं < स० युष्माकम्

अर्थात् मराठी 'च' संस्कृत 'त्यत्' या तद्धित प्रत्ययापासून निघाल्यानें हे चान्त शब्द विशेषणात्मक आहेत. हा 'च' मूळशब्द, पंचमी, सप्तमी

---

१ भा० इ० सं० मं०, वार्षिक इतिवृत्त, श० १८३८

२ भा० इ० सं० मं०, त्रैमासिक, वर्ष ३

३ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान १४

४ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण ८-२-१४९

यांना जोडला जाऊन चान्त विशेषणें होतात व तीं विशेष्यनिघ्न असतात. तसेंच संस्कृतातील 'त्यत्' प्रमाणें 'च'लासुद्धा साती विभक्त्याचे प्रत्यय लागतात. जसें—

| | पुल्लिग-नपुं० | स्त्रीलिंग |
|---|---|---|
| प्रथमा–द्वितीया | चा–चे | ची |
| तृतीया | चेनि, चेन, चे | चिया |
| चतुर्थी | चेया, चाया | चिये |
| पञ्चमी | ,, ,, | चिया |
| षष्ठी | ,, ,, | चिया, चिये |
| सप्तमी | चा, चिये | चा, चिये |

उदा० "आत्मबोधाचिया आवडी"–तृ० (ज्ञा० ६–२८)
"इंद्रियांचेया घरा"–च० (ज्ञा० ६–६२)
"इंद्रियांचा राजबींदीं"–सप्तमी (ज्ञा० ७–१०३)
"तेया शुकाचेनि आगभारें"–ष० (ज्ञा० ६–७६)
"क्षोभु मनी नेणिजे, द्रोणाचिये"–सप्तमी (ज्ञा० २–३९)
"तयाचीये दिठीचा झनें कलंकु। लागे प्रेमा"–ष० (ज्ञा० ६–११५)
"विण विषयाचिया बोला : कैसेनि कोंभैला"–तृ० (उद्धव २६३)

प्राचीन गुजरातीत हा 'च' आहे. पहा—

**नरसैंयाचा** सवामिणु मुखडुं फरिफरि जसोद नयाळे रे।"
—नरसिंह : बाळलीला, ४

नरसी मेहत्याच्या काव्यात याचीं उदाहरणें विपुल आहेत. प्रो० ब्लोक या 'च' चा, म्हणजे पर्यायानें संस्कृत 'त्यत्' चा संबंध 'त्वा' या भूत-कृदन्ताच्या प्रत्ययाशीं जोडतात तो चिंत्य आहे.

१ Formation de la Langue Marathe, 205

(२) '**ज**' — चान्त विशेषणाप्रमाणें क्वचित् कोठे जान्त विशेषण आढळते. पहा—

"**श्रीरायाजा** प्रधानु" (नागाव शिलालेख)

"**कंसाजा** तूपभातु : जेओनि ठेला खाखातु।"-शिशु० ४३८

"आणि मनसर्पाची सृष्टि। डोळे **नाराजांची** सुटी।" ज्ञा० १६।२४१

"**ज्वराजेनि** आटोपें। रोगी भलतैसें जल्पे।"-ज्ञा० १६-३६४ (साखरे प्रत)

"काडरु फोडुनि **नाराजु**।" - उषा० १२०-६६

पैकी रायाजा, कसाजा, ज्वराजेनि ही रूपे स्वच्छ जान्त आहेत. संस्कृत नाराच् शब्दाचे चान्त होताना साम्याभासाने 'नाराजांची' असें रूप झालें आहे (च > ज) ते महत्त्वाचें आहे. तरी ही सर्व रूपें खरोखर जान्त मानावींत काय? च-जमधील अभेद मराठींत हरघडीं आढळतो. "मेचकें-मेजकें, कुचका-कुजका, बोचकें-बोजकें, खाचकुइली-खाजकुइली" अशी अनेक च व जयुक्त रूपे आहेत. परंतु मूळ शब्दात 'च-ज'चा अभेद मानला तरी प्रत्ययांत तो तसा होणार नाही. तेव्हां जान्त रूपें स्वतंत्र मानणेच युक्त.

सं० कार्य > प्रा० केर-कज्ज > अप० इज्ज > म० ज

अशी या 'ज'ची परंपरा असावी. ही जान्त रूपे अति क्वचित् आढळतात.

(३) '**स**'—

"दैत्यकाळ **युनासा** भेण"-उषाहरण १४२३

"तीये **अग्नीसी** माझारी" ,, १७३३

ही चान्त विशेषणाची सान्त रूपें आहेत.

(४) '**क**'—

"मी काइ येकाधा **चोळीका** महात्मा" —स्मृ० ९९

---

१ "Ja (जा) is not merely a variation of the voiced and unvoiced palatals"- W. Doderet : Archaic Marathi 'Ja' Genitive (B. S. O. S. Vol. V)

" परशास्त्रसंमत : मियां आइकिलें देवकें चरित्र ।"–ऋ० ११८

" ले देवकें लेणें : तरि विषयाचे गिरिदुर्ग जिणे ।"–उद्ध० १६१

सं० कृत > प्रा० करितो–करिओ–केरो > हिं० के–का

तात्पर्य, जो प्रत्यय हिंदींत के-का रूपानें व बंगालींत एर रूपानें आहे, तोच यादव-मराठीत क्वचित् 'क' रूपाने ओढळतो. अर्थात्, हा हिंदीद्वारा आला हें उघड आहे.

म्हणजे यादव-मराठींत षष्ठीची चान्त, जान्त, सान्त व कान्त अशीं ार रूपें आढळतात. पैकीं, चान्त व सान्त हीं एकच होत. याचा अर्थ—

सं० त्यत् > म० चें

सं० कार्य > म० ज

सं० कृत > म० क

अशी तीन भिन्न भिन्न रूपें यादव-मराठीत होती. जान्त व कान्त क्वचित् येत, चान्त नित्य येई. पुढे चान्ताचेंच प्राबल्य होऊन इतर दोन गळलीं. राजवाड्यांनीं चान्ताखेरीज इतराचा विचार केलेला नाही. यादव-मराठी ही एकविध नसून विविधतापूर्ण होती व अनेक रूपाची चाळवा-चाळव होऊन नंतर त्यातील काही निश्चित झाली, या विधानाला षष्ठीची ही चार रूपे बळकटी आणतात.

## § २४ सामान्यरूप

प्रत्यय वा शब्दयोगी लावण्यापूर्वी नामाचें सामान्यरूप वर्तमान-मराठी करते. पण येथे यादव-मराठीपुरतेंच पहाणे आहे. " ज्ञानेश्वरकालीन मराठींत विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यये ह्याच्या पूर्वी नामांचें सामान्यरूप होत नसे " असे राजवाड्याचें मत आहे. चि० वि० वैद्यें यांनी

---

१ Dr. P. D. Gune: Comparative Philology, pp. 30

२ Dr. Grierson: Linguistic Survey of India.

३ कृष्णशास्त्री चिपळोणकर (व्याकरण, पान ६२) व कृष्णशास्त्री गोडबोले (व्याकरण, पान ६३) हा 'च' संस्कृतांतील 'ईय' या तद्धितापासून व्युत्पादितात.

४ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान २५

५ निबंध आणि भाषणें, पान १२७–२८

त्याला विरोध केला नाही त्याअर्थी त्यांना तें मान्य दिसते. उलट, प्रा० कृ० पां० कुलेकर्णी सामान्यरूपाची पद्धति फार जुनी मानतात. त्यांच्या मतें अपभ्रंश, प्राकृत, संस्कृत, या सर्वांत सामान्यरूप आहे. वास्तविक हीं दोन्ही मतें आत्यंतिक होत. संस्कृतातील

"रामः, रामं, रामेण, रामाय, रामात्, रामस्य, रामे" या सात विभक्त्यांच्या एकवचनी रूपात सामान्यरूप कोणतें आणि कसें मानणार? राम हे मानावे तर ते मूळ प्रातिपदिकच आहे. तसेंच अपभ्रंशांतील[२]

"तुहुं, तइं, तइं, तउ, तउ–तुज्झ, तइं"

प्र० द्वि० तृ० पं० ष० स०

या एकवचनी रूपात 'त' हे फार तर प्रातिपदिक मानतां येईल, सामान्यरूप नव्हे. म्हणजेच आज ज्याला सामान्यरूप म्हणतात, किंवा युरोपीय वैयाकरण ज्याला 'ऑब्लिक' मानतात, तें संस्कृत–प्राकृतात नाहीं. अर्थात् प्रा० कुलकर्ण्यांचें वरील विधान अतिव्याप्त आहे. राजवाड्यांचें विधान कांहीं एका प्रमाणांत सत्य आहे. आज ज्या परिणत स्वरूपाला सामान्यरूप पोंचलें आहे, ती परिणतावस्था ज्ञानेश्वरकाली नव्हती हे खरे. परंतु ज्ञानेश्वरांच्या मराठींत सामान्यरूप होतच नव्हते असेहि नाही. माझ्या मतें यादवकालीन सामान्यरूपाची स्थिति पुढीलप्रमाणे आहे—

१ **प्रत्ययी–विभक्तिरूपें** : सामान्यरूप नाही. संस्कृत-प्राकृत-अपभ्रंशद्वारा सिद्ध झालेले प्रत्यय सरळ प्रातिपदिकाला लागत. अर्थात् एकविधता नव्हती.

२ **प्रत्ययात्मक शब्दयोगी-साधित विभक्ति :**
सामान्यरूप नाही, परंतु पुढें होणाऱ्या सामान्यरूपाचीं बीजें मात्र आहेत.

तृतीया—संभ्रमेंसिं, घोडेनिसिं, मूळासिं, वेलीसि, फलेसिं

चतुर्थी—पूतासि–ते, डोलेयासि–ते, वेलियेसि–ते, फलासि–ते

---

१ मराठी भाषा उद्गम–विकास, पान ३४०

२ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण, ४–३७५ ते ३८१

षष्ठी—पूताचा, डोलेयाचा, मुनीचा, वेलियेचा, दिसणेयाचा

वरील रूपें त्या त्या विभक्तीला प्रत्ययात्मक शब्दयोगी लागून झालेली आहेत. तृतीयेचें 'संभ्रमें'–सि, चतुर्थीचें 'पूता'–सि, व षष्ठीचें 'वेलिये'–चा अशी या रूपाची उपपत्ति आहे. म्हणजे मूळ शुद्धप्रत्ययी विभक्तीवरूनच ही रूपें आलीं असल्यानें येथेंहि सामान्य रूप नाही हे उघड होय.

३ **शब्दयोगी-साधित विभक्ति :** सामान्यरूप सर्वत्र नसले तरी बरेच आहे. क्वचित् कोठें नाही.

तृतीया : मियाविण, यादवाकरवि, साउलीएविणें, काठीएकरूनि
चतुर्थी : ज्ञानालागी, लेकरुवापासी, हुडेयालागौनि, गोरुवासाटी
पंचमी : चंद्रकरातव, पाटाउवापासि, हीरयापासौनि, मुंगीयेहोउनि
षष्ठी : वाटाउवाजवळी, सिगेवरि, सुनेयापरी, विंचुवावरि
सप्तमी : पदराभीतरी, खुणेआंतु, पाणीयातुल, सोनेयामाजीं

प्रातिपदिकाचें सामान्यरूप न करिता शब्दयोगी लावल्याची उदाहरणें पुढें देतों—

"**आंबांतु** घाली : **खीरीआंतु** घाली।" दृ० ६४
"परि पंचमालापी बोलिका : **कोकीळुवांचौनि** नाही।" उद्ध० ६४७
"की **देवतावरी** : प्रसाद छत्र धरी।"—ऋ० ८७
"उद्धवदेवाचेया **खांद्यावरि** हातु।"–ध० पू० ५०
"**गोविंदवरी** ऐसा पाडु नाही मज।" ध० पू० ६६
"म्हणौनि **तिचिवरि** अवकास केला।"—स्मृ० २२३
"**पेणेंप्रति** एकूएकें नीरोपेसी एकूएकातें पाठवीति।"–ली० १.७

परंतु सामान्यरूप नसलेली वरच्यासारखी स्थळें थोडीं. बहुश: तें आहे. तात्पर्य, यादव-मराठीत प्रत्ययी विभक्तींत नसले, तरी सामासिक विभक्तीत सामान्य रूपाचें अस्तित्व आहे असा निष्कर्ष निघतो. तसेच, राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें हा एकविध भाव द्वितीयेपासून सुरू न होतां तृतीयेपासून होतो. चिं० वि० वैद्य यानी राजवाड्याचें म्हणणें योग्य तऱ्हनें खोडलें आहे.

---

१ चिं० वि० वैद्य : "निबंध आणि भाषणें", पान १२७

सामान्यरूपाच्या उपपत्तीबाबत पंडितांत मतवैचित्र्य आहे. विभक्ति-प्रत्यय लोप पावत पावत त्या सर्वांच्या एकीकरणानें एकवचनी सामान्यरूप निर्माण झालें व षष्ठीच्या 'णाम्' प्रत्ययापासून अनेकवचनी सामान्यरूप निघालें असें बीम्स मानतो. गौड भाषांतून तें आलें अशी होर्न्लेची उपपत्ति आहे. डॉ० भांडारकराच्या मते सामान्यरूपाचें मूळ षष्ठी विभक्तीत आहे. प्रो० ब्लोकच्यी मतें तें षष्ठी-चतुर्थीत आहे. डॉ० कात्रे यांनी ब्लोकचाच अनुवाद केला आहे. प्रा० कुळकर्णी ब्लोकचें मत खोडून सामान्यरूप हे सार्वनामिक बीजांपासून निष्पन्न करूं पाहतात. राजवाडे एक तर ज्ञानेश्वरी-मराठींत सामान्यरूपच मानत नाहीत; आणि वर्तमान-मराठींतील सामान्य-रूपाची उपपत्ति ते ज्ञानेश्वरी-मराठीतलि विभक्तिरूपावरून लावतात.

मतामताच्या या गलबल्यात प्रो० ब्लोक, डॉ० भांडारकर व राजवाडे यांच्या विधानांत व उपपत्तीत पुष्कळ सत्य दिसतें. ब्लोक आणि भांडारकर यांच्या मतांत पुष्कळ साम्य आहे. राजवाडे मात्र कोणत्याहि एका विभक्ती-पासून सामान्यरूप न मानता ते ज्ञानेश्वरी-मराठीतलि अनेक विभक्तिरूपावरून मानतात. मला वाटतें, ही दोन मतें वाटतात तितकीं तीं विरोधी नाहीत. दोहींचा समन्वय करून माझ्या मतें सामान्यरूपाची–यादव-कालीन सामान्यरूपाची उपपत्ति अशी—

१ एकविधता
\+
२ षष्ठीचें अधिष्ठान
} = सामान्यरूप

---

१ "Oblique is not derived from any one special case but it results from a fusion of all cases".
Beames : Comp. Grammar, Vol. II, pp. 210

२ Grammar of Gaudian Languages.

३ Wilson Philological Lectures, pp.239-244

४ La Langue Marathe. pp. 179-183

४ L'indo Aryen, pp.156-161

५ Formation of Konkani, (B. O. R. I. Vol. xx, pp. 29)

६ मराठी भाषा, उद्गम-विकास, पा० ३४२

७ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पा० ७१-७२.

एकविधतेच्या नादाने व षष्ठी या सर्वगामी विभक्तीच्या साहायानें यादव-मराठींतच सामान्यरूप बनलें या माझ्या विधानास पुढीलप्रमाणे पुरावा देतों—

**एकविधता** :—भाषेचा कल विविधतेकडून एकविधतेकडे असतो हें तत्त्व सर्वमान्य आहे. यादव-मराठी ही संपूर्णतः एकविध नसली तरी एकविधतेच्या मार्गावर होती हे निश्चित. अपभ्रंशकालीच अनुकरणानें विभक्त्या एकविध होत होत्या. प्रथमा आणि द्वितीया या प्राकृतात भिन्न आहेत, परंतु अपभ्रंशांत त्यांची रूपें सारखींच होतात. चतुर्थी, पंचमी आणि षष्ठी यांचीं रूपेंहि अपभ्रंशात सारखीच होत. पुढें "सावयधम्म-दोहा[1]" मधून उदाहरणें देतों—

एकवचन :

| | | | |
|---|---|---|---|
| "सायरगयहिं समिलहि" | (चतुर्थी) | सा० दोहा, | २ |
| "मुक्खफल आयसहु" | (पंचमी) | सा० दोहा, | ५७ |
| "दोषहिं रहिउ" | (पंचमी) | " " | ५ |
| "गोत्तहु जसधन हाणि" | (षष्ठी) | " " | ४८ |

अनेकवचन :

| | | | |
|---|---|---|---|
| "जेण चोरहं अतियउ" | (चतुर्थी) | " " | ८४ |
| "जेण अपत्तहं धणु दिण्ण" | (चतुर्थी) | " " | ८४ |
| "सव्वहं गुणहं णरु मुच्चइ" | (पंचमी) | " " | ४४ |
| "संकाइयदोसहं रहिउ" | (पंचमी) | " " | १९ |
| "आयहं अट्ठहं अंतरि" | (षष्ठी) | " " | २२ |
| "चोरी बहुयकिलेसहं खाणि" | (षष्ठी) | " " | ४८ |

म्हणजे चतुर्थी, पंचमी व षष्ठी तिहींची रूपे एकवचनी 'हि–हु' कारान्त व अनेकवचनी 'हं' कारान्त आहेत. उच्चारप्रक्रियेच्या ओघात अपभ्रंशकाली जसे या तीन विभक्त्याचे प्रत्यय एकरूप झाले होते, तसाच प्रकार यादव-मराठींतहि झाला. प्रथमा व द्वितीया याचीं रूपें अपभ्रंशाप्रमाणें येथेंहि सारखींच आहेत. चतुर्थी, पंचमी व षष्ठी यांचीं प्रत्ययी-विभक्तिरूपें वर्णप्रक्रियेनें सारखींच भासत.

---

१ संपा०, प्रा० हिरालाल जैन.

सं० पुत्राय > प्रा० पुत्ताय > अप० पुत्ताअ > म० पूता ( च० )
सं० पुत्रात् > प्रा० पुत्ताउ > अप० पुत्ताहुँ > म० पूता ( पं० )
सं० पुत्रस्य > प्रा० पुत्तस्स > अप० पुत्तह > म० पूता ( ष० )

पुढें ज्ञानेश्वरींतील चतुर्थी-षष्ठीची रूपे ससंदर्भ देतों—

" तो संबंधु साधो **दिठी** । दीसे तैसा । " ॥ ज्ञा० १८–५० ( चतुर्थी )
" हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेयाही नैयेचि **आया** । " ज्ञा० १-२०३ ( चतुर्थी )
" **नयेंका** भलेतैसी थोरी । परि गंगा...सागरी । " ज्ञा० १७–३२२ (षष्ठी)
**रात्रि** आणि **दिवसा** । **कनका** आणि **कापुसा** ।
" पाडु का जैसा । तैसाचि हा ॥ " ज्ञा० १३–१०९६ (षष्ठी)

यादव-मराठीने हा एकविधतेचा चाळा चतुर्थी, पंचमी व षष्ठी यांच्यापुरताच केला असे नव्हे. अकारान्त पुल्लिंगी नामाच्या तृतीयेच्या अनेकवचनावरहि त्याचा परिणाम झाला. तृतीयेचें एकवचनी ' एं ' व अनेकवचनी ' ईं ' हे प्रत्यय वर्णप्रक्रियेला धरून आहेत. पण त्याशिवाय वर्णप्रक्रियेच्या नियमानी सिद्ध न होणारा असा ' ऑ ' प्रत्यय यादव-मराठी अकारान्त नामाला दोही वचनात लाविते. जसें—

" कृतकार्यां, भाटा, सर्वज्ञा, भक्ता "—पु०

पुल्लिंगाच्या अनुकरणाने ईकारान्त स्त्रीलिंगी नामालाहि तृतीयेंत हा ' ऑ ' प्रत्यय लागतो. जसे—

" भुंगां, बुद्धीआ, परीया "—स्त्री०

हा ' ऑ ' प्रत्यय पुल्लिंगी नामाच्या चतुर्थी, पंचमी, षष्ठी यांच्या अनेकवचनी रूपांवरून मराठीनें केवळ अनुकरणाने केला आहे.

चतुर्थी अ० व० – पूता
पंचमी अ० व० – पूता
षष्ठी अ० व० – पूतां
अर्थात्—तृतीया अ० व० – ऑं

पुढें, तृतीयेचेहि आकारान्त सामान्यरूप झालें ते या ऑं प्रत्ययावरून झालें ( पहा, क्रमाक ५ )

---

१ राजवाडे प्रतींत ' न यों कां ' असा पाठ आहे, तो अशुद्ध असावा.

एतावता, एकविधता, एका विभक्तीनें केलेलें दुसरीचें अनुकरण, **हेंच** सामान्यरूपाच्या मुळाशीं आहे. एकविधतेच्या नादानें विभक्तिरूपें सारखीं झाल्यावर, अर्थव्यक्तीकरितां शब्दयोगी अव्ययें वापरांत येऊं लागलीं व साहजिकच तीं या एकविध विभक्तिरूपांना लावण्याचा प्रघात पडला. राजवाड्यांनी विभक्तिरूपांपासून केलेलें सामान्यरूपाचें व्युत्पादन येथवर खरें आहे.

**षष्ठीचें अधिष्ठान** :—मात्र वर वर्णिलेली एकविधता ही स्वतंत्र नाहीं. तिला षष्ठी विभक्तीचें अधिष्ठान आहे. संस्कृतात सुद्धा षष्ठी ही एक सर्वगामी विभक्ति होती. " शेषे षष्ठी " हे सूत्र प्रसिद्धच आहे. प्राकृतात चतुर्थीचें काम षष्ठीच करी. अपभ्रंशकाली तर द्वितीया व तृतीया यांचा भाव क्वचित्, आणि चतुर्थी व पंचमी याचा भाव नित्य, षष्ठीच दाखवी. 'णायकुमारचरिउ' मधून दाखले देतों—

द्वितीया : " आयहु वणकरिंदु **कणयउरहो**। " ( कनकपुरस्य ) ३–१५–१३

" **सव्वहं** पाडमि जमदंडघाउ । " ( सर्वाणाम् ) ४–९–२

तृतीया : " मणु **मणहो** मिलिउ करु**करहो** मिलिउ " ( मनसः करस्य ) १–१८–९

चतुर्थी : " धीयउ **कंदप्पहो** दिण्ठउ । " ( कदर्पस्य ) ३–७–१६

" कहियं **णरणाहहो** ।" ( नरनाथस्य ) ३–१३–२

" सव्वंगु णविउ **परमेसरासु** । " ( परमेश्वरस्य ) ४-१३-९

पंचमी : " जलहितरंग णाइ **गिरिरायहो** । " ( गिरिराजस्य ) ३–१६–८

" **पंथहो** णोसरियउ " ( पथस्य ) ४–१३–६

" **केलासहो** होंतउ । " ( कैलासस्य ) ३–१५–१३

तात्पर्य, अपभ्रंशकालीं षष्ठी ही विभक्ति द्वितीयेपासून षष्ठीपर्यंतच्या विभक्तींचे अर्थ व्यक्त करताना दिसते. म्हणजेच, षष्ठीला तेव्हा सामान्यविभक्तीचें स्वरूप प्राप्त झालें होते. अपभ्रंशांतील या सामान्यविभक्तीवरून, म्हणजे षष्ठीवरून, मराठींतील सामान्यरूप निघालें. भाषेत प्रातिपदिक व

१ संपादक : प्रा० हिरालाल जैन

प्रत्यय ही एकमेकास जोडण्यास षष्ठीसारखी दुसरी विभक्ति नाही. कारण, षष्ठी ही मुळातच विशेषणात्मक विभक्ति आहे. अर्थात्, सामान्यरूपानें तिचाच आधार घेतल्यास नवल नाही. यादव-मराठीत ही षष्ठी चतुर्थी-पंचमीचें काम करिते हे वर पाहिलेच आहे. इत्यर्थ असा, की एका षष्ठीचें रूप अनेक विभक्तीत योजूं लागले. ही सारखवट असणारी विविध रूपें एकविध होत गेली व कालांतरानें त्यास सामान्यरूपाचे स्वरूप प्राप्त झालें. नियमाने बोलावयाचें तर, एका षष्ठीपासून अनुकरणाने अनेक रूपें बनली व त्या सर्वांचें शेवटी एक सामान्यरूप झालें.

षष्ठी = चतुर्थी, पंचमी, षष्ठी (क्वचित् द्वि० तृ०) = सामान्यरूप. हेंच संकेताने—

एक > > अनेक > > एक

असे माडता येईल.

यादव-मराठीत शब्दयोगी पुरतेंच सामान्यरूप आहे व तें सुद्धा नियमाने नव्हे, हे मी प्रथमच स्पष्ट केले आहे. ही सामान्यरूपे पांच प्रकारानी सिद्ध झालेली आढळतात. ते असे—

| | | | |
|---|---|---|---|
| एकवचन- | आ | अनेकवचन- | आं |
| ,, | ईं | ,, | ईं |
| ,, | ईं | ,, | आं |
| ,, | ऊ | ,, | ऊं |
| ,, | ए | ,, | आं |

या प्रकारांची सविस्तर चर्चा प्रा० कुलकर्णी व डॉ० भांडारकर यानीं केली आहेच. अनेकवचनातील अनुस्वाराविषयी मागें लिहिले आहे.

(पहा भाग २, क्र० २२)

## § २५ शब्दसाधित विभक्ति

यादव-मराठीतील नामविभक्तीचें हे तिसरे आणि परिणत स्वरूप आहे. प्रत्ययी विभक्तिरूपाचा एकमेकाशी घोटाळा होऊं लागला तेव्हा स्वतंत्र

---

१ चिं० वि० वैद्य, "निबंध आणि भाषणें", पान १२८

२ "मराठी भाषा—उद्गम विकास", पान ३४०

३ डॉ० भांडारकर : "वु० फि० लेक्चर्स", पान २३४–२४४

शब्दांपासून साधलेलीं प्रत्ययात्मक शब्दयोगी अव्यये निघाली व त्याच्याहि द्वारां संपूर्ण अर्थव्यक्ति होईना म्हणून शुद्ध शब्दयोगींच्या साहाय्यानें विभक्तिरूपें बनूं लागली. भाषेचे हे परिणत असे सामासिक स्वरूप होयें. राजवाड्याच्या मतें कोणत्याहि शब्दयोगी अव्ययाच्या मागे प्रथमा, पंचमी व सप्तमी या विभक्त्यांची रूपें येत नाहीत. हें म्हणणे यथार्थ नाही. प्रथमेपासून सप्तमीपर्यंत साती विभक्तिरूपे शब्दयोगींशी निगडित आहेत. पुढे प्रत्येक विभक्तीची शब्दयोगी अव्यये ससंदर्भ देतो—

**प्रथमा :—**

१ **वांचौनि** ( वृज् धातूचे अव्ययी भूत कृदत –" राजवाडे धातुकोश " )

" तुं सातव राओ वाचौनि आणिक : कवण राखैल । "–उद्ध० १०३

" पुण आवघेंचि जाले चोरमोळे : नरदेहवाचौनि । "–उद्ध० २४७

" हा परमेश्वरु एकु वाचुणिया : कवण रक्षता असे । "–उद्ध० ४१२

" कव्हणी सुक्षेत्र नाही ऐसे । ते वाचौनिया । "–ऋ० ९९

" तूं एकुवाचौनिया आनु नाहीं अवधारी । "–ध० पू० ८

" तो तुझें वाक्य वाचूनि । न जीपे आणिकें । " –ज्ञा० २–६४

क्वचित् हें नामाच्या पूर्वींहि येते. जसे—

" वांचूनि कर्मारंभ उचित । न करिता सिद्धवत । "–ज्ञा० ३–४५

२ **वेऱ्हीं** ( < का० वरि )

" दीप घरोघरी : असति कोडि संख्यावेऱ्ही । "–उद्ध० २९७

" भणाल हेचि वेऱ्ही नेणता : तरि मागिलेसि अन्वयो कथा । " ऋ० ६१३

" हा गा हा ठावोवेऱ्ही मौन्यचि । " –स्मृ० २०

" तिया बीळथेऱ्ही दृष्टीचें राखण घातलें । " –स्मृ० १०५

" आणि अपयश ते न वचैल : कल्पातुवेऱ्ही । " –ज्ञा० २–२०१

" निवडूनि कीजे सेना लक्षवरि । " –ज्ञा० ७–११

---

१ J. Bloch: La Langue Marathe, 195-207

२ राजवाडे, ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पा० १८

तृतीयेच्या आणि षष्ठीच्या 'वरि' हून हें 'वेन्हीं' भिन्न आहे. प्रा० कुलकर्णी समजतात त्याप्रमाणें हीं सर्व रूपें सप्तम्यर्थक नसून त्या त्या विभक्तीच्या विशिष्टार्थी योजिलीं जातात.

३ **पर्यंत** (सं०)

"ते देहपर्यंत नमस्करीलें।" –स्मृ० ८

"ते कव्हणाइ जीवा क्षेणुपरियंत अनुकरवेना।"

–लीला० ३, पान ५९

४ **सहित** (सं०)

हे सदा तृतीयेशीं युक्त असते; परंतु क्वचित् प्रथमेशी योग आढळतो. उदा०

"तैं नित्ययागसहिते। सृजिलीं भूतें समस्तें।"–ज्ञा० ३–८६

**द्वितीया:**—द्वितीयेचीं प्रत्ययी रूपें जशी प्रथमेसारखी झाली तशीच–सामासिक रूपेहि झाली. अर्थात् प्रथमेची शब्दयोगी अव्यये द्वितीयेलाहि लागतात. उदा०

"अहर्निसी माझे रूपडे : वाचौनि डोळेया आन नावडे।"

–उद्ध० ८००

**तृतीया:**—

१ **विण** (< अप० विणु < सं० विना)

"तुवाविण श्रीरंगा : विजयश्री गेली भंगा।"–उद्ध० ९५

"आगा मुखमेलेविण। पीलेयाचे पोखण।"–ज्ञा० १३–१४०

हे शब्दयोगी नामाच्या पूर्वीहि येते. उदा०

"चाले विण पाउलीं : कर्माचिये वर्तेवरि।"–उद्ध० ६०५

२ **हीन** (सं० विहीनें)

"जैसी भातारें हीन वनिता। उपहति पावे सर्वथा।"–ज्ञा० २–१९९

३ **सहित** (सं०)

---

१ कृ० पां० कुलकर्णी, "मराठी भाषा" पान ३४०

२ राजवाडे, कुलकर्णी, बीम्स यांपैकी कोणीहि याचा उल्लेख करीत नाहींत. डॉडेरेट् मात्र करितो.

" श्रीयेसहित रथी आरूढ श्रीचक्रधर।"–ध० उ०, १
" वऱ्हाडीयासहित वर पातला मंडपाचीया द्वारा।"–ध०उ० २७
" तो कपोता : सहित काता : अरणी होता।"–उद्ध० ३०६

४ **सरिस** ( < सं० सदृश )
" एकादशेर्सी सरिसी : भाजुनि साहित्य देशी। "–उद्ध० ८२६
" शिराजाळें सरिसा : गुंफौनि अस्थींचा पाशा। "–उद्ध० ७५९

५ **सवें** ( सं० समम् )
" भक्त आगवळेसवें रथीं आरूढले गोवीदराणा। "–ध० पू० ७२
" तो आघवियाच्चि भूमिका। सवे चाले। " –ज्ञा० १८-१०३७

६ **वांचौनि**—हें सदा प्रथमेशीं युक्त असते. परंतु क्वचित् तृतीया आणि षष्ठी याचाहि योग होतो. तृतीयेचें उदाहरण पहा–
" परि मोक्ष तो माझेनि ज्ञानें : वाचौनि नाहीं।"–उद्ध० ६४१

७ **करूनि** ( < प्रा० करिऊण < सं० कृत्वा )
" कोभैजे केतकी दळ : मेघींकरूनि।"–उद्ध० १८
" चंद्राचा रश्मीकरूनि सीळापाषाण निवति।"–दृ० ९
" चाटसीएकरूनि मळी वेगळी करी। "—दृ० ६७
" तेही (सर्पु) काठीएकरूनि कृपावरि घातला।"–लीला० ३, पा० ३७
" लोक सायासे करूनि बहुते। का वेचीति आपुली जीविते। "
ज्ञा० २–२०९
" परमेश्वरु आपुलेया कृपाशक्तिकरूनि अविद्याछेद करीति। "
–च० सि० सूत्रें २९

८ **करवीं** ( 'कृ' चें प्रयोजक )
" ऐसे बोलौनि गोपाळें : यादवाकरविं पालानविले।"–उद्ध० ५७
" तरि या हरिकरवि म्हणवूं।"–स्मृ० १२१
" आपुलीए राणिएकरवि पूसविलें।"—लीला० १–५
" गोसावीया करवि करू कैसा लाववीला। " लीला० १–६८

९ **वरि** (...?)
" तेथ बाणवरि धनुर्धर। वरिषताति निरंतर।"—ज्ञा० १–१६६

"धुधुवातें कुठारेवेन्ही : बानभुजांचीं करौनि काडौरीं ।"
—शि० ४५५

"एक दीस कवळीयावरि बाहीरि घाली ।"—द० ९०

"गोसावी द्वारावतिएसि खराटेवरि बीदी झाडीती ।" लीला० १–२

"दूध आणिले : बोळेवरि पाजिलें ।"—स्मृ० २

ही करणार्थे तृतीया होय.

**चतुर्थी** :—

१ **लागीं-लागौनि**–यादव-मराठीत 'ला' हे प्रत्ययात्मक शब्दयोगी नाही. त्याचे मूळचे स्वतंत्र शब्दयोगी 'लागी–लागौनिया' हे आहे. संस्कृतातील 'लग्' धातूचे हे भूतकृदन्त होय. लागी ही लाग ( . .सं० लग्न )ची सप्तमी होय.

"ळावेयालागी"—नागाव शिला०

"हिताहित जाणावे । हिताचि लागी ।"–ज्ञा० ८–२३७

"हा येणे माने महंतु । वरि आम्हालागी कृपावंतु ।"–ज्ञा० २–४४

"जेआलागी उदासु : जोजार प्रसवलासि बहुवसु ।"–ऋ० १९०

"जैसी ओरसे धेनु : हुबरुत ये वच्छालागौनि ।"– ऋ० १५७

"तेवि तूं जगदबिके : मजलागौनि ।" –ऋ० २८०

"तयासि स्नानालागौनि पाणी सारिलें होते ।"– लीला० १.२७

क्वचित् 'लग' हे व्ययी कृदन्त (< सं० लग्न) नामापुढें जोडून विशेषण साधलें जातें. पहा—

"वारेलगे पाखिरूं"– ज्ञा० १३–३१४

२ **कारणें** ( सं० )

"या कारणें राया : वायू गुरु केला मिया ।" –उद्ध० २७९

"जें आर्तांसि कारणे : ससारश्रमाचें विसंवणें ।" —ऋ० ४४

"हें इतुकें उचिष्ट रंभायेकारणें ठेवि ।"— स्मृ० १६२

३ **प्रति** ( सं० )

"इयप्रति गोपाळु ऐसें कैंवि आलें तुमचिया मना ।" –ध० पू० ५

" पेणेंप्रति एकूएकें नीरोपेंसीं एकूएकाते पाठवीति । " –लीला० १–७

" तैसें जेयाचें मन । मानुष ( षा ? ) प्रति आनान । " –ज्ञा० १३-३५६

४ **साठीं** ( < सं० स्यार्थे; ... गजवाडे : < सं० सार्धम् )

" एवढी कुळाचळाची आटि : काढिजे जयासाटि । "–उद्ध० ५१२

" दूध मागितलेया साटी ... वाटी करूनि ठेविली । " ज्ञा० १०–१७

" येतुलिया साठि निश्चंतु । नास्तिकु होय । " —ज्ञा० १३–७६३

५ **दोषें** ( < सं० उद्देश...... ? )

" सौरभ्ये गिवसावेआ दोषे : गर्भ सुमनाचा । " ऋ० १४४

" जें असौनि त्रिशकु दोसें । धात्रेयाही आणावे वोसें : "

–ज्ञा० १८–१७६६

६ **पासीं–पासाव** ( < सं० पार्श्वे )

" की नाभिमंडळापासाव : रोमराजीची बरव । " –ऋ० ५७६

" परि तेयापासि पाडवा । मी हारतला गिवसावा । " ज्ञा० ९–२०७

७ **स्तव** ( सं० ) हे बहुधा पंचमीशीं युक्त असते; क्वचित् चतुर्थीशीं आहे.

" मन मोडे : स्नेह विघडे

" तें मैत्र माघौते न घडे : धात्रेयास्तव । " –उद्ध० ७४७

**पंचमी :** —

१ **तवं** ( < सं० स्तव )

" अन्नातव भूतें । प्रोहो पावति समस्तें । " –ज्ञा० ३–१३४

" शाखातव देखा । पल्लव पाने । " –ज्ञा० १०-९७

" सोमकाता गळति थेबटें : चंद्रकरांतव । "–उद्ध० १७

" तरि आकाश का भिन्न नव्हे : परमाणुतव । "–उद्ध० ५८०

" तयासि गोसावीयापासौनि स्थिति : तयातवं देवभाव । " लीला० १-१२

'तंवं' आणि 'स्तव' ही अनुक्रमें तद्भव व तत्सम रूपें आहेत. त्यांचा अर्थ एकच. प्रो० ब्लोकै 'तवं' हें संस्कृत तावत् पासून

१ J. Bloch. La 'Langue Marathe' 203–4

व्युत्पादितात, ते बरोबर नाही. महानुभाव ग्रथांतील आणि ज्ञानेश्वरींतील 'तवं' एकच होय, व दोघाची व्युत्पत्तिहि तीच.

२ **लागीं–लागौनि** ( < सं० लग् )

" जो मुगियेलागौनि ब्रह्मावेऱ्हीं । नीयमीतु असे।"–ज्ञा० १०–२७२

" जो मशकालागौनि ब्रह्मावेऱ्ही । ग्रासी तो मी । "–ज्ञा० १०-२५०

" अन्यथा ज्ञानालार्गी : वरि घालिजे पतर्गा । "–उद्ध० ३४०

३ **पासि** ( < स० पार्श्व ...? )

" साधनापासि साध्य उत्तम । " –दृ० ६९

" कर्मचाडाळापासि जातचाडाळ चाग । "–दृ० ४८

" तया प्रेमाचा महुरु : शाभवसुखापसि मधुरू "–उद्ध० ७९५

" गृहस्मरणापासि झाडातळि मनोरथ आठविसि ते निके । "–स्मृ० ३३

४ **पासाव** ( < स० पार्श्वात् )

" आता ऐसेसेया अपराधा । मर्यादा नाहि मुकुदा ।
म्हणौनि रक्ष प्रमादा । प ( पा? ) साओ म्हणवी । "–ज्ञा० ११-५६४

" वज्रापासाव कठीणु . मज देवहताचे अंतःकरणु । "–ऋ० २२१

५ **पासौनि–पाउनि** ( < 'पार्श्व' याची पचमी )

" चंद्रापासौनि निववितें । अमृताहूनि जीववितें । " ज्ञा० ९–२४

" तीअे बरवी ओष्ठपूटे : बिबफलापासौनि । " –शि० ४११

" लाभापासुनि लाभ । "—दृ० ३९

" नै कुंतिएसि भेटी जाली । तंव पाऊन दुपहारी भरली । " शि० ६१२[1]

६ **होउनि–हौनि**–( < सं० भूत्वा )

'औनि, ऊनि' या पंचमीच्या प्रत्ययापासून हे शब्दयोगी भिन्न आहे. प्रत्ययाची परपरा औनि < अप० होहुं < प्रा० हितो, भुंतो < सं० तस अशी आहे. 'होऊन' हें शब्दयोगी—

---

१ नागांव शिलालेख, इ० स० १३६७.

सं० भूत्वा > प्रा० होत्तूण > म० होऊन

अशा परंपरेने आले आहे व तें पंचमीशी युक्त होतें. बीम्सने[1] या दोहोत घोंटाळा केला आहे. वास्तविक हे शब्दयोगी प्रत्ययापासून स्वतंत्र असून तसें तें स्वच्छ दिसते. पहा—

"पाताळा होनि निम्न। जिये उंचिये साने गगन।"–ज्ञा० १६–३२९

"वारिआं पासौनि वेगाडे : पर्वता हौनि दळवाडे।"–शि० ९३४

"गाइची तृषा हरूं। व्याघ्रा विष होउनि मारु।"–ज्ञा० १२-१४६

या शेवटल्या उदाहरणावरून भूत कृदन्ताचे शब्दयोगी कसें होत होते ते ध्यानांत येईल. तसेच त्यातील 'हो' धातूचा अवशेषहि[2] येथे दिसेल. कोंकणींतहि[3] 'होउनु' व 'ठाउनु' (सं० स्था) अशी पंचमीची शब्दयोगी आहेत.

७ याखेरीज डॉडेरेट[4] '**सौनि**' हें आणखी एक पंचमीचे शब्दयोगी मानतो. वास्तविक ते तसे नाही. डॉडेरेट् पुढील उदाहरण देतो—

"तैसा संतोषाचा काई घडिला। का **सिद्धभांडारौनि** हान काढिला। दीसे तेणे माने रूढला। साधकदशे॥"–ज्ञा० ६–४६२ (राजवाडे)

म्हणजे राजवाडे प्रतींत सैनि असा पाठ नसून औनि असा नेहमीचाच आहे. डॉडेरेटच्या मते राजवाडे प्रतींत 'सैनि' असा पाठ नसला तरी ज्ञानेश्वरीच्या इतर नऊ प्रतीत तो आहे. तेव्हां केवळ संख्येला भुलून डॉडेरेट 'सैनि' हाच पाठ मानतो. वास्तविक संख्या हें येथे प्रमाण नव्हे. फार तर ती नऊ नकलकाराची चूक म्हणतां येईल. डॉडेरेट् एतत्संबंधी आणखी

---

१ Beames: Comparative Grammar, pp. 233

२ J. Bloch:La Langue Marathe, 203

३ Father Stephens : Konkani Grammar 523 ( vide S. M. Katre Formation of Konkani, B. O. R. I. Vol. xx part I pp. 37 )

४ W. Doderet : Grammar of Jnyaneshvari. B. S. O. S. Vol. IV

एक प्रमाण म्हणून देतो. त्याच्या मते ज्ञानेश्वरीतील ‘सिन-सिनानी’ ही विशेषणे ‘सैनि’च्या मुळाशी आहेत. उदा०

“तेचि श्रद्धा तामसी। सिनानी नाहीं।”–ज्ञा० १७-७०

“हो का पाणिया जवली। परि सिनी तोचि बाबुली।”–ज्ञा० १८-२७०

येथे ‘सिन-सिनानी’ याचा अर्थ ‘भिन्न, वेगळी’ असा असून त्याचा डॉडेरेट्मानित ‘सैनि’शी अर्थाअर्थीहि संबंध नाहीं. गावढळाच्या बोलीतील ‘तिथून्शेन्, करुनशान्’ यातील ‘शेन्-शान्’शी वरील ‘सिना’चे साम्य डॉडेरेट् दाखवितो. परंतु या सर्व कल्पनाच होत. महानुभाव ग्रथात व शिलालेखात हा ‘सैनि’ प्रत्यय आढळत नाही. ज्ञानेश्वरीच्या इतर प्रतीत तो आहे, परतु राजवाडे प्रतीत नाही. इतर प्रतीतहि एकदर साधारण ९००० ओव्यात तो एकुलता एकच आढळतो. तात्पर्य, मूळ ‘सैनि’ असे रूपच नाही. आहेत ते सारे ‘औनि’चे अपपाठ आहेत. अर्थात्, मूळातच अस्तित्वात नसणाऱ्या या ‘सैनि’ची परपरा व संबंध शोधण्यात अर्थ नाही.

**षष्ठी :—**

१ **वरि** (< सं० उपरि)

“तो कैवल्यनाथु चरणचारिया : पदे ठेवि जेआ वरिया।” ऋ० १२१

“एकु अडखळौनि पडति : मढआवरि।”–शि० १०५८

२ **सकट** (< स० सकृत्...?)

“तेणे सग्रहे होए नाशु : देहा सकट।”–उद्ध० ३६८

“तो जाळी सर्वांगे : मुळांसकट।”–उद्ध० ६०९

“ते सर्वांगु जाले काळे नीळे : नखासकट।”–शि० ८२३

३ **समोर** (< सं० सन्मुखर)

“तो माझेआ घाआ समरू : कहीं नोहें।”–शि० ८९२

४ **परौता** (< सं० परतस्)

“सृष्टीपरौता जिआ : सौरसु होए बोलावेआ।”–ऋ० १४

“कीं जाति वेव्हारा परौता : जेया परिकर्म संकळिता।”–ऋ० ६५

“या परते पाप नाही।”–उद्ध० ४०५

“तेया परौता अंधकारु।”–उषा० १५७९

५ **वांचौनिया**

"राखता नाहीं भवारी : तुजवाचौनिया।"–ऋ० १९५

"प्रस्तुत आता गुर्णा इही।तुज वाचौनि आनु नाही।"-ज्ञा० ९-४१

६ **वारिया** (< सं० वृ)=ऐवजीं

"तुझीया वारिया मज : नाचो नये।"–उद्ध०२४२

**सप्तमीः**—

१ **आंतु** (< सं० अतर्)

"सवेचि खुरखुरितु पडे : नरकाग्नि आतु।"–उद्ध० ३६३

"हाचि प्रस्नु पूर्वी अर्जुनें केला : जुझा आतु।"–उद्ध० ६९४

"गाडेयाचीये चाकारीयेआतु पडिली असे।"–स्मृ० १४६

"आबातु घाली : खीरीआतु घाली।"–दृ० ६४

**हें** नामापूर्वीहि येते. पहा—

"तो ही पडे आतु ससाराचेया अगडा : संगास्तव।"–उद्ध० १९०

**क्वचित्** आंतुल वापरले जाते—

"पाणियातुल गुंडा...।"–दृ०२७

२ **भीतरीं** (< स० अभ्यंतरम्)

"तैसे पदाचेया पदग : भीतरि भाव डोळा दीसती।"–उद्ध० २९

"तया भीतरी कवणु होए : तो गोसावीं साधावा।"–उद्ध० ६२९

"तो विरहाग्नी खरा : म्हणौनि हृदयमुसे भीतरा।"–ऋ० ६२४

३ **माजि–मध्ये** (< सं० मध्ये)

"लपौनि राहिला माजिवास्थारा : जघद्वइं।"–ऋ० ५६५

"मी दैवेहीन माजिसकळिका...।"–स्मृ० १६५

"जघन जानूचिया संधी : मध्ये कुंठलिया बुधी।"–ऋ० ५६३

४ **माझारीं** (< स० मध्यगृहम्)

"तेथचेया ब्राह्मणामाझारि : नाव लुब्धपाणी।"–उद्ध० ७१८

"तिही लोकांमाझारी याचेनि रूपें-गुणें क्षेत्री नाहीं।"–ध० पू० ४२

"जालें येक पेणे माझारी सोरटि।"–मा० रु० स्व० २३

"पैं ध्यातां आपणपेंचि परी। ध्यानरूपें वृत्ती माझारि।"

ज्ञा० १८-१०२७

येथवर साती विभक्त्याना लागणारीं शब्दयोगी पाहिलीं. यादव-मराठींत शब्दयोगी-प्रकरणी पुढील विशेष आढळतात—

(१) शब्दयोगी लागण्यापूर्वी बहुतेक ठिकाणी प्रातिपदिकाचे सामान्य-रूप होतें. परंतु होतेंच असा नियम सागता येणार नाही. उदा० 'हेंचि वेन्हि'–ऋ० ६१३, 'कोडिवेन्हि' ज्ञा० ७, 'लेंकरुवे वाचौनि' उ० ३२७ वगैरे रूपात सामान्यरूप नाही. 'वाचौनि' आणि 'वेन्ही' ही सामान्यरूप न घेणारी विशेष शब्दयोगी दिसतात.

(२) क्वचित्, शब्दयोगी हे नामाप्रमाणेच अव्ययाला व कृदंतानाहि लागे. जसे—

"तंवंचिवेन्ही"–ऋ०११८

"तंवंपर्यंत"–ह० ७५

"नावेकवेन्हीं"–शि० ७०७

"वीन बैसौनि"–शि० ५७५

(३) 'वेन्ही' हें शब्दयोगी एकूण तीन अर्थांनी वापरले जातें. पैकीं प्रथमेशी युक्त असणारे मुळात द्राविडी असून तृतीयेचे व षष्ठीचे आर्योद्भव आहे. याखेरीज, 'वेन्ही' या शब्दयोगीचे पुढील अर्थ पहा—

"पात्रवेन्ही पाणि आणिति।"–लीला० ३ पान ३५ (=पात्र भरून)

"जो देसावरि खाडे काढूनि जाये।"–स्मृ०१९५ (=देशांतराला)

(४) 'वेन्ही' प्रमाणेच 'वाचौनि, पासाव' ही शब्दयोगी अनेक विभक्त्याशीं युक्त आहेत.

(५) क्वचित् कोठे प्रत्ययात्मक शब्दयोगी व शुद्ध शब्दयोगी ही जोडीनें वापरलेली आहेत. प्रत्ययी नामविभक्ति आणि सामासिक नामविभक्ति यामधील टप्पे कळण्यास अशा जोड्याचा उपयोग फार आहे. पहा—

"जे काळासि वरि वज्रांगी.. ।"–ऋ० २१६

"तुतेनि करूनि माती फेडी। इळेनि करूनि गवत घेऊं बैसला।" ह० ५४

## § २६ सर्वनामें

नामांपेक्षां सर्वनामांनींच प्रत्ययी विभक्ति अधिक जागृत ठेवलेली दिसते. तसेंच, रूपाची विविधताहि येथे नामापेक्षां जास्त आहे. पुढें

सर्वनामांचीं प्रत्ययी व प्रत्ययात्मक शब्दयोगींनी सिद्ध होणारी रूपे देतों. शुद्ध शब्दयोगी सहजसिद्ध आहेत. तीं नामांप्रमाणेंच सर्वनामानाहि लागत असल्यानें निराळीं देण्याचें प्रयोजन नाही.

## पुरुषवाचक सर्वनामें

**प्रथमपुरुष :—**

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | मी ( < अप० हउं < सं० अहम् ) | आम्ही ( < अप० अम्हे, अम्हइं ) |
| द्वि० | ,, | आम्हॉं |
| तृ० | मिआ, मिआ, मिया, मासी ( < अप० मइं < सं०मया ) | आम्हीं ( < अप० अम्हेहि ) |
| च० | मज, मसी, मजसी, मासी, माते ( < अप० महु ) | आम्हा, आमुते, आमसी, आमुसीं |
| पं० | मजहुनि ( < अप० महु, मज्झु ) | आम्हाहुनि ( < अप० अम्हह ) |
| ष० | मज ( < अप० < सं० मह्यम् ) | आम्हा ( < अप० अम्हह ) |
| स० | मी ( < अप० मइं ) | आम्ही–आम्हातु ( < अप० आम्हासु ) |

**द्वितीयपुरुष :—**

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्र० | तूं ( < अप० तुहुं, तुमं ) | तुम्ही ( < अप० तुम्हे, तुम्हइं )[2] |
| द्वि० | ,, ,, ,, | ,, ,, |
| तृ० | तुआं–वॉं ( < अप० तइं, पइं ) | तुम्हीं ( < अप० तुम्हेहिं ) |
| च० | तुज, तुजें, तुसीं, तूंतें ( < अप० तुहुं ) | तुम्हां, तुम्हाइ, तुमतें, तुम्हांसि |
| पं० | तुजहुनि ( < अप० तउ, तुज्झ ) | तुम्हांहुनि ( < अप० तुम्हहं ) |

---

१ संस्कृतांत 'मह्यम्' हें कधीं षष्ठ्यर्थी वापरलें जातें, उदा०
"यथा तेन पिता मह्यं पूर्वं दग्धो विषाग्निना"।
—महाभारत ( क्रिटि० प्रत ) १–४७–५

२ अपभ्रंश-रूपें हेमचंद्र-व्याकरणांतून घेतलीं आहेत.

| | |
|---|---|
| ष० तुज (< अप० तउ, तुज्झ) | तुम्हा (< अप० तुम्हहं) |
| स० तूं (< अप० तइं) | तुम्ही (< अप० तुम्हासु) |

**तृतीयपुरुष**...एकवचन...

| | पुल्लिंगी | नपुंसकलिंगी | स्त्रीलिंगी |
|---|---|---|---|
| प्र० | तो (< अप० सो) | ते | ते, त्ये, तीये, ती (< अप० सा) |
| द्वि० | तो (< अप० त) | ,, | ,, ,, ,, |
| तृ० | तेणे, तेया, ति, तेणेंसि (< अप० तेण, ते, ताइ) | पु० प्रमाणे | तिआ, तिया, तीए, त्या, ती, तियासिं (< अप० तीए, ताइं) |
| च० | तेया–आ, तेआते, त्याते तेहा–सि (< अप० तहो) | ,, ,, ,, ,, | तिअे, तिये–य, तीते, तीसी तीयेते (< अप० तहे, ताह) |
| पं० | तीए | तयाही | |
| ष० | तेआ, तेया–हा (< अप० तहो, तासु) | पु० प्रमाणे | तीये (< अप० तहे, ताह) |
| स० | तिए, तैं (< अप० तहिं) | तिअें–ये | ते, तिअें, तीये, तीया, ती (< अप० तिहि) |

**अनेकवचन—**

| | पुल्लिंगी | नपुसकलिगी | स्त्रीलिंगी |
|---|---|---|---|
| प्र० | ते (< अप० ते, ताइ) | तिये, ते, त्ये | तिया, तेया, ते |
| द्वि० | ,, ,, | तिअे | ,, ,, |
| तृ० | तेही, तिहीं, तेया तिहींसि (< अप० तेहि) | तिही, तिहींशी | तिहि–सि |
| च० | तेआ–या, तेहासि–ते | पु० प्रमाणे | तियासि–ते |
| पं० | ,, ,, | ,, ,, | ,, ,, |
| ष० | तेया–आ–हा (< अप० ताहं) | ,, ,, ,, ,, | तिया |
| स० | तेया | ती | तिआ–या |

यादव-मराठीने प्रथमेचे एकवचन प्राकृत–अपभ्रंशातील सामान्य विभक्तीवरून घेतले.

**दर्शक सर्वनामें :-**

१ सं० एतत् > प्रा० एय, ऐअ > अप० ऍय > म० ए
२ सं० इदम् > प्रा० ईम > अप० ऑय > म० इ
३ सं० अदस् > प्रा० अंमु > अप० ओईं > म० इ

या तिहींचा परस्पराशी घोटाळा होऊन यादव-मराठीतील दर्शक-सर्वनामे सिद्ध झाली. त्यांची रूपे पुढे देतो :-

**एकवचन—**

| | पुल्लिंगी | नपुसकलिगी | स्त्रीलिगी |
|---|---|---|---|
| प्र० | हा | एं, हे | हे, ए |
| द्वि० | ,, | ,, ,, | ,, ,, |
| तृ० | एणें-सि, यया, इया, या | या | इआ, एया, यया-सि |
| च० | यया-सि, या, इया एया, येया | .. ... | इय-ये-सी, इयेसी-ते |
| पं० | एयाहुनि | ... | ... |
| ष० | यया, इया, एया, या | या | ए, एया |
| स० | एं, इये, यया, यातु, ये, एही, इहि | हें, इं, इहि | इएं, ये, इया |

**अनेकवचन—**

| | पुल्लिंगी | नपुसकलिगी | स्त्रीलिगी |
|---|---|---|---|
| प्र० | हे, ए | यें, एं, इये, हे, ही | या, इया, एया |
| द्वि० | ,, ,, | ... . | ... |
| तृ० | एही-सी, येही, इहि | इहि | इही-सी, या-सि, एहि |
| च० | याहासि-ते, एया | . . | इया-सि-ते, या |
| पं० | येयाहुनि | . . | ... |
| ष० | एया, इया, या, इं | | एआ-या |
| स० | या, एही | एं, ये, येहीं, इया | इया, या |

---

१ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण, ८-३-७० ते ८६
२ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण, ४-३६२, ३६४, ३६५

## संबंधी सर्वनाम

ज (जो, जी, जे) < अप० ज < प्रा० ज < सं० यत्

हे सर्वनाम तत् > म० त प्रमाणेच चालते. उदा०

पुल्लिंग : जो–जे, जेणें–जेहीं, जेआ–ते, जेआ, जिअे
नपुंसक० : जे–जिए, " " " " "
स्त्रीलिंग : जे–जिआ, जिआ–जेहीं, जिआ

## प्रश्नार्थी सर्वनाम

१ काइ, के < अप० क < प्रा० क < सं० किम्

याची रूपे: "काइ, के, काह्या, काह्याचेनि" अशी आढळतात. ती अपभ्रंशातील "कोइ, काइं, को, कहु, कहो, कहि" या रूपावरून सिद्ध होतात.

२ कवण < अप० कवणु < ?

याची 'कवण, कव्हण, कोण्ह' अशी रूपे सापडतात. व्युत्पत्ति-संबंधी पंडितात मतभेद आहेत. होर्न्लें[1] अपभ्रंशातील 'केवडुं' पासून, पिशेल[2] 'कु' या अल्पार्थी प्रत्ययापासून व प्रा० कृ० पा० कुलकर्णी[3] संस्कृत 'कःचन' पासून हे सर्वनाम व्युत्पादितात. 'कः पुनर्' ही उपपत्ति प्रसिद्धच आहे. परंतु अशा कोणत्याहि एका संस्कृत शब्दावरून 'कवण' हे रूप साधणे बरोबर नाही. 'कः पुनर्' हे कवण या अर्थी संस्कृतात वापरण्यांत नाहीं. ते तसें असतें, तर हेमचंद्र

"अपभ्रंशे किमः स्थाने काइं कवण इत्यादेशौ वा भवतः।"
(४,३६७)

एवढेच म्हणून थांबता ना. एकाच 'किम्' ची 'काइं' व 'कवण' अशी दोन रूपे तो अपभ्रंशात मानतो. तेव्हा, माझ्या मते कवणची उपपत्ति अशी—

---

१ Hoernle : Gaudian Grammar, pp. 219
२ Pischel : Prakrit Grammatika, 428
३ मराठी भाषा, उद्गम विकास पा० ३४८

सं० किम् > प्रा० किणो[1] ( पंचमीचे रूप ) > अप० कवणु.

तात्पर्य, 'कवण' हें सर्वनाम महाराष्ट्री–प्राकृतातील 'क'च्या पंचमीच्या 'किणो' या रूपावरून निघाले. याची 'कव्हण, कव्हणी, कव्हणे' अशीं तीन लिंगी रूपें होतात.

यादव-मराठींत 'कवण' या सर्वनामाला नेहमींच्या प्रश्नार्थाहून भिन्न असा 'कोणताहि' हा अर्थ आहे. पहा—

" सृष्टीमध्ये **कव्हणें** करणे मुचिजेना... ।"–चक्र० सि० सूत्रे १

" न मनिता भेदाचे दळवाडे: **कव्हणी** वेहारु न घडे ।"

–उद्ध० ५७६

" काळु कहीं **कव्हणी** दीसे: प्रतिबिंबला नाहीं । उद्ध० ५८१

" **कव्हणीं** सुक्षेत्र नाहीं ऐसे: जेथ फीटे भवपाशे ।"–ऋद्धि० ९९

" मग ते म्हणे हे **कव्हणाचेंनिहीं** न बुझावें ।"–दृ० ९८

म्हणजे रूढ प्रश्नार्थी व विशेष नकारार्थी अशा दोन अर्थांनी 'कवण' हे सर्वनाम वापरलें जातें. इतर आर्य भाषांतहि असाच प्रकार आहे.

## आत्मवाचक सर्वनाम

१ सं० आत्मन् > [1]प्रा० अप्प० > अप० अप्पा > म० आपु

> [2]प्रा० अप्पणो ( षष्ठी ) > अप० अप्पणउ > म० आपण

म्हणजे एकाच आत्मन्‌पासून प्राकृत प्रातिपदिक 'अप्प' याच्या द्वारा 'आपु' व प्राकृतातील षष्ठी 'अप्पणो' याच्या द्वारा 'आपण' अशी दोन आत्मवाचक सर्वनामे यादव-मराठींत आलीं. 'आपण' मधील 'पण' हा अनुनासिकयुक्त षष्ठी विभक्तीचा अवशेष आहे. एकाच 'किम'पासून जशीं 'काइ' व 'कव्हण' ही सर्वनामें येतात, तसाच प्रकार येथेंहि आहे. पैकी प्रा० कुलकर्ण्यांच्या मते 'आपु' हे स्वतंत्रपणे न येता 'आपोआप,

---

१ Hemchandra : Prakrit Grammar, 3–68

२ J. Bloch : L'indo–aryen, pp. 202

३ हेमचंद्र, २–५१; वररुचि, ५–४५

४ मराठी भाषा–उद्गम विकास, पान ३४६

आपसुख' अशा शब्दांत येतें. परतु क्वचित् कोठें 'आपु'चा स्वतंत्र वापरहि आढळला. उदा०

"तेणे सवंतारेनि करी। **आपु** विश्व।"–ज्ञा० ७–१३२

"मनहि चंचल वादुके : नव्हेचि **आपु**"–ऋ० ३४१

'आपण' मात्र सरसहा वापरात आहे. त्याची रूपे—

"आपण, आपणयां, आपणेया, आपणयाहुनि, आपणेंआ" (वर्तमान मराठींत 'आमच' आणि 'आपल' यातील भेद स्पष्ट आहे. आमच (सं० अस्मत्) यांत ज्याशी बोलावयाचें त्याचा समावेश होत नाही व आपल (स० आत्मन्) यांत होतो. परंतु आत्मवाचक व पुरुषवाचक सर्वनामात यादव-मराठी क्वचित् घोंटाळा करते. उदा०

"म्हणौनि गूढपण आपुले मोडो। वरि न बोलणेहि बोलावे घडो।
परि **आमचिये** जीविचे पडो। तूझा जीविं॥"–ज्ञा० ९–३७

येथे 'आमचिये' हा वापर यथार्थ आहे. परंतु,

"किबहुना सहसा : **आपुला** स्नेहो नाहीं तैसा
उद्धवदेवा मज का जैसा : तुं पढियेसि।"–उद्ध० ८०६

येथें मात्र 'आमचा' हा अर्थ अभिप्रेत असून 'आपुला' वापरलें आहे)

२ सं० स्वतस् > म० स्वतौं, स्वतः–हे बहुधा आपणशी जोडून येतें.

## संकीर्ण सर्वनामें

१ एर–येर (< सं० इतर) : एरू, एरा, एरीं, एरासि–ते, एरे
२ सर्व (< स० सर्व) : सर्व, सर्वे, सर्वा–सि–ते
३ सकल (< सं० सकल) : सकल, सकलै, सकला
४ कित (< सं० कियत्) : कितां दीसा (सप्त०)
५ आणिक (<अप० अण्णेक < सं० अन्यएक) : आणिक–की–कें हे सर्वनाम 'दुसरे, निराळें' या अर्थी नित्य आढळते—

"**आणिकी** घागरी भरूनि आणिलें : तेंही रांजणिं घातलें।"
–स्मृ० १८५

"ना तरि साडौनि **आणिकी** धुरा : चातकु ए मेघाचेया द्वारा।"—उद्ध० ७२३

"कीं तो **आणिकींते** न साहे।" —ऋ० १९

"मग **आणिकी** भाडाचा **आणिकी** भाडा घाली।"–दृ० ६७

६ इखित ( < सं० ईषत् )—लीला० ३–२७

७ भलत ( ? ) : भलतेया, भलतेणे, भलतया

८ आनान ( < सं० अन्य + अन्य ) : "ऐसे भूतप्रति आनान"–ज्ञा० ७–३८

## संयुक्त सर्वनामें

यादव-मराठीत दोन सम वा विषम सर्वनामाचे सयोग होऊन त्यांना विशिष्ट अर्थ प्राप्त होतात. अशा जोड्या अपभ्रंशांतहि आढळतात. पुढें कांहीं रूपें व त्याचे विशिष्ट अर्थ देतों—

"तो **कांइएकी** वाचा वाणी : प्राकृत मी।"–ऋ० ३८९

"तवं तेथ **एकेएकु** ( = सर्व ) लोकु वेधला।"–स्मृ० १२०

"**एकमेकेंसीं**, एकमेकाते" ( < प्रा० एक्कमेक्क—हेमचंद्र ३१ )

"मग **एरएर** ( = दोघेहि ) गोसावीयाचेया दर्शना आले।" –ली० १–४६

"ऐसे **एरु** पुसे **एरु** पुसे।" ( = प्रत्येक ) –लीला० १–१२

"**एरीकडीचां पेरीकडी** घातली।" ( = इकडून तिकडे )–लीला० १–४३

"**येरयेरांचां** बोलना प्रहरु येकुपर्यंत—।" ( =एकमेकाच्या )–स्मृ० २२८

"**एकाधा एकु** उबगला म्हणे।" ( =एखाद दुसरा )–दृ० ५७

"**एकैकु,** एकाकी"–उद्ध० ६९, शि० १०७८

"**केतुलेयां एकां,** जेतुलेया एका।"

"जेयातें प्रमाणें नेणती : **तेणें तुवां** घेतली।" ( =त्या तूं ) –शि० ८०

# सार्वनामिक विशेषणें

१ ऐस, जैस, तैस कैस ( सं० एतादृश > प्रा० एआरिस > अप० एआइस > म० ऐस )

२ एतुल, जेतुल, तेतुल, केतुल ( 'केतुलेआं एकां काळा'—ली० ३) ( < प्रा० एत्तिअ, जित्तिअ... + 'ल' स्वार्थे )

३ एतुक, जेतुक, तेतुक, केतुक ( 'तेतुका सवै'—दृ० ९४ ) ( < प्रा० एत्तिअ + 'क' स्वार्थे )

४ एवढ, जेवढ, तेवढ, केवढ ( सं० एतावत् > प्रा० एआवड > म० एवढ )

५ एउत, जेउत, तेउत, केउत

६ एसण, जेसण, तेसण, केसण ( 'विश्वायेसने'–उद्ध० ६०१; तूं 'येसना'–स्मृ० ११५

७ अनारिस ( < प्रा० अण्णारिस < स० अन्यादृश )

८ जेतुल जेतुला, तेतुल तेतुला ( = जेव्हढा–तेव्हढा ) – दृ० १४

९ एसणाळ, जेसणाल, तेसणाल वगैरे ( 'ल' स्वार्थे. जसे, 'एसणाली फळे'–लीला० ३–३४ )

१० आपुल, आपुलाल, आपणाल ( = आपापल ), आपैसे, आपणवे. जसे, "आपणालेआ पैजा"—शि० ९१०

वरील सर्व सर्वनामाची चान्त रूपे होतात व त्यास शब्दयोगीहि लागतात. बहुधा शब्दयोगी लागण्याच्या पूर्वी सर्वनामाचे सामान्यरूप होतें. परंतु क्वचित् अविकृत प्रातिपदिकालाहि शब्दयोगी लागल्याची उदाहरणें आढळतात. पहा—

जेहूनि (लीला० ३–३४), तूं वाचौनि, तो वांचौनि (वच्छ० ४९), तीचा ( ऋ० १९१ )

---

१ "MIA केवड्ड"—J. Bloch: L'indo aryen, pp. 203

## § २७ संख्यावाचक सर्वनामें

( याचीं सामासिक रूपें कंसात देत आहें )

**एकु** < अप० एक्क < प्रा० एक्क–एग्ग < सं० एक

( सामासिक : एकैक, एकमेक )

**दोनि**[1] < अप० दुअ, बे, बिण्णि < प्रा० दोण्णि < सं० द्वि

( दुपहारी, दुपटें, दुफोडी, दुटी, दुणी, दोनिच्यारि )

**तिन्हीं** < अप० तइ, तिण्णि < प्रा० तिण्णि < सं० त्रीणि

( तिधार, तिवटना, तीथरी )

**चारी** < अप० चत्तारि < प्रा० चत्तारि < सं० चत्वारि

( चौदंत, चौमेरीं, चौकी, चौतोंडा, चौवारी, चौपुटी, चहुंमती, चौहातु, चौपाइ )

**पांच–पांचै** < अप० पंच < प्रा० पच < स० पंचन्

( पांचपुडें, पाचवटें )

**सहा, सा, साहै** < अप० छह < प्रा० छा < सं० षष्

( षदुऊर्मी )

**सांत–सांतै** < अप० सत्त < प्रा० सत्त < सं० सप्तन्

**आठ–आठै** < अप० अट्ठ < प्रा० अट्ठ < सं० अष्टन्

**नऊ–नव–नौ** < अप० णव < प्रा० नव < सं० नवन्

**दहा–दा** < अप० प्रा० < दह < सं० दशन्

**अकरा** < अप० एग्गारह < प्रा० एआरह < सं० एकादश

[2] ( राजवाडे 'अकरा' ची व्युत्पत्ति एकों ठिकाणी पुढीलप्रमाणें मानतात–पूर्ववैदिक—'एकअपरदशन्' > एआअरदशन् > एआरह > अकरा. त्याच्या मतें यात 'र' ची उपपत्ति नीट लागते. परंतु, पुराव्याच्या अभावीं ही व्युत्पत्ति मान्य नाहीं. )

---

१ " O is due to palatalization in the sk. form 'dvan' "
—S. M. Katre ( B. O. R. I. Vol. xx. part 1 )

२ भा० इ० सं० मं० वार्षिक, खिस्ताब्द १९१३

सर्व संख्या देण्याचें कारण नाहीं. राजवाडे[1] यानी समग्र याद दिली आहेच. पुढें फक्त वरील संख्याची काही विभक्तिरूपें देतों—

प्र० एकु–एके (पु०), एकी (स्त्री), दोणी, दो, दोघदोघी, तीं, तिघै, चौघचौघी (स्त्री०), पाचै, सातै, आठै.

तृ० एकें, दोघाइं, दोघी, तिहीं, चहूं, नवी, दाहे.

स० एकी, दो, तिही, चौ, पाचा, साता, नवा, दाहा.

वरील संख्यात व त्याच्या रूपात पुढील विशेष दिसतात—

(१) यादव-मराठीत एक, दोनि, तीनि, चारी, या चार संख्यांचीं व्ययी विशेषणे होत व ती तिहीं लिंगी चालत. मात्र असें होताना एकाला 'ल' आणि इतराना 'घ' स्वार्थे लागे. जसें, एकल–ला–ली, दोघ, तिघ, चौघ.

(सं० ग्रह–द्विग्रह > अप० घह > म० घ.........?)

(२) सं० एकादश > प्रा० एआरह > अप० एग्गारह > म० अकरा. या परंपरेंत सस्कृत–प्राकृतातील विशिष्ट 'ए' मराठीने सोडला व त्याजागी 'अ' असा आदेश केला. कोकणीने मात्र जुन्या 'ए' ला जवळ असणारा 'इ' कायम ठेविला आहे. (जसे, को० इकरा)[2]

(३) मराठी 'दोनि' या शुद्ध संख्येंत संस्कृतांतील मूळचा 'द' कायम आहे. सामासिक संख्येत मात्र तो 'ब' होतो.

जसें–सं० द्वादश > प्रा० अप० बारह > म० बारा

सं० द्वाविंशति > प्रा० बावीसइ > म० बावीस

क्रमवाचकामध्येहि हाच प्रकार होतो.

सं० द्वितीय > अप० बीयउ–दूयउ > म० बीज

(४) 'नवा' च्या संयुक्त संख्या 'एकोन' या संस्कृतांतील प्रयोगा-पासून सिद्ध होतात. जसें—

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पा० ६३–६९.

२ S. M. Katre : Formation of Konkani (B. O. R. I. Vol. xx part I.)

सं० एकोनविंशति > प्रा० एओणवीसइ > म० एकोणीस
गुज० ओगणीस

(५) १००० ही संख्या संस्कृत 'सहस्त्र'नें व्यक्त होते. फारशी 'हजार' या शब्दाचा संपर्क यादव-मराठीला अगदी नाही.

(६) क्वचित् '**सत्तीस**' (३६) असे रूप आढळतें. जसे—

"अभीनव सत्तीस दृष्टी : तरि सर्वांगें घेउनि आटी।"-उद्ध० ४५३

सं० षट्त्रिंशत् > प्रा० छठतीसइ > म० छ-सत्तीस

**म्हणजे प्राकृत**-अपभ्रंशातील 'छ'चा 'स' येथे विकल्पाने होतो. मंगलोरच्या आणि गोंव्याच्या किरिस्तावाच्या कोकणी बोलीत अनुक्रमे 'सोत्तीस' व 'शेतीस' अशी रूपे होतातें. तात्पर्य, 'छ-स'चा विकल्प वर्तमान मराठी-विसरली, परतु किरिस्तावांच्या कोकणींत तो जागा आहे.

## क्रमवाचक

**पहिल-वहिल** < अप० पहिलउ < प्रा० पढमिळ < सं० प्रथम हे कधीं काहीं विशेषार्थी वापरले जाते. उदा०

"तवं मनापासोनि **वहिला** : वारूं पालानिला।"–शि० ५११(= प्रिय)

"मेलिअे वो माअे...**वहिली** गे धाअे : बोलावी।"–शि० ८२९
( = पहिली, प्रथम )

"तन्हैं झडझडौनि **वहिला** निग। इये भक्तीचिये वाटे लाग।"
–ज्ञा० ९।५११

**दुज-दुसर-बीज** < अप० दूयउ-बीयउ < प्रा० बिइज्ज < सं० द्वितीय
< अप० प्रा० सर-अ

**तिज-तिसर** < अप० तइयउ < प्रा० तिइज्ज < सं० तृतीय
< अप० प्रा० सर-अ (हे रूप आवढी भाषेतहि आहे)[3]

---

१ H. Narayan Rao: "An Etymological Glossary of Southern Konkani", Part I (1917)

२ "Origin and Development of Bengali", Dr. Chatterji, pp. 700

३ Baburam Saksena: "Evolution of Awadhi"—pp. 156

( एका अति प्राचीन लोकगीतात ' तिनव्या ' असें रूप येतें. पहा-
" तिनव्या मासीं कंथाला ठाव ।
हळदीकुंकाची लल्लाटीं लेव "—पाळणा[1]
अर्थात्, हे मिथ्यानुकरण होय. " तिसनो " असे रूप क्वचित् कोंकणींत येतें. )

**चौथ** < अप० चउत्थ-चोत्थ < प्रा० चउत्थ < सं० चतुर्थ

**पांचव** < अप० प्रा० स० पंचम

क्वचित्, या क्रमवाचकाचा उपयोग पट दाखविण्याकडे केला आहे. जसे-

" उफाड जोड करीतु : **पांचविर्ये** धारे वावडतु । " (=पाचपट)
—शि० ५३४

याप्रमाणेंच पुढील रूपे होतात.

## अंशवाचक

पाव < प्रा० पाअ < सं० पाद

आड-ध < प्रा० अड्ढ < स० अर्ध ( " आधां दाती "— ह० ८२ )

पाऊण < प्रा० पाओण < सं० पादोन

सवाअ < प्रा० सवाअ < सं० सपाद (" सवाअे दुपहारी " -शि० ७२२ )

दीढु < प्रा० दिअड्ढ < स० द्वि-अर्ध ( दीढें, दीढां-सप्तमी )

( प्रो० दिवेटिया सं० अर्धद्वितीय पासून व्युत्पादितात[2] )

अढैच < प्रा० अड्ढइज्ज < स० अर्धतृतीय
( " पाहारा अढैचा "-ली० १-७६ )

आउठ < प्रा० अद्धुट्ठ < सं० अर्धचतुर्थ ( गुज० ऊठ )

---

१ म० सा० पत्रिका, वर्ष ६, अंक १

२ " Certain fractional numerals in Gujrati "—
N. B. Divatia, B. O. R. I. Vol. XII

## § २८ विशेषणें

यादवकालीन मराठीत विशेषणें विशेष्यनिघ्न व अविकृत **अशीं दोन्ही** आहेते. परंतु विशेष्यनिघ्नच फार. विशेष्याचे जें लिंग, **वचन**, विभक्ति तेंच विशेषणाचे असल्याचीं उदाहरणें पुढे देतो—

" जरि **माह्येरें श्रीमंतें** होति : तुम्हा ऐसी ।"–ज्ञा० ९–३
" **सबीजें तृणें** जैसी : सुलीने होति । "–ज्ञा० ९–१००
" भणौनि पूजावेया **पात्रता : बहुता** आति । "–ऋ० ३७४
" सर्वांसी **देवांगें चांगें** । "–धवळे उत्त० २५
" कढती **कढती आंबील** ।"–लीळाचरित्र १–२०
" **श्रीगणगाथा देवाचां** राउळीं । "–गोमातकी ताम्रपट इ० स० १३००
" जुंझता रणी शीगले : **शौरें घांई** मातले । "–शिशु० १०५६
" **सकळीं गोपाळीं** सहीतु । "–वच्छ० ४८७

**अशीं** अनेक स्थळें आहेत. विशेष्यनिघ्न विशेषणे वापरण्याची ही **लकब** तत्कालीन मराठीत इतकी मुरली होती, की क्वचित् विशेष्य अविकृत राहून **जाई व विशेषणा**लाच प्रत्यय वा शब्दयोगी लागे. याचा अर्थ हाच, की **विशेषणांचें विशेषणत्व** लोपून त्याना स्वतंत्र प्रातिपदिकांचे स्थान मिळाले होते. **उदा०**

" म्हातारी एकीचा पुत । "–लीळाचरित्र ११३५
" ब्राह्मणा एकाचेया घरासि । "–लीळाचरित्र ४०
" तेलिया एकाचेया घरा । "–लीळाचरित्र ११
" मी अवघेयामध्ये ग्रहोसि मुख्य नाएकु । "–लीळाचरित्र १९
( वरील दोन ठिकाणी अनुक्रमें चान्त व शब्दयोगी ही विशेषणाला लावली आहेत. )
" एथ होए मर्दना : स्वामी माझेया । "–ऋ० ४६४
" मागिलेसि अन्वयो कथा । "–ऋ० ६१३

---

१ हा गुण कांहीं प्रमाणांत सर्व इंडोआर्यन भाषांचा दिसतो, पहा—
J. Bloch : L'indo aryen pp. 183–189

याखेरीज वर्तमान व भूत कृन्दतें ही विशेषणासारखी वापरलीं जाऊन विशेष्यांप्रमाणेच चालतात. अशा विशेषणात्मक धातुसाधिताचा विचार कृदन्तप्रकरणात केला असल्याने पुनः येथे करीत नाहीं. अविकृत विशेषणाचीहि उदाहरणें देण्याचे कारण नाही. फक्त काहीं नामसाधित विशेषणें देतों :—

' **सेवाळलें** खडक, ' ' **देहलुतैलें** बालुक ' ( दृष्टान्त पाठ )

' **विखारा** सर्पिणी ' ( < सं० विषार: )–वच्छ० ४४९

## § २९ आख्यात विभक्ति

यादव-मराठीतील क्रियापदाच्या प्रत्ययप्रक्रियेचा विचार करण्यापूर्वी तत्कालीन धातूंचे उगम पाहिले पाहिजेत. संस्कृत धातु, प्राकृत धात्वादेश आणि देशी नामधातु यावरून यादव-कालीन मराठी क्रियापदें बनली आहेत. धातुसिद्धीचा हा भाग महत्त्वाचा होय. यास्तव मराठी धातूंची भिन्न भिन्न उगमस्थाने पुढें देतो :—

( १ ) **प्राकृत धात्वादेशाच्या द्वारा** : संस्कृत धातु प्राकृतभाषांत येताना त्याला आदेश होतात. हीच आदेश-प्रक्रिया पुढे चालवून प्राकृत–अपभ्रंश–मराठी या परंपरेने धातु सिद्ध होतात. यादव-मराठींत प्राकृत धात्वादेशाचे चार प्रकार आढळतात. ते असेः–

( अ ) मूळ संस्कृत धातु व त्याचे आदेश एकाच रूपाचे :

| सं० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|
| चलति | चलइ | चल्लइ ( कर्मणिद्वारा ) | चळणे |
| खादति | खाअइ | खाअइ | खाणें |
| चुंबति | चुंबइ | चुंबइ | चुंबणें |

येथे धातु तत्सम राहिल्याने आदेश असा नाहीच.

( आ ) आदेशप्रक्रियेच्या नियमानुसार होणारे :—

| | | | |
|---|---|---|---|
| पीडयति | पीलेइ | पिळेइ | पिळणें |
| अर्पयति | अप्पेइ | अप्पेइ | ओपणें |
| खिद्यते | खिज्जइ | खिज्जइ | खिजणें |
| घटते | घडइ | घडइ | घडणें |

१ प्राकृत व्याकरणांतील धात्वादेश : प्र० भों० कानिटकर. ( म० सा० पत्रिका वर्ष २, २ )

(इ) मूळ संस्कृत धातूच्या गणचिन्हासह आलेले :—

| गण | सं० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|---|
| ४ | नृत्यति | णच्चइ | णच्चइ | नाचणे |
| ५ | विचिनोति | विचिणइ | ... | वेंचणें |
| ७ | भिनत्ति | भिन्दइ | भिद्दइ | भेदणे |
| ७ | छिनत्ति | छिन्दइ | छिद्दइ | छेदणे |
| ९ | जानाति | जाणइ | जाणइ | जाणणे |
| ९ | गृह्णाति | गेण्हइ | घेण्णइ | घेणे |
| ३ | बिभेति | बीहइ | बीहइ | बिहणे (ज्ञा०) |

(ई) संस्कृत धातूंशी यत्किंचित्‌हि संबंध नसलेले आदेश :

| | | | |
|---|---|---|---|
| कथयति | बोल्लइ | बोल्लइ | बोलणे |
| भ्रंशते | चुक्कइ | चुक्कइ | चुकणें |

याची चर्चा पुढे आली आहे.

(२) **देशी धातु** : वररुचि आणि हेमचंद्र याच्या धातुपाठांत जवळ जवळ ४५३ धातु देशी आढळतात. परंतु हे प्राकृत वैयाकरण मात्र त्यांना तसे समजत नाहीत. ते धात्वादेश देतात ते असे :

| सं० | प्रा० | मराठी |
|---|---|---|
| मज्जति | बुड्डइ | बुडणें |
| विलपति | बडबडइ | बडबडणे |
| गवेषति | ढंढोल्लइ | ढाढोळणें |

वास्तविक या प्राकृत-मराठी धातूंचा संबंध संस्कृत धातूंशी आदेश-प्रक्रियेच्या नियमानें पोहोंचत नाही.[1] या संबंधीं प्रा० कुलकर्णी म्हणतात[2]—

"या आदशाचें शास्त्रशुद्ध स्पष्टीकरण म्हणजे हे संस्कृत धातु निराळे स्वतंत्र व पुढें आदेश म्हणून दिलेले प्राकृत धातु हे निराळे स्वतंत्र आहेत. त्यांचा परस्पराचा कांहीं एक संबंध नाहीं. कांहीं देशी धातु प्राकृतकालीं

---

१ Dr. Grierson : Prakrit Dhatvades (Memoirs Of Asiatic Society, Bengal, Vol. VIII, 2)

२ "राजवाडे मराठी धातुकोश", प्रस्तावना, पान २२–२३

वापरांत होते. ते कांहीं संस्कृत धातूंशी समानार्थक असल्यामुळें त्यांचा संबंध प्राकृत वैयाकरणानीं लावला इतकाच याचा अर्थ आहे."

( ३ ) **वैदिक धातु** : हे वैदिक धातु पाणिनीय धातुपाठात वा प्राकृत धातुपाठात नाहींत. मात्र वैदिक वाङ्मयात ते ज्या अर्थाने वापरले आहेत त्याच अर्थानें त्यांची अपभ्रष्ट रूपे यादव-मराठीत दिसतात. पुढें असे काही ज्ञानेश्वरीतील धातु देतो—

| ज्ञानेश्वरी | वैदिक |
|---|---|
| आवाक ( १३–४०३ ) | आ+वच् |
| गोगाव ( ९–१४ ) | ङ् |
| उगण ( ९–४०० ) | उत्तन् |
| उफल ( १३–५४० ) | उत्पल् |

नागलोकाच्या वैदिक भाषेचा अपभ्रंश आणि मराठी याच्यातील राजवाड्यांनीं दाखविलेल्या संबधाला हे वैदिक धातु बळकटी आणतात.

( ४ ) **नामधातु** :—यांची सविस्तर चर्चा पुढील भागात शब्द-सिद्धीच्या प्रकरणी आली आहे. ( पहा–प्रस्तुत प्रबंध– भाग ३, शब्दसिद्धि )

याखेरीज उपसर्गसहित, उपसर्गविरहित, ध्वनिधातु, द्विरुक्त, द्विधातु-संयोग वगैरे अनेक प्रकार मराठी धातूचे आहेत. परतु त्याची चर्चा धातु-पाठाच्या कक्षेतील असल्यानें येथे करीत नाहीं. शिवाय या विषयाचा साग व संपूर्ण परिष्कार प्रा० कुलकर्णी यांनी केलेला आहे.

## § ३० धातूंची प्रत्ययप्रक्रिया

संस्कृतातील क्लिष्ट व गुंतागुंतीची क्रियापद-प्रक्रिया हळूहळू लोपत जाऊन तिच्या जागी कृदन्तव्यवस्था प्राकृतात कशी आली याचें विवेचन प्रस्तावनेंत केले आहेच. प्रो० ब्लोकॅ यांनी प्राकृत–अपभ्रंश–वर्तमान आर्य भाषा या तिहींतील आख्यातविभक्तीचा विचार विस्तारानें केला आहे व

---

१ राजवाडे : राधामाधव-विलासचंपू—प्रस्तावना ,पान १५८–६०

२ " राजवाडे मराठी धातुकोश " प्रस्तावना

३ J. Bloch : L'indo aryen, pp. 237 ff.

त्याचा उपयोग एतत्प्रकरणी बराच आहे. हा इतिहास पाहून यादव-मराठींतील क्रियापदांची व्यवस्था खालीलप्रमाणें करावीशी वाटते.

१ प्रत्ययी : Synthetical or Verbal
२ कृदन्तसाधित : Participial or Nominal
३ संयुक्त : Compound

पैकीं प्रत्ययी व कृदन्तसाधित रूपे परपरागत असून सयुक्त रूपे मात्र मराठीनें सर्वस्वी नवीन बनविली. हीं तीन तऱ्हांचीं रूपे सिद्ध होण्याच्या आधीं मराठींतील धातु पुढील तीन मार्गांनी प्रत्यय घेण्यास तयार होतात. यानाच प्रो० ब्लोक Themes ही संज्ञा देतात.

१. **वर्तमान कर्तरि पासून** : हा पहिल्या म्हणजे प्रत्ययी रूपाच्या बाबत वापरला जातो. उदा० बैस, जा, खा, लाह, पाह

२. **वर्तमान कर्तरि कृदन्तावरून** : पाविज, असिज, म्हणिज

३. **भूत कर्मणि कृदन्तावरून** : काढ, धाड, सुक, जिंत, दुभ, < सं० कृष्ट, धृष्ट, शुष्क, जित, दुग्ध

पुढें यादव-मराठींतील प्रत्ययी आख्यातविभक्ति देतो—

## § ३१ वर्तमाने लट्

लट्च्या मराठीतील प्रत्ययाची प्रक्रिया पुढील प्रमाणे :—

एकवचन:

| | सं० | | प्रा०[2] | | अप०[3] | | या० मराठी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | आमि | > | मि | > | उं-मि | > | एं-इं |
| २ | असि | > | सि-से | > | हि-सि | > | असि-इसि |
| ३ | अति | > | इ-ए | > | इ | > | ए-इ-ऐ |

१ J. Bloch: La Langue Marathe, 225 ff
२ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण, ३-१३९
३ ,, ,, ,, ४-३८२

अनेकवचन :

| | सं० | प्रा० | अप० | या० मराठी |
|---|---|---|---|---|
| १ | आमः | > मो–मु–म | > हुं–मो | > उं–ओ |
| २ | अथ | > इत्था–ह | > हु–ह | > आ–आ |
| ३ | अन्ति | > न्ति–न्ते | > हि–न्ति | > अति–इति |

यादव-मराठींतील रूपें[1]—

एकवचन :

१ यें, जाय, उठी, बैसे, गाय, वाय, जीणे, आणै

२ फेडिसी, होसि, रीगेसी

३ असे, आथि, नोहे, दे, गणी, उजिडे, पीये, ल्ये

अनेकवचन :

१ नेणो–णौ, जाणौं, स्मरौं

२ हसा, नेणा

३ असेंति, पांती, सूति, साधैति, भणेती, देखैंती, नाचेती, ल्हाति, साधैति, चाखेति

टीका—

(अ) ही सर्व रूपे अपभ्रंशातून सहजच सिद्ध होतात. अपभ्रंशातील[1] कांहीं रूपें पहा—

१ करउं, कहउं, जिणमि, अवयरहुं

२ होसि, जाणहि, हिंडहि

३ कहइ, भमइ, जिणंति, लब्भंति

म्हणजे अपभ्रंशातील लट्च्या रूपाशी मराठीतील रूपाचा साधा नीट जुळतो. "लट्मध्यें मराठीने अपभ्रंशाला सोडून महाराष्ट्रीचे जास्त अनुकरण केलें आहे,"[2] हें राजवाड्याचें म्हणणें अयुक्त होय.

(आ) "मानी, धरी, संहारी" या रूपात 'इ' हा आगम आहे, व

१ णायकुमारचरिउ, प्रस्तावना, पान ५४

२ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ७७

" भिये, पाहे, जुझ " या रूपात तो नाहीं. इडागम घेणारे व न घेणारे असा भेद साहजिकच पडतो. परंतु या भेदाचा संस्कृतातील सेट्–अनिट् या भेदाशीं मुळींच संबंध नाही. राजवाडे म्हणतात—

" हा इडागम घेण्याचा, न घेण्याचा किंवा विकल्पानें घेण्याचा गुण मराठीने महाराष्ट्रीपासून घेतला आहे. "

हे मान्य करूनहि त्यांनी ' सेट् ' व ' अनिट् ' ही नावें धातूंना दिलीं आहेत ती अयुक्त होत. बीम्स या इडागमाची उपपत्ति संस्कृत प्रयोजक प्रत्यय अय् पासून लावतो, ती समाधानकारक नाही. तसेच राजवाडे मराठीत परस्मैपद व आत्मनेपद हे संस्कृतातील भेद मानतात. वास्तविक हे भेद प्राकृतातच लोपले होते. अपभ्रंशातहि ते नाहीत. अर्थात् मराठीतहि ते नसावेत. राजवाड्यानीं दिलेलें

" तिये मुकुटी कुसुमे सुगंधे । शोभते भली ।"–ज्ञा० १–१८

यातील ' शोभते ' हे आत्मनेपदी रूप चित्य आहे. शोभती असेच रूप नित्य आढळते. ' शोभते ' हें अपवादात्मक होय.

( इ ) वर्तमान मराठीत या ' लट् ' ला रीतिभूताचा अर्थ येऊन बसला आहे. ज्ञानेश्वरकाली सुद्धा ' लट् ' हा वर्तमानच दाखवी असे नाहीं. संदर्भानुरोखाने त्याचे वर्तमान, भूत व भविष्य असे तिन्ही काळाचे अर्थ होत. उदा०

**वर्तमान :** " तूं अनुचिता चित्त **नेंदिसि** । धीरु कहि न **संडिसि** ।"—ज्ञा० २–८

" जेयांचे ज्ञान विषो **नेणे** । जाणिवा मजचि एकातें **जाणें**" —ज्ञा० ९–४४३

" आम्हीं तयांचा तोडी कुरंधनें **पोळूं** ।"—स्मृ० २

**भूत :** " मग संजयो **म्हणे** रायाते ।"—ज्ञा० २–१

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ७७

२ Beames : Comparative Grammar, part III Ch. 2

३ हेमचंद्र : प्राकृत व्याकरण, ३–१३९

"तंव भीमकी **भणे** : पहा वो तवं याचें बोलणे ।"

—शि० २०५

**भविष्य :** "एथ कौमारत्व **दिसे** । मग तारुण्ये ते **भ्रंशे** ।"

—ज्ञा० २–१०९

"एणें करुनि समस्ता । परितोखु होईल देवतां ।
मग ते तुम्हा इच्छिता । अर्थाते **देति** ।"—ज्ञा० ३–९५

वरील ठिकाणी रूप लट्‌चेच आहे परंतु अर्थ मात्र भिन्न आहेत. प्रो० ब्लोकच्यो मतेहि लट्‌चा मूळ अर्थ यादव-कालीच डळमळित झाला होता.[1] लट्‌नें दाखविल्या जाणाऱ्या काळाची ही विविधता, म्हणजे पर्यायानें अनिश्चिति ध्यानात घेऊन डॉडेरेट त्याला Aorist ही संज्ञा देतो.[2] वर्तमान मराठीतील रीतिभूताला एक वेळ ही संज्ञा लागेल. परंतु यादवकाळी लट् हा विशेषत. वर्तमानार्थीच वापरला जात असल्याने त्याला Aorist किंवा Historic Present म्हणण्याऐवजी 'लट्' म्हणावे हेच अधिक युक्त. त्याच्या अर्थविकृतीला तेव्हा नुकता आरंभ झाला होता. अद्यापिहि हा लट् मूळ अर्थाने काही म्हणीत दिसतो. उदा०

"फुटले मोती, तुटले मन, साधू न **शके** विधाता ।"
"ज्याची **लागे** चाड, तो **उडे** ताडमाड ।"

(ई) 'लट्'चे प्रथमपुरुषी एकवचनी व अनेकवचनी प्रत्यय अनुक्रमे 'एं–इ' आणि 'उ–ओ' असे आहेत. कोंकणीत ते 'आ' आणि 'आउं' असे आहेत. कोंकणीतील हे प्रत्यय अपभ्रंश 'आमि–आमो' यापासून व्युत्पादिता येतात. पंजाबी आणि सिंधीमध्येंहि हा प्रत्यय 'आं' असाच आहे व त्याची परंपराहि अशीच. तेव्हा पंजाबी, सिंधी व कोंकणी यातील प्रथमपुरुषी प्रत्ययावर प्रथमपुरुषी सर्वनामाचा–'हउं' चा परिणाम झाला असावा. सर्व प्रत्ययाची बीजे सार्वनामिक आहेत या विधानाला

१ J. Bloch: La Langue Marathe, 237
२ W. Doderet, B. S. O. S. Vol. IV

वरील उपपत्तीनें बळकटी येते. मराठीनें मात्र या सार्वनामिक बीजावाचून अपभ्रंशद्वारा हे प्रत्यय सिद्ध केले. यासंबंधी लुई ग्रे[१] यांचें विवेचन योग्य आ

## § ३२ आज्ञार्थे लोट्

लोट्च्या मराठींतील प्रत्ययाची प्रक्रिया पुढील प्रमाणें :—

| एकवचन | सं० | प्रा० | अप० | मरा |
|---|---|---|---|---|
| १ | आनि | मु | ... | उं |
| २ | ... | सु, इज्जसु, इज्जे, हि. | अ, इ, उ, ए, सु, हि | एं, इं, |
| ३ | तु | उ | उ | ओ |
| **अनेकवचन** | | | | |
| १ | आम | मो | ... | ... |
| २ | त | ह | हु | आ–आं |
| ३ | अन्तु | न्तु | अतु | ओतु–अतु |

यादव–मराठींतील रूपे :

**एकवचन :** १ ......

२ जाये, खाये, पूस, रीगै, धावै, देखै, आइके, देई, जाण घे, पाहे

३ असो, येवो, यो, हो

**अनेकवचन :** १ मानों, जावों, देवों,

२ आइकां, परिएसा, देआं, घेया, भुंजा, पाहा–पा

३ सांगतु, होंतु, पाळितु, पातु

**टीका—**

( अ ) प्रथमपुरुषी एकवचनी लोट्ची रूपें आढळत नाहीत. राजव आपल्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणात (पा० ८० ) जीं देतात ती काल्पनि असावींत. कोंकणींतहि एकवचनी रूपे नाहीत. मात्र मॅफे[३] आपल

---

१ Louis H. Gray : Observations on Middle Indi Phonology, B. S. O. S. Vol. VIII

२ S. M. Katre : Formation of Konkani, B. O. R. Vol. xx. pp. 161

३ Father Maffei : A Konkani Grammar, 1882

कोकणीच्या व्याकरणात ती देतो. अपभ्रंश-ग्रंथांतहि एकवचनाची रूपें दिसत नाहीत. अनेकवचनाचीं विरल आहेत. उदा० "पुंजह, उथ्थलहं, घल्लहं" (भविसयत्तकहा). 'णायकुमारचारिउ' मध्ये ही सुद्धा नाहीत. अर्थात् यादव-मराठीत एकवचनी रूपे नाहीत हें बरोबरच आहे.

(आ) लोट्च्या तृतीयपुरुषी एकवचनात क्वचित् आशीर्लोट् व क्वचित् इच्छार्थ प्रकट होतो. आज्ञार्थाच्या या छटा होत. उदा०

"अनव्रता भूतर्ळा। **भेटोतु** भूता॥"–ज्ञा० १८–१७७५

"ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे **होंतु**॥"–ज्ञा० १८–१७७७

"मग कर्मेंद्रिये व्यापारीं। **वर्त्ततु** सुखे।"–ज्ञा० ३–७६

## § ३३ भूते लङ् (Imperfect)

| एकवचन | म० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|---|
| | आसम् | आसि | आसि, अगम | असे |
| | आसी: | आसी | आसि | असस |
| | आसीत् | आसि | आसि | असे |
| अनेकवचन | | | | |
| | आस्म | आसीमो–मु | आसि | असो |
| | आस्थ | ... | ... | असा–असा |
| | आसन् | ... | ... | असत |

यादव-मराठीतील रूपे

"पळतु पळतु **पाचारी**: एके हाते नीरी **धरी**।"–शि० १४३

"एकु वेळु मणिकर्णिकेसी **असें** जपतु।"–शि० १३८

"आरोगण जालेयाविण स्त्री **जेवी** ना।"–ली० १–१५

"याहासि तुम्ही अन्न **घालां**।"–वृद्धा० २१

"तै आम्ही **नसों** ऐसी चिन्ता। प्रतीति तुज।"–ज्ञा० ४–४०

**टीका:**

(अ) यादव-मराठीने या काळाचीं रूपे महाराष्ट्री–अपभ्रंशद्वाराच, परंतु अधिक प्रमाणावर घेतलीं. वास्तविक प्राकृतांत हा भूतकाळ जवळ जवळ लोपला होता. प्राकृतांत यापेक्षा निष्ठान्तप्रयोगानीं म्हणजे कृदन्तांनींच

भूतकाळ अधिक व्यक्तविला जाई. हेमचंद्रहि या ' लङ् 'ची विशेष चर्चा करीत नाहीं. शिवाय, ' अस् ' चीं ' आसि ' आणि ' अहेसि ' अशीं रूपें ' लङ् ' चीं सर्व पुरुषी, सर्व वचनी होतात असेंहि हेमचंद्र सांगतो. पहा—

> " अस्तेर्धातोस्तेन भूतार्थेन प्रत्ययेन सह आसि अहेसि इत्यादेशौ भवतः । आसि सो तुमं अहं वा । जे आसि । ये आसन्नित्यर्थः । एवं अहेसि ॥ " प्राकृत व्याकरण, ३–१६४

अपभ्रंश ग्रंथातहि ' लङ् ' चीं रूपे अति विरल आढळतात. उदा०

> " तहु आढत्तु आसि । "—भविसयत्तकहा ९–१४–६
>
> " आसि खलु देवरु तहुं । "—भविसयत्तकहा ७–१०–५
>
> " आसि रिसिहि वक्खाणियउ । "–णायकुमारचरिउ ६–८–११

' अगमं ' असे एक रूप भविसयत्तकहामध्ये येते. परतु एकंदरीत अपभ्रंशात भूतकाळ कृदन्तानीच व्यक्त होई. यादव-मराठीत मात्र लङ् प्रचारात दिसतो. अर्थात् लङ्चें स्वरूप अपभ्रंशद्वारा, परतु वापराचे प्रमाण मात्र स्वतंत्र रीत्या मराठीने योजिले.

( आ ) लङ् पुढे असता, संस्कृतात धातूंच्या मागे जो ' अडागम ' होतो, तो मराठीत होत नाही. प्राकृतातहि विकल्पानेच होई. जसे—

सं० अग्रहीत् > प्रा० गेण्हिअ–अगेण्हिअ > म० घेई

यामुळे लट् व लङ् यांची रूपे सारखीच दिसू लागून ' तो म्हणे ' याचा अर्थ म्हणतो व म्हणाला असा द्विविध होऊ लागला.[1] याच कारणाने पुढें हे दोन्ही लकार लोपून त्याऐवजी कृदन्तेच वापरात आली असावीत. रूप एकच परंतु अर्थ दोन ही तऱ्हा भाषेला खपत नाही. या रूपसादृश्यामुळे कृष्णशास्त्री गोडबोले, बीम्स आणि होर्न्ले हे ' लङ् ' ला ' लट् ' मानीत. ' लङ् ' चीं रूपे व त्याची उपपत्ति शोधण्याचे श्रेय सर्वस्वी राजवाड्यांकडे जातें.

## § ३४ भूते लुङ् ( Aorist )

' लुङ् ' ची रूपें प्राकृतात नाहींत, अपभ्रंशात नाहीत. अर्थात् यादव-

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ८०–८२

मराठींतहि ती नसली तर नवल नाहीं. राजवाडे मात्र 'होता' हें रूप लुङ्चें मानतात. उदा० "तो वैवस्वतु जैं **होता**।"–ज्ञा० तसेच "मी असे त्याची **होती** : ऐसे जाणवा शारंगपाणी।"–ध० पू० १३ हे रूपहि मग 'लुङ्'चें मानावें लागेल. राजवाडे याची उपपत्ति अशी लावतात—

सं० अभूत् > (अर्धमागधी) होत्था > म० होता.

ही व्युत्पत्ति पांडित्यप्रचुर, परंतु कृत्रिम आहे. एक तर 'लुङ्' सारखा अतिक्लिष्ट प्रकार भाषेच्या सुलभीकरणात राहणे शक्य नाही. दुसरे, तो महाराष्ट्रीत, अपभ्रंशात नसताना मराठीतच कोठून येणार? तिसरे, 'होता-होती-होते' अशी तिन्ही लिंगी रूपे फिरतात त्याची वाट काय? राजवाड्यानीं याचे केलेले समर्थन पुरेसे नाहीं. एतावता 'लुङ्' चा मागमूसहि मराठीत नाही हेच खरे.

## § ३५ भूते लिट् ( Perfect )

लुङ् प्रमाणेच लिट्ची अवस्था आहे. 'लिट्' प्राकृत-अपभ्रंशात नाही. यादव-मराठीत अर्थात् नाहींच. राजवाडे मात्र स० अस् > म० 'आह धातूचे 'आहा' हे रूप 'लिट्'चे मानतात. त्यानी दिलेले उदाहरण .

"तो विश्वासे मारिता रिपु। निवटूनि घातला दर्पु।
आणि जेयाचा **आहा** कपु। तापसासि॥"–ज्ञा० १८–१०५१

असेच एका महानुभाव ग्रथातील रूप पहा—

"न लगता काळाचे पागे। एकें सदैवु **आहाति** ऐसे।"
–ऋ० ४३३

परंतु ही रूपे लिट्ची निःसंशय नव्हत. ती लट्ची–वर्तमानाची–अपवादात्मक रूपें आहेत. वरील 'लुङ्' ची चर्चा येथेहि लागू आहे.

## § ३६ लेट् संकेतार्थे ( Conditional )

'वैदिक लेट्' संस्कृतातच लुप्त झाला. अर्थात् तो प्राकृत–अपभ्रंश–मराठी यात नाही.

## § ३७ विधिलिङ् ( Optative )

एकवचन

| | सं० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|---|
| १ | ईयम् | इज्ज | ... | इजे |
| २ | ईः | इज्ज, इज्जसु | इज्ज, इज्जहि | इजे, इजसु |
| ३ | ईत् | इज्ज, इज्जइ | इज्जइ | इजे |

अनेकवचन

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | ईम | इज्जम | ... | इजे |
| २ | ईत | इज्जह | इज्जहु | इजे |
| ३ | ईयुः | इज्ज | इज्जइ | इजे |

अपभ्रंशातील रूपें:—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| २ | अच्छिज्जहि, करिज्जहि, होज्जहि, सुप्परिज्जहि कासिज्ज | अच्छिज्जहु, करिज्जहु |
| ३ | किज्जइ, दिज्जइ | भिज्जइ |

( भविसयत्तकहामधील )

यादव-मराठींतील रूपे :-

१
२ } पुसिजे, कीजे, दीजे, वाचिजाये, पाडिजाये,
३ लेइजे, खेळिजे, सिपिजे, होइजे

**टीका :**

( अ ) यादव-मराठीत तिन्ही पुरुषी व दोन्ही वचनी एक 'जे'कारान्त रूपच आढळतें. त्याअर्थी 'इज' हा प्रत्यय सर्वत्र आहे यात शंका नाहीं. संस्कृतांतील विध्यर्थातील 'य' पासून तो निघाला. परंतु यादव-मराठींतील विधिलिङ्वर संस्कृतातील कर्मणि 'य' प्रत्ययाचीहि छटा आहे. प्राकृतांतहि धातूचें इज्जन्त रूप होऊन त्याला वर्तमानाचे प्रत्यय लागून विध्यर्थ बनतो. हेमचंद्राचें पुढील सूत्र पहा—

"सप्तम्यादेशात् ज्जात्पर इर्वा प्रयोक्तव्य : । भवेत् होज्जइ । होज्ज ॥"
३-१६५

म्हणजे प्राकृतातहि विध्यर्थी 'य' व कर्मणि 'य' या दोहींचे अवशेष दिसतात. शिवाय तिन्ही पुरुषीं व दोन्ही वचनी लिङ्ची रूपे सारखीच आहेत, त्याअर्थी त्यात कर्मणि 'य' चा अंश असलाच पाहिजे. 'लिङ् कर्तरि' व 'लोट् कर्मणि' यांचे अर्थ पुष्कळ जवळ आहेत. एतावता, त्या दोहीचा समन्वय करून यादव-मराठी कर्मणि लिङ्ची 'जो' कारान्त रूपें बनविते. या रूपात वास्तविक आज्ञार्थापेक्षा विध्यर्थाचाच भाव अधिक आहे. असे असूनहि राजवाडे[१] त्याची गणना कर्मणि लोट्मध्ये करितात, ते चिन्त्य होय. यादव-मराठीतील विध्यर्थात विध्यर्थी 'य' आणि कर्मण्यर्थी 'य' अशी दोन बीजे कशी आहेत ते पुढील उदाहरणावरून दिसेल.

" तोहि वीकुनि **जीजे** : या परते पाप नाहीं । "–उ० ४०५

" वऱ्हाडें बीजे **कीजो** . .. । "–ध० पू० ४५

" तेणे म्हणितले : यैसे सामोरे **येइजो** । "–स्मृ० २०४

" ते **वाचिजो, दीजो, खेळिजो** । "–ली० १–५

" ऐसियापरी **असीजो** गा दे मती । "–द० ५४

वरील ठिकाणी कर्मण्यर्थाप्रमाणेच विध्यर्थहि स्पष्ट आहे. संस्कृतातील विध्यर्थ व कर्मणि आज्ञार्थ याच्या समन्वयाने मराठीने स्वतंत्र विध्यर्थ सिद्ध केला व साहजिकच त्यात दोहीची बीजे आहेत. ती एकाच स्वरूपाची (य) असल्यामुळे वेगळी भासत नाहीत, इतकेंच. वास्तविक ती भिन्न होत. बीम्स व राजवाडे दोघानीहि विधिलिङ्ची उपपत्ति एकागी लाविली आहे. वस्तुत : असें दुहेरी निर्वचन केल्याखेरीज गति नाही. डॉ० भाडारकर[२] मात्र विध्यर्थात कर्मणीचा अंश असल्याचा उल्लेख करितात. परंतु, त्यांचें म्हणणें सुस्पष्ट नसून एकंदरींत गुंतागुंतीचें झालें आहे.

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ८७

२ Wilson Philological Lectures, pp. 215–216

## § ३८ भविष्ये लुट् First Future.

हा लुट् प्राकृत-अपभ्रंशांत नाही. अर्थात् मराठीत तो नाहीच. राजवाडे तो ज्ञानेश्वरीत भविष्यार्थी व वर्तमान-मराठीत संकेतार्थी आहे असे म्हणतात. हें त्याचे म्हणणें ऐतिहासिक दृष्ट्या व भाषाशास्त्रदृष्ट्या सर्वस्वीं चुकीचे आहे.

१ सं० तास्मि > म० ताहे        २ सं० तास्मः > म० ताहों
३ सं० तासि > म० ताहासि      ४ सं० तास्थ > म० ताहा
५ सं० ता > म० ता              ६ सं० तारः > म० ते, तेति

अशी व्युत्पत्ति लावून संस्कृतातील 'लुट्' पासून मराठीतील हा भविष्यकाळ निघाला असें राजवाडे मानतात. राजवाड्याचे विवेचन रूपदृष्ट्या व उपपत्तिदृष्ट्या अशास्त्रीय होय. एक तर यादव-मराठीतील ही रूपें भविष्यकाळाची नाहीत, ती संकेतार्थाची आहेत. हा संकेतार्थ मराठी वर्तमान कृदन्ताला 'हो' धातूची रूपे जोडून बनविलेला आहे, हे मी पुढे दाखवितोंच. (पहा, क्र० ५२) शिवाय हा लुट् महाराष्ट्री-अपभ्रंशात नसताना मराठींतच एकदम कोठून प्रकट झाला? आणि संस्कृत लुट्पासून मराठीतील रूपें निघती तर त्याना लिंगविकार का होते? या प्रश्नांना राजवाड्याच्या उपपत्तीत उत्तरें नाहींत. त्याच्या अनुयायानीहि वरील शंका न घेता यादव-मराठीत लुट् होता असेंच मानले आहे. चिं० वि० वैद्यानी राजवाड्याचे लुट्संबंधीचे विवेचन मान्य करून फक्त "लुट् आहे, परतु हेतुहेतुमद्भावी आहे" एवढीच टीका त्याजवर केलेली आहे. वास्तविक लुट् हा भविष्यार्थी वा संकेतार्थी कोणत्याच रूपात मराठीत नाहीं. भाषाशास्त्रदृष्ट्या राजवाड्याच्या उपपत्तींतील मुख्य अडचण अशी, कीं संस्कृतात 'कर्तृ' या नामाला 'अस्' ची रूपें जोडली जातात तर मराठीत 'करित' याला 'हो' धातूची रूपें जोडली जातात. असा फरक का पडावा?

सं० कर्तास्मि > म० करिताहें

हें रूप कसें सिद्ध होईल? एवंच राजवाड्यांची उपपत्ति इतिहासाला व

---

१ ज्ञानेश्वराचें व्याकरण, पान ८३–८४
२ निबंध आणि भाषणें, पान १३९

शास्त्राला धरून नसल्यानें त्याज्य होय. या रूपाचा विचार मी पुढें क्र० ५२ मध्यें करीत आहें.

## § ३९ भविष्ये लट् ( Second Future )

| एकवचन | स० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|---|
| १ | स्यामि | स्सामि–हामि–हिमि | एसमि | ए–इं–उं |
| २ | स्यसि | हिसि–हिसे | एसहि | असि–इसि |
| ३ | स्यति | हिइ–हिए | एसइ | इ |
| अनेकवचन | | | | |
| १ | स्यामः | स्सामो, हामो | एसमो | ऊ–ऊनि |
| २ | स्यथ | हिह–हित्था | एसह | आ |
| ३ | स्यन्ति | हिन्ति–हिन्ते | इहिंति | अति–इति |

**टीका**:—

( अ ) लट्ची रूपे वर्तमान लट्सारखी दिसतात. तेव्हा राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे " दोहोतील भेद दाखविण्याकरिता मराठीनें लट्च्या रूपाना 'ल' स्वार्थे प्रत्यय विकल्पाने लाविला. विकल्पाने लावला म्हणण्याचें कारण की, 'ल' प्रत्ययाखेरीज लट्ची रूपे सापडतात. शके ११२८ तील पाटण शिलालेखातील 'उघटे' व 'वाहति' ही रूपे 'ल' प्रत्ययाखेरीज 'लट्'चीं आहेत." यादव-मराठीत 'लट्'ची रूपे खालीलप्रमाणे आढळतात:—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| १ | असैनु, झोंबेनु, जीतुं, वाणु, मेळउं, ले, घें, जिणे, भाऊ, सूं, देइल, एइल | करो, गिळौ, रागौं, यों, लाहों, टाकूनि, जाऊनि, नेंदूं, त्यजौनि |
| २ | देसी, होसी, वाचसी, जीसील, साहासी | कराल, जाणाल, होआल, असा |
| ३ | ठाके, घडे, जाये, करी, पडैलु, वसैलु, तुटैलु, सोये, ये, होए | करिती–ल, जाणिती, होतील |

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ८५

पैकी, राजवाडे प्रथमपुरुषी एकवचनी 'उं' कारान्त रूपे मानीत नाहीत. पण महानुभावात ती अनेक आढळतात.

( आ ) प्रथमपुरुषी अनेकवचनी 'राहूनि, त्यजौनि, साधौनि' अशी रूपें आहेत. ती भूत कृदन्तासारखी वाटतात, परंतु तशी नाहीत. महानुभाव गद्यात तर ती हरघडी दिसतात. त्याची उपपत्ति अशी :—उं > ऊन > ऊन + 'इ' ( पादपूरक ). याचा उल्लेखहि राजवाडे करीत नाहीत. पुढे या रूपाची विविध उदाहरणे देतो—

"आम्ही पूर्णकाम **होउनि** ( = होऊ )। जरि आत्मस्थिती **राहुनि**।"–ज्ञा० ३।१४

"ते वस्तु मज स्वामी। एकीहेला दिधली तुम्ही।
हे बोलो म्हणतो तरि आम्ही। तूं **पाहूनि** कैचे ॥" –ज्ञा० ११-४८

"तरि **सांधौनि** ( = साधूं ) ज्ञान सहज। विज्ञानेसीं ॥"–ज्ञा० ९-४२

"आम्ही प्रेमाचा कडलगी : **ठाकौनि** ( = ठाकूं ) कैवल्यदुर्ग ॥" –उद्ध० १६५

"त्या आशावाचौनि जीविता : ना तरि **त्यजौनि** ( त्यजूं ) प्राणांते॥" –स्मृ० ११४

"तयापासि चला : मा तयाकरवि **सांघउनि**।" ( = साघवूं ) –वृद्धा० १६

"तेही म्हणितले ना आम्हीचि **बोलाउनि**।" ( = बोलावूं ) –ली० १-३०

"आम्ही ( गोरुवे ) **बांधौनि** : आम्ही **दोहौनि**"।—ली० १-४०.

हा 'ऊनि-औनि' प्रत्यय म्हणजे केवळ एक उच्चारप्रक्रिया आहे.

( इ ) बीम्से या काळाचे प्रत्ययी स्वरूप केवळ गुजराती व हिंदी भाषापुरते मानतो. मराठीत ते नाही हे त्याचें मत चूक होय. डॉडेरेटच्या मतानें हा भविष्यकाळ प्रत्ययी नसून सामासिक आहे व लटूच्या रूपानाच 'ल' प्रत्यय लागून भविष्यार्थ साधला आहे. ब्लोकचें मत काही अंशी

---

१ Beames: Comparative Grammar, Vol. III pp. 112

२ B. S. O. S. Vol. IV

३ La Langue Marathe, 240

असेंच असून त्याने 'ल' ची उपपत्ति 'सं० लाव्-ले' पासून लावण्याचा यत्न केला आहे. चि० वि० वैद्यानी बीम्सच्या मताचाच अनुकार केला आहे. प्रा० कुलकर्णीहि या भविष्यकाळाची उपपत्ति लट्पासूनच लावतात. ते म्हणतात: "जुन्या वर्तमानकाळाला भविष्यकाळाचा अर्थ प्राप्त झाला आहे." ही सारी मते एका बाजूला आणि राजवाड्याचें दुसऱ्या बाजूला अशी स्थिति आहे. परतु संख्येने अधिक असली तरी पहिली मते भ्रात होत. एक तर, ल-सहित व ल-विहीन अशी दोन्ही रूपे भविष्यकाळाचीं आढळतात. तेव्हा हा 'ल' स्वार्थे होता व तोहि वैकल्पिक होता हे निश्चित. आता ज्या रूपात 'ल' नाही तीं लट्ची मानून त्याना भविष्यार्थ कल्पिणें काहीना प्राप्त होतें. म्हणजे 'लट्' हा एकच काळ वर्तमान व भविष्य दोन्ही दाखवी असें म्हणावे लागेल. परिणत स्वरूपात असणाऱ्या यादव-मराठात हे केवळ अशक्य होय. दुसरे, लट्ची उपपत्ति मानली तर 'साधौंनि' (साधूं), 'त्यजौनि' (त्यजूं) या प्रथमपुरुषी रूपाची वाट काय लावणार? डॉ० कात्रे भूतकृदन्त 'ऊनि' याची छटा वरील रूपात असल्याचे सुचवितात. म्हणजे भूताला भविष्याचा अर्थ कल्पावा लागतो. तात्पर्य, वर्तमान, भूत व भविष्य या तीन काळांची भेसळ केल्याखेरीज वरील मताचे समर्थन होऊं शकत नाही. तिसरे, राजवाड्याचे म्हणणे अपभ्रंशातील 'लट्'ची रूपे पाहून अधिकच पटते. अपभ्रंशकाव्यात—

| | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| १ | परिसेणमि | वज्जरिसु-मो |
| २ | पेक्खेसहि, जाएसहि, होसहि | तरेसहं, देसहं |
| ३ | कीलेसइ, जणेसइ, लेसह | करिहिति |

अशीं रूपे 'णायकुमारचरिउ' व भविसयत्तकहा' मध्ये आढळतात. म्हणजे मराठीतील 'लट्'ला परंपरा आहे, इतिहास आहे. अपभ्रंशातील रूपावरून मराठी रूपें सहज सिद्ध होतात. तात्पर्य 'मराठी लट्' हा संस्कृत-महाराष्ट्री-

१ निबंध आणि भाषणें, पान १३९

२ मराठी भाषा, उद्गम-विकास, पान ३६७

३ Formation Of Konkani, B. O. R. I. Vol. xx pp. 162

अपभ्रंश या परंपरेनेंच निघाला. अपभ्रंशात ‘ल स्वार्थे’ मुळीच नाही. कारण तेव्हा ‘लट्’ चीं रूपें ‘लृट्’ हून वेगळी भासत होतीं. पुढें यादव-मराठीत दोहोंचा घोंटाळा होऊं लागून स्वार्थे ‘ल’ ची आवश्यकता भासूं लागली.

( ई ) या स्वार्थे ‘ल’ च्या मागे अनुनासिक आल्यास त्याचा ‘न’ होतो. ( ल > न ) जसे, हसे + ल = हसैन; हसूं + ल = हसूं = हसौनि. परंतु कांही ठिकाणी मूळ ‘ल’ कायम राहिलेला दिसतो. पहा—

“ हे एइल तरि मी एइल । ” –ली० ३

“ ढीढरें देइल ( मी ) म्हणे । ” ,, ,,

हे अपवाद होत.

( उ ) वर्तमान-मराठीत—

मी करीन = I Shall do. मी काय करीन = What I Shall do.

मी काय करूं = What Shall I do?

असा करूं आणि करीन यात भेद आहे. प्रथमपुरुषी एकवचनी ‘ऊं’-कारान्त रूपे प्रश्नार्थ दाखवितात. असा भेद यादव-मराठीत नाही. ‘करू’ व ‘करीन’ हीच रूपे दोही अर्थी वापरण्यात येतात. पहा—

“ ऐसेयाते केसेनि **मारूं** । कवणावरि शस्त्र **धरूं** ।

निजहृदया **करूं** । भेदु केवि । ” –ज्ञा० १–२२१

येथे प्रश्नार्थ स्पष्ट आहे. परंतु,

“ येसी स्त्री येकि मढाबाहीरि : आता काइ **करिन** वो :

यैसे पुनः पुनः शब्दी रडो लागली । ” –स्मृ० २५८

( = आता काय करूं हो ! )

येथेंहि प्रश्नार्थ आहे. परंतु तो स्पष्ट नाही. तात्पर्य, ई आणि ऊं या प्रत्ययात असा घोंटाळा होता.

( ऊ ) माडगावकरी ज्ञानेश्वरीत—

“ आता तो उदारु कैसा **वरुसैला** । जेणें अर्जुनाचलु निवैल । ”

–ज्ञा० २–७९

असें रूप येतें. तेवढ्यावरून 'डॉडेरेट् ' वरुसैला ' हा भविष्यकाळाचा एक विशेष प्रकार मानतो. वास्तविक हा अपपाठ होय. राजवाडे-प्रतीत—

" आता तो उदारु कैसा वरुषैल । "

असा बरोबर पाठ आहे. अर्थात् डॉडेरेटच्या या ' खास ' भविष्याला आधार नाहीं.

## § ४० हेतुहेतुमद्भावे लङ् ( Conditional )

हा लङ् प्राकृत–अपभ्रंशात नाही. अर्थात् यादव-मराठीतहि तो आढळत नाहीं. राजवाडे लङ् मानतात. वस्तुतः तो लङ् नसून साधा लट् भविष्य आहे. वाक्यातील विशिष्ट वापराने तो काही ठिकाणी हेतुहेतुमद्भावी वाटतो, इतकेच. त्याचा नेहमींचा अर्थ आणि रूपें ही थेट भविष्यासारखी आहेत. शिवाय भविष्ये लट्ला यादव-मराठीत संकेतार्थ येऊन राहिलाच होता. तेव्हा आणखी एका लङ्चे काहीच प्रयोजन नव्हते. प्राकृत–अपभ्रंशात तो नाही हा पुरावा सबळ होय. तरी राजवाडे ज्याला लङ् मानतात, तो खरा लट्च आहे. चि० वि० वैद्याची टीका अशीच आहे.

## § ४१ अकरण रूप

यादव-मराठीत अकरणरूप विविध मार्गांनी सिद्ध होते.

( १ ) ' **न** ' या अव्ययाने :

नुरवी, नाकळे, न सडी, नैये, नेघे, नेदा, नेदखे, नेदे, नए

( २ ) ' **ना** ' या अव्ययाने :

" म्हणौनि भलेतेयाः ज्ञानप्रकाश ना ।"–उ० ६२७

"प्रमेय धाडोळिता सृष्टी : आथीचिना।"–ऋ० १३१

" सावळेया लाहाचेनि आधारे : काही सुजावे ना। "–शि० ५५६

"पोसीस ना तरि मारि गा देवा।"–ली० ३

"ते काइसेनिही बुझावे ना।"–स्मृ० ११२

( ३ ) ' **आह** ' आणि ' **हो** ' या धातूंची अकरणरूपे मुख्य क्रियापदाशी जोडून :

१ Grammar of Jnyanesvari, B. S. O. S. Vol. IV

न + आह = नाह (नाही, नाथि)
न + हो = नहो (नोहे, नव्हे, नहो, नव्हसि, नोहा, नव्है, नोहोंति, नव्हति...)

याचीं रूपें ज्ञानेश्वरीत पुढीलप्रमाणे आढळतात.

नोहे १८–११४
नाथि १५–५३ ("आणि आथिनाथि तेतुके।")
नोहोति ६–३९८ ("परि तैसा सोनि बहुते नोहोति।")
नव्हैल ३–२२२
नोहावे ३–१६९
नोहिजे २–१९६ वगैरे वगैरे.
नेघो (भविष्ये० स्मृ० ६४)
नव्हा = व्हो (लट्० स्मृ० २०४)
नोव्हे (लट्. शि० ९२०)

(४) **नको** (<सं० न्यक्–क्र ?). राजवाडे याची उपपत्ति 'न कर्तव्यम्' पासून लावतात. ती योग्य नसली, तरी अद्यापि हा शब्द बरोबर व्युत्पादिला गेला नाही. याचा वापर आज्ञार्थात द्वितीयपुरुषी होतो. जसें–

"मुख पाति गावारे। तैसें नका हो।"–ज्ञा० १५–२४३
"नको घेवो।"–स्मृ० ८२
"कव्हणी हासो नको।"–स्मृ० ९७
"ओझे काही घेवो नोको।"–ली० १-७२
"न पुसत नको या।"–स्मृ० १४५

परंतु आज्ञार्थाकरिता कधी साधे 'न' वापरलेले दिसते. उदा०

"न पळ न जाये।"–ध० उ० ६; 'न म्हण।'–उ० ५७५

(५) '**झणें**' या अव्ययाने :

"परि पार्था हे झणे। सायास घेसि हो मनें।"–ज्ञा० ६–३५
"म्हणोनि अझुइं अर्जुना। झणे चित्त देसी या हीना।"–ज्ञा० २-१७

१ राजवाडे–लेखसंग्रह, भाग २, पान ४२

छत्तीसगडी बोलीच्या व्याकरणात 'झिन' अव्ययाचा उपयोग वरीलप्रमाणेच होतो हें पुढे निपात-प्रकरणात दाखविलें आहे. (पहा, क्र० ५३)

## § ४२ कर्मणि व भावे रूपें

याची सविस्तर चर्चा पुढील भागात प्रयोगप्रकरणी केली आहे.
(पहा, भाग ३)

## § ४३ प्रयोजक रूपें ( Causals )

यादव-मराठीतील प्रयोजक सिद्ध करण्याच्या खालील रीति होत—

(१) **अव** : सं० आपय > प्रा० अ, ए, आव, आवे, अवि[1]
> अप० आविय, अवि, इवि
> म० अव

जसे—

| | | | |
|---|---|---|---|
| सं० कारापयति | > प्रा० कारावेइ | > अप० काराविअ–वी | > म० करवी |
| सं० हारपयति | > प्रा० हारवेइ | > अप० हारिवि | > म० हारवी |
| सं० उत्स्थापयति | > प्रा० उट्ठावेइ | > अप० उठिवि–अ | > म० उठवी |
| सं० रंजयति | > प्रा० रंव्ययह | > अप० रंवइ | > म० रावी |

(ध० उ० १६)

याची रूपे पुढील प्रमाणे आढळतात :—

जाणवे, नाचवी, नीववी, होववे, भेटवी, घोकवी, आगवे.. ......

**कांहीं विशेष रूपें** पुढे देतो—

"भटोबास पडितबासासि **घोकवीत** होते।"–दृ० ६७
(= संथा देत होते)

"आपुला मधुरस्वरी: हे सदा कोकिळाते **विसारी**।"–शि० ८०३
(सं० विस्मृ)

"अगा जी हृषीकेशी : आझुइ किती **चाळविसी**।"–शि० ७८

"आता **गमाल** दीस : कव्हनी परी।"–शि० १२३ (= गमवाल)

"गोसावी **ओळखवीती** तरि वोळखीजे।"–ली० ३
(ओळख करून देणे)

---

१ हेमचंद्र, प्राकृत व्याकरण, ३–१५०

" कैसीं नीलोत्पलातें **रावित** । "–ज्ञा० ११–५९० ( सं० रंजयत् )
क्वचित् मूळ ' य ' ( < आपय ) दिसतो. जसें,

" तया वीषयेसुख **तीडिकाय** : स्वर्गसुख **चडुफाय** । "–उद्ध० १७५
( = तिडीक उठविते ) ( = चडफडविते )

परंतु असें रूप विरल. बहुशः ' य ' चा ' व ' होतो.

( २ ) धातूच्या उपधेस वृद्धि होऊन :

धातूची वृद्धि + अव < सं० आपय

जसे—उघडी–उघाडी; फुट–फोडी
पड–पाडी; मन–मानी
फिट–फेडी;

सं० पातयति > प्रा० पाडयइ > म० पाडी
सं० मानयति > प्रा० माणयइ > म० मानी

( ३ ) क्वचित् साधे, अविकृत रूप प्रयोजकार्थी वापरलेले दिसते. उदा०

" जीवीची हाव प्राणिया : कवणु न **करी** । "–शि० ६८३ ( =करवी )

" ना तरि पर्वे घालिता वारा : उमानैल **कीरूं** । "–ऋ० १७९

" तुवा **जन्मौनि** पोसिली । "–ऋ० २७७ ( = जन्म देऊन )

यादव-मराठीत पहिल्या दोन पद्धति एकमेकीहून भिन्न आहेत. त्यात कोठे मिथ्याभासाने एकात्मता आलेली दिसत नाही. सर्व इंडो-आर्यन भाषामध्ये प्रयोजक रूपे बनविण्याच्या वरील दोन रीतिच आहेत व त्यात कोठें मिथ्याभासाने भेसळ झालेली नाही. अर्थात् मराठीतहि ती न दिसल्यास नवल नाही. परंतु कोंकणीत अशी भेसळ झाली हे मात्र नवल आहे. उदा०

मराठी : तुटणें–तोडणें
कोंकणी : थुंटता–थुंटयता

म्हणजे येथे मराठीप्रमाणें वृद्धि न होता, नेहमीचा ' आय ' प्रत्यय लागतो. हें भाषचें सुलभीकरण होय. तें कोंकणींत आहे, परंतु यादव-मराठींत नाही.

---

१ J. Bloch : L'indo Aryen, 242–4

बोलीची वाढ स्वतंत्र असते, मध्यवर्ती भाषेशी निगडित नसते, हा भाषाशास्त्रातील नियम येथें लागू पडतो.

## § ४४ वर्तमान कृदन्तें

येथवर दशविध लकाराचा विचार केला. या दहा लकारापैकी यादव-मराठीत जे कांही शिल्लक आहेत त्याच्या रूपाचा एकमेकाशी संकर होऊन तीं ओळखणे कधीकधी जड जातें. अतएव, या प्रत्ययी आख्यात विभक्ती-कडून सामासिक विभक्तीकडे भाषा वळलेली दिसते. या वळणातील कृदन्तें हा मधला टप्पा होय. एका बाजूला दशविध लकारापैकी कांही अवशिष्ट भाग व दुसऱ्या बाजूला सयुक्त क्रियापदे या दोन टोकाच्या मध्यें कृदन्ते बसतात. कृदन्त-पद्धति सस्कृतांत–प्राकृतात होती हे खरे. परंतु यादव-मराठीने तिचा विस्तार करून तिच्या उपयोगाचें क्षेत्रहि वाढविले हे नाकबूल करता येणार नाही. पुढे वर्तमान-कृदन्ताची घटना देतो—

१ स० अत् > प्रा० न्त[२] > अप० न्त > म० त

२ स० मान > प्रा० माण > अप० माण > म० आ

सस्कृतात 'अत्' आणि 'आन–मान' असे अनुक्रमे परस्मैपदी व आत्मने-पदी वर्तमान कृदन्ताचे प्रत्यय आहेत. पैकी 'अत्' पासून मराठीतील 'त' निघाला व 'मान' पासून 'आ' निघाला. मात्र राजवाडे[३] मानतात त्याप्रमाणे यातील एक परस्मैपदी व दुसरा आत्मनेपदी असा भेद नाही. भेद आहे तो त्याच्या अर्थात आहे, व त्याची चर्चा पुढे येईलच. येथे 'त' धातु-साधितार्चा रूपे देतो—

| स० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|
| भणत् | भणन्त | भणन्त | भणत |
| असत् | असन्त | सन्त | सात, असत |
| भवत् | होन्त | होन्त | होत |

---

१ S. M. Katre : Formation of Konkani, B. O. R. I. Vol. xx pp. 159

२ हेमचंद्र, प्राकृत व्याकरण : ३–१८१

३ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ९५

हें कृदन्त विशेषणात्मक असल्यानें त्यास पुल्लिंगी आ, स्त्रीलिंगी ई व नपुंसकलिंगी एं असे आदेश होतात. जसें–बोलता, बोलती, बोलतें. हे कृदन्त यादव-मराठीत दोन तऱ्हानी वापरलें जाते. एक क्रियापद म्हणून व दुसरें विशेषण म्हणून.

१ **क्रियापद :** लट्, लिङ् आणि लृट् म्हणजे वर्तमान-भूत-भविष्य या तिही काळाची रूपे सारखीच दिसूं लागल्यानें वर्तमानकाळ व्यक्तविण्याकरिता हें कृदन्त अधिकाधिक प्रचारात आले. केवळ वर्तमान–कृदन्त वापरून काळ साधल्याची उदाहरणे पहा :—

" देखैं देह **कांपत** । तोंड असे कोरडे **होत** ।
विकलता **उपजत** । गात्रासि । "–ज्ञा० १–१९६

" पाहे पा तरग तरि **होंत जात**। परि तेथे उदक ते अखंड **असत**। "
–ज्ञा० ८–१७५

" तूं का **भीत** या संसारा : का **घेत** अविद्येचा दरारा । "–उद्ध० १५६

" तूं **सांडित** येदुराज : हे महीतळ । "–उद्ध० १३३

" कुरुवाळा **करितें** : पाखी **झडपितें** ।
कपौती **खेळतें** : देखिलीं तेणे । "–उद्ध० ३१९

" नाना तापीं **तपत** : हृदय असे **जळत** । "—ऋ० १०१

" परतले यादव कवण **साहातु** असे घाओ । "–ध० उ० ३

केवळ वर्तमानकृदन्त वापरून काळ साधल्याची उदाहरणे फारशी नाहीत. वर्तमान कृदन्ताचा क्रियापदासारखा उपयोग सयुक्त काळात मात्र फार होतो. त्याचें विवेचन पुढे येईल. (पहा—क्र० ५१)

२ **विशेषणात्मक :**

"सेविती परी।" ज्ञा० १-५९। "पढियंता ठाइं।" ज्ञा० १८-७८
"पसरतेनि हाते।" उद्ध० ३१; "डाडाती गर्जना।" उद्ध० १९७
"चुकविती परी।" उद्ध० ६७७; "नव्हती बाधलें।" उद्ध० ७२६
"तें देखतें ना अदेखते।" उद्ध० ७५४; "संतें फळें।" उद्ध० १०
"तें माझे रूप : संत ना असंत।" उद्ध० ६५३
"करितिये आज्ञेचे।" ऋ० ६०१ "जाती वेळ।" वच्छ० २७०

"महदाइसे शोधीति शोधीति गेली।" स्मृ० २
"धर्मवार्ता होती असे।" स्मृ० १०२
"असतेनि पदार्थें असीकेयाचा वीधि।" स्मृ० १७६
"चाटसीएतें व्यापारवीती व्यापारवीती पाकनिष्पत्ति करी।" द० ६४
"घेते द्वार : साडिते द्वार।" द० ४६
"तेथ **गातीं वातीं : वाणितीं वाखाणितीं**
"दिसती पात्रे **नाचतीं** : मेणिके ऐसी।" शि० ३४९
"लावाल कलहो **नव्हते** : हे फुडें कीरू।" शि० १२४
"तैसिया **उचलतां** पायी धावती।" शि० ६८२
"**खांखांतें** प्रेते : खाअे गिळी **करितें**।" शि० ९०२

वरील वर्तमान कृदन्ते विशेषणात्मक असल्याने ती विशेष्यनिघ्न आहेत. त्यांना लिंगविकार होतात.

## § ४५ "आं" वर्तमान कृदन्त

यादव-मराठीत 'जाता, करिता, खाता, नेतां' अशी रूपे आढळतात. ती अव्ययी भूत कृदन्ते होत असे राजवाड्याचे म्हणणे. वास्तविक ती भूतकृदन्तें नसून वर्तमानकृन्दते आहेत. 'त्वा' या संस्कृत भूतकृदन्ताच्या प्रत्ययापासून 'ऊण' प्रत्ययान्त मराठी कृदन्ते होतात व तीं वरील 'ता' कृदन्तांपासून वेगळी आहेत, हे राजवाड्यानाहि मान्य दिसते. म्हणूनच त्यानी अर्धमागधीतील 'त्ता' या 'क्त्वा'च्या अपभ्रंशावरून मराठीतील 'ता' कृदन्त व्युत्पादिलें आहे. परंतु, एक तर महाराष्ट्री-अपभ्रंशात या व्युत्पत्तीला कोठेंहि आधार नाही. दुसरे, 'नेता, करिता, खाता, देता' या रूपात वर्तमानकाळच उद्दिष्ट आहे, भूतकाळ नाही. इतकेंच, की या वर्तमान कृदन्ताचा उपयोग नेहमीचा नसून तो क्रियाविशेषणात्मक आहे व तसा आहे, म्हणूनच हीं रूपे सदा 'आ'–न्त असतात, तीं लिंगवचनाबरोबर फिरत नाहीत. म्हणजे यादव-मराठीतील 'त' प्रत्ययान्त वर्तमानकृदन्तें विशेषणात्मक आहेत, तर 'आ' प्रत्ययान्त कृदन्तें क्रियाविशेषणात्मक आहेत. राजवाडे त्यांना भूतकृदन्ते मानतात, हें अयोग्य होय.

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान १०८

मराठीतील या क्रियाविशेषणात्मक वर्तमानकृदन्ताचा बरोबर छडा अद्यापि कोणीं लाविला नाही. बीम्स[1] ते अव्ययी मानतो, परंतु उपपत्ति देत नाही. कृष्णशास्त्री चिपळोणकरानीहि[2] त्याचे क्रियाविशेषणात्मक रूप मानण्यावरच काम भागविले आहे. माझ्या मते याची उपपत्ति अशी—

सं० मान (आत्म०) > प्रा० अप० माण > आण > म० आ

हा 'आ' प्रत्यय नेहमीच्या 'त' कृदन्ताला लागून त्याचे क्रियाविशेषणात्मक रूप बनतें. जसे करित + आ = करिता. अपभ्रंशात माण प्रत्ययाने साधलेली वर्तमान कृदन्तें आहेत. उदा० पविस्समाण, पिच्छमाणु (भविसयत्तकहा), गच्छमाण, णच्चमाण, चोयमाण (णायकुमार०) अपभ्रंशातील माण प्रत्ययाचे ओष्ठ्य वर्णाच्या लोपाने 'आण–आ' असे रूप झाले व ते अपभ्रंश-प्राकृताप्रमाणे एकटेच न वापरता, नेहमीच्या 'त' कृदन्ताला जोडून वापरण्यात आले. तात्पर्य,

(अत् > त) + (मान > आ) = ता

असें जोड स्वरूप वर्तमान कृदन्ताचे आहे. म्हणजे, याला **सामासिक वर्तमान कृदन्त** म्हणता येईल. कोंकणांतील अशा कृदन्तातील 'आ'ची उपपत्ति पाली भाषेतील 'तिठ्ठतम' या द्वितीयेच्या रूपापासून डॉ० कात्रे[3] लावतात. परंतु यादव-मराठी आणि कोंकणी या दोहोंतील 'आ' हा संस्कृत 'मान' चाच अवशेष असावा असे मला वाटते. या 'ता' कृदन्ताची मी वर दिलेली उपपत्ति सर्वस्वी स्वतंत्र आहे. या रूपाची काही उदाहरणे देतो—

"का कामना हि न **करितां** । अवसात घडे पाडुसुता ।
परि वायकाड न **जुझतां** । लागे जैसे ।"–ज्ञा० १८–१०३
"जीन एथ उखिता । वस्तिकरू वाटे **जातां** ।"–ज्ञा० १३–३५
"धाय **सुतां** मुखी : विकळु गेला ।"– उद्ध० ४६८
"की आव्हाटीं म्हैसवा थरु : **नव्हतां** दृष्टीगोचरु ।"–ऋ० २९८
"**देखत देखतां** आत्मघातु : घडला जेया ।"–ऋ० ३५

---

१ Comp. Grammar. Vol III Ch. iii.
२ मराठी व्याकरणावरील निबंध, पान २११
३ Formation of Konkani, B. O. R. I. Vol. xx, pp. 168

" **जेवितजेवितां** भटोबासाचां पात्री घातला । "–स्मृ० २७
" त्यातें **येतां** देखिलें । "–लीला० ३–३३
" **आराधितां** मूक्ति : **वीरोधितां** भूक्ति । "–लीला० ३–१९
" ऐसे **असत असतां** तया लेकुरवाची माउली सरली । "–दृ० ९१
" **चिंतीत चिंतीतां** तीसीहि पाख नीगती । "–दृ० ९६

पैकीं 'जेवितजेविता, चितीतचितीता, असतअसता' हीं द्विरुक्त रूपें महत्त्वाची आहेत. त्यात पहिले कृदन्त 'त' प्रत्ययान्त व दुसरें 'ता' प्रत्ययान्त दिसते. दोहोंनी दिग्दर्शित काळ एकच व तो म्हणजे वर्तमान. प्राकृतातील 'न्त' व 'माण' या वर्तमान कृदन्ताच्या दोन प्रत्ययातून दोन भिन्नार्थी कृदन्ते यादव-मराठीत कशी आली हे पाहण्यासारखे आहे. विशेषत: 'ता कृदन्त' हे जोड असल्याने त्यात सामासिक विभक्तीची बीजे दिसतात हें विशेष होय.

कर्मणि व प्रयोजक रूपाची चर्चा अन्यत्र केली आहेच. येथें फक्त त्याची वर्तमानकृदन्ताची रूपे देतो—

**कर्मणि वर्तमान कृदन्त**–असिजत, म्हणिजत, पाविजत, करिजत
**प्रयोजक वर्तमान कृदन्त**–करवित, निववित, भणवित

## § ४६ भूत कृदन्तें

कर्मणि भूतकृदन्त:— क्रियापदाची प्रत्ययी रूपे जसजशी लोपत चाललीं, तसतशी कृदन्ते अधिकाधिक उपयोगांत येऊं लागली. यात भूत कृदन्तें हीं अति महत्त्वाची होत. संस्कृतकालापासूनच त्याचा वापर आहे. प्राकृतात त्याची वाढ झाली व भूतकाळ बहुशः कृदन्तानीच व्यक्त होऊं लागला. " प्रायो भूते निष्ठान्तप्रयोग एव प्राकृते दृश्यते । " हे सूत्र प्रसिद्धच आहे. संस्कृतातील निष्ठारूपच महाराष्ट्री-अपभ्रंशद्वारा यादव-मराठीत आलें. इतर आर्य भाषात भूतकाळ अशाच कृदन्तांनीं साधला जातो. कोंकणींतील या भूतकाळाचे दोन भेद डॉ० कात्रे[१] करतात. त्याच्या मतें भूतकाळाचा

---

१ Formation of Konkani, B. O. R. I. Vol. xx pp. 163

स्वार्थे 'ल' कधीं मूळ धातूंना लागतो, तर कधी कृदन्ताला लागतो. एतावता, मूळ धातूपासून साधलेला व मूळ कृदन्तापासून साधलेला असे भूतकाळाचे दोन प्रकार ते मानतात. त्यांची ही विचारसरणी मान्य केल्यास मराठींतहि असेच दोन प्रकार मानावे लागतील. परंतु वास्तविक ते तसे नाहीत. एका कृदन्तालाच स्वार्थे 'ल' लागून मराठीत भूतकाळ होतो. यादव-मराठीतील भूत कृदन्तांच्या रूपात फरक दिसतो तो त्याच्या उपपत्तीत नसून वर्णप्रक्रियेमुळें होणारा आहे. मराठीतील व्ययी भूत कृदन्ताची परंपरा अशी—

सं० क्त > प्रा० अप० १ अ (जाअ, हुअ, न्हाअ)
२ त्त (पात्त, आत्त, खत्त)
३ इअ (दमिअ, धरिअ, कहिअ)
४ ण्ण (दिण्ण, विच्छिण्ण, भिण्ण)

हींच रूपें वर्णप्रक्रिया होऊन मराठीत येतात व तेथे त्याना 'ल' स्वार्थे लागतो. जसें—

दिण्ण + ल; जाअ + ल; पात्त + ल वगैरे.

होर्न्ले[१] या 'ल' ची उपपत्ति शौरसेनी द > ड > र > ल अशी लावतो. परंतु ही वर्णप्रक्रिया सापेक्ष असल्याचे प्रा० कुळकर्णी दाखवितात ते योग्यच आहे. या 'ल' ची खालील व्युत्पत्ति आता सर्वमान्य झालेली आहे.

प्रा० अप० "अल्ल, इल्ल, उल्ल" > म० 'ल'

अपभ्रंशातील रूपे : कहिय, गिय, धरिअ
मराठींतील रूपें : कथिल, नेल, धरिल

म्हणजे अपभ्रंशात स्वार्थे 'ल' अगदी नाही. यादव-मराठीत तो नित्य आहे. याचाच अर्थ हा, की 'अ, अय, इय' हे अपभ्रंशातील भूतनिष्ठेचे प्रत्यय पुढें वर्णप्रक्रियेच्या ओघात भूतकाळ व्यक्तविण्यास असमर्थ झाले आणि म्हणून भूतकाळाचे नियत-चिन्ह या अर्थी 'ल' स्वार्थे मराठीनें

१ Hoernle : Gaudian Grammar, pp. 306

वापरात आणला. हा 'ळ' लागण्यापूर्वी यादव-मराठींत भूतनिष्ठा तीन तऱ्हांनीं प्रकट होते. म्हणजे, 'ल' पूर्वीचें भूतकृदन्ताचे रूप अकारान्त, तकारान्त, किंवा नकारान्त असूं शकतें. हा सारा वर्णप्रक्रियेचा[1] प्रकार होय. पुढें यांचीं उदाहरणें देतों.'

| | संस्कृत | प्रा० अप० | मराठी |
|---|---|---|---|
| १ अकारान्त : | | | |
| | आगत | आअअ | आअ + ल |
| | कृत | किअ | किअ–के + ल |
| | स्नात | न्हाअ | न्हा + ल |
| | अर्पित | अप्पिअ | अर्पिय + ल |
| | मानित | माणिअ | मानिय + ल |
| | जात | जाअ | जाअ + ल |
| २ तकारान्त : | | | |
| | उपात्त | पात्त | पात + ल |
| | तप्त | तत्त | तात + ल |
| | जित | जिअ | जित + ल |
| | गृहीत | गेण्हिअ | घेत + ल |
| | भणित | भणिअ | भणित + ल |
| | हरित | हारिअ | हारित + ल |
| | सिक्त | सित्त | सीत + ल |
| | सुप्त | सुत्त | सुत + ल |
| ३ नकारान्त : | | | |
| | धावित | धाविण्ण | धाविन्न + ल |
| | दत्त | दिन्न | दिन्ह + लॆं[2] |
| | युद्ध | जुज्झिन्न | जुझिन्न + ल |

१ या वर्णप्रक्रियेची सविस्तर चर्चा राजवाड्यांनीं केली आहे. पहा ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ९६ ते १००

२ पाटण शिलालेख, खिस्ताब्द १२०६

| | | |
|---|---|---|
| हासित | हासिअ | हासिन्न + ल |
| निर्गत | निग्गअ | नीनि + ल |
| नदयित | नंदयिअ | नादिन्न + ल |
| रुदित | रुदिअ | रडिन्न + ल |

हें भूतकृदन्त विशेषणात्मक असल्याने त्याला पुल्लिंगीं, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी अनुक्रमे 'आ, ई, एं' असे आदेश होतात. जसे, धाविन्नला–ली–ले.

यादव-मराठीत या कृदन्ताचे एक विशेषणासारखा व दुसरा क्रियापदासारखा असे दोन उपयोग आहेत.

१ **विशेषणात्मक**:—

"तूं उभा **ठाकला** चि पुरे।" लीला० १–२९
"तूं **चिंतिला** पावसि स्वामि सळा।" उद्ध० ११७
"लाहे **तान्हैला** जीवनु।" ऋ० ४७
"**आर्तैले** डोळे तीए दीगे : धाव घेति।" ऋ० १४२
"**वालभैलें** परब्रह्म : पाठीं धावे।" ऋ० १५६
"**झगटलें** पाणी हाले।" ऋ० ९६
"देशु **उचलला** होइल।" स्मृ० ८३
"**बोलिलि** क्रिया काइसेनि आठवैल।" स्मृ० ६३
"**निजैले बैसले** ठाये गोसावियाचे।" स्मृ० ५७
"**वाकले** हरीबासी (तृ०) गीता वाखाणीली।" स्मृ० १२१
"दधिभातु उन्हे **तापला** आला।" लीला० ३–१८

२ **क्रियापदात्मक**:

पु० आळिला, पराभविला, उभिले, सासीनले, देखिलासि, कांटाळैला

स्त्री० दीन्हली, डीरैली, जिंतली, वाइलिया, रडीनली

नपुं० हातवासिलें, ओल्हावले, विसंवले, नादिनलें, कोंभैली, भीडीनलीं

**प्रयोजक**: वनविलें, मुसावलें, चालविलों, लेवविलों, मानलवला, आनंदवीले, जाणविले, उठाविला......

क्वचित् या कर्मणि कृदन्ताचा साम्याभासाने 'ज' कर्मणि केला जातो. जसें 'बोलिजेले' (द० २३)

वरील भूतकृदन्ताची विशेषणात्मक व क्रियापदात्मक रूपे अभिन्न आहेत. म्हणजे यादवकाली एकच कृदन्त नामार्थी व क्रियापदार्थी वापरलें जाई, वर्तमान मराठीने दोहोत भेद केला आहे. 'ल' हा आणखी एक स्वार्थे प्रत्यय लावून वर्तमान-मराठी कृदन्त-विशेषणे बनविते. जसे, गेले + ल, मानवले + ल, वगैरे. हा दुसरा 'ल' यादव-मराठीत नाही. तो यादवोत्तर काली वापरात आला व भूतकृदन्ताच्या सामान्यरूपाला[1] (गेले, मानवले,... + ल) लागूं लागला.

## § ४७ कर्तरि भूत कृदन्तें

यादव-मराठीत कर्मणि भूत कृदन्ताप्रमाणेच कर्तरि भूत कृदन्तेंहि आढळतात. "मी दारा गेला", "मी जेविला" ही कृदन्तें उघड उघड कर्तरि होत. याचा उल्लेखहि बीम्स व हॉर्न्ले करीत नाहीत. राजवाड्यानी मात्र याची स्वतत्र उपपत्ति बसविली आहे. त्याचे म्हणणे थोडक्यात असे—

"संस्कृतांतील 'तवत्' हा भूत कृदन्ताचा प्रत्यय कर्तरि आहे. त्यापासून मराठीने कर्तरि भूत कृदन्ते साधली. जसे—

पु० कृतवान् > प्रा० किअवा > म० किअ + ल + आ = केलां

स्त्री० कृतवती > प्रा० किअवइ > म० किअ + ल + अइ = केल्ये"

श्री० नेने[3] यानी राजवाड्याच्या मताचाच अनुकार केला आहे. राजवाडे आपल्या उपपत्तीला ज्ञानेश्वरीतून आधार देत नाहीत. नेन्यानीं उदाहरणे दिली आहेत, परतु या रूपाची परपरा दाखविलेली नाही आणि वस्तुतः तशी परंपराच त्याना नाही. कारण वररुचि व हेमचंद्र या कर्तरि भूतकृदन्ताचा उल्लेख करीत नाहीत. शास्त्रीय वैयाकरणाची गोष्ट सोडली तरी अपभ्रंश-ग्रंथांतून वरील रूपें आढळत नाहीत. अपभ्रंशात कर्मणि भूत कृदन्तें विपुल आहेत, परतु कर्तरि अगदी नाहींत. तेव्हा, यादव-मराठीत ही रूपे

---

१ J. Bloch : La Langue Marathe, 256

२ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान १०२–३

३ दृष्टान्तपाठ (संपा० ह० ना० नेने) परिशिष्ट ५, पान १५०

परंपरेनें, म्हणजे प्राकृत-अपभ्रंशद्वारा आली नाहींत हें स्पष्ट आहे. शिवाय असें, कीं यादव-मराठीत वरील कृदन्ताचीं प्रथमपुरुषी रूपेंच तेवढी विपुल आढळतात. द्वितीय व तृतीयपुरुषी रूपें नाहीत असे नव्हे, तर तीं अति विरल आहेत. हें कर्तरि भूत कृदन्त परंपरागत असतें तर तिन्ही पुरुषात आढळतें. आढळत नाही त्या अर्थी राजवाड्यांनीं दिलेली महाराष्ट्री-प्राकृतांतील रूपे काल्पनिक ठरतात व मराठींतील या कृदन्ताची निराळी उपपत्ति शोधावी लागते. प्रथम ही रूपे देतो—

"यन्हविं तन्हि मी मुर्खु। जन्हैं **जाला** असे अविवेकु।"–ज्ञा० १–७६
"का कव्हणि येकु भ्रमलेपणे। मी तो नोहे गा **चोरलां** म्हणे।"-ज्ञा० ६-७४
"तो मी तूझें **जालां** आहे। खेलणे आजि।"–ज्ञा० १८–२८२
"मी वाघें **खादलां**। हस्ती **वोळघलां**।"–दृ० १०४
"आगा: मी प्रसन्न **जालां**।"–दृ० ११
"मी **जेविलां** नाही: मी भुकैला **होतां**।"–दृ० १९
"मी चहुंकडे **आळिलां**: वरि ममतेचा खीळा: **गाडिलां** मी।"
–उद्ध० २३४
"मी **हिंडिनलां** अनेग देश।"–उद्ध० ६४३
"मी सर्वस्व **नागवलां**।"–ऋ० ३६५
"मी **गेलां** आणि **नीघालां**।"–स्मृ० १०६
"भटोबास थोर **मानवले**।"–स्मृ० १८ (= भटोबासांनी मानलें)

वरील रूपाची उपपत्ति माझ्या मते अशी:—

कर्मणि भूत कृदन्ताचे (पु०) प्र० ए० व० + लट्चा प्र० पु० ए० व०चा अनुस्वार
" " (पु०) गेला + आ = गेलां

पुल्लिंगाप्रमाणे स्त्रीलिंगीं ई (गेली–एं) व नपुंसकलिंगी एं (गेलें–एं) अशी रूपें होतात. राजवाड्याच्या उपपत्तीला जसा अपभ्रंशांत नाही, तसाच आधार वरील उपपत्तीलाहि नाहीं हें खरें. परंतु, राजवाडे वरील रूपें परपंरागत मानतात, आणि मी तीं तशीं मानीत नाहीं, हा या दोन उपपत्तीमधील मुख्य फरक आहे. माझ्या मतें या रूपांना परंपरा नसून ती मराठीनें भूत कृदन्त व लट्चा प्रथमपुरुषी एकवचनी प्रत्यय यांच्या जोडानें बनविलीं.

अर्थात् ही मराठीची स्वतंत्र बनावट असल्यानें अपभ्रंशांत तिचें बीज सापडणे अशक्य होय. ही उपपत्ति मी चर्चेस पुढे करीत आहे.

## § ४८ अव्ययी भूत कृदन्तें ( Absolutives )

यादव-मराठीत ल्यबन्ताच्या अंती "ऊनि, ऊनु, ओनि, ोनि, ोनु औनिया" असे प्रत्यय आढळतात. याची उपपत्ति पाहता मतवैचित्र्य आढळतें. राजवाडे, डॉ० भांडारकर हे संस्कृत 'त्वा' पासून, तर डॉडेरेट्[१] सप्तमीच्या विभक्तीपासून याची उपपत्ति लावितो. प्रो० ब्लोक[२] याचें मत अगदीच भिन्न आहे. ते म्हणतात :

"These terminations are the ablatives of Marathi verbal stem, plus the 'ni' locative attachment, abbreviated from 'tani' as in the case of ablative of nouns."

प्रो० ब्लोक याचें म्हणणे सर्वस्वी अयोग्य आहे. कोणत्याहि विभक्तीचा या कृदन्ताशी संबंध नाही. प्रा० कुलकर्णी यानी याबाबत स्वतःचे मत दिले नसलें तरी त्यानी उ–कृदन्ताचा आणि ऊन–कृदन्ताचा जो संबध जोडला आहे तो अशास्त्रीय वाटतो. प्रा० कुलकर्णी[३] म्हणतात : "उं कृदन्ताचाच आणखी एक प्रकार म्हणजे ऊन कृदन्त होय. .. ऊनच्या पुढची पायरी म्हणजे ऊं." वास्तविक उं कृदन्त भविष्यार्थी व ऊन कृदन्त भूतार्थी असताना दोही एकच असे म्हणणे बरोबर नाही. या प्रत्ययाची उपपत्ति सरळ असता खरे म्हटलें तर आडवळणात शिरण्याचे कारणच नाही.

सं० त्वानम्–त्वीनम् > प्रा० त्ताण, तूण, ऊण<br>
> अप० ऊण, एविणु, एप्पिणु<br>
> म० ऊनि, ऊन, ऊनिया...

पुढें अपभ्रंशांतील काही रूपें देतो—

ऊण–बुज्झिऊण, भजिऊण, अइऊण (णायकुमार०), गिण्हिऊण (भविसयत्तकहा)

---

१ Grammar of Jnyanesvari, B. O. R. I. Vol. IV

२ La Langue Marathe, 261–3

३ मराठी भाषा, उद्गम–विकास, पान ३७३

एविणु–लेविणु ( णायकुमार० ), करेविण्णु ( भविसयत्तकहा )

एप्पिणु-आपोप्पिणु, साहेप्पिणु ( णायकुमार० ), पणवेप्पिणु ( सावय-धम्म० ) अर्धमागधींतहि[1] ‘ऊणं–इऊण’ हे प्रत्यय लागून “ काऊणं, जाणिऊण, दाऊणं, पासिऊणं ” अशी रूपे होतात. तात्पर्य, महाराष्ट्री प्राकृत, अर्धमागधी आणि अपभ्रंश यात “ ऊण, इऊण, एविणु ” हे प्रत्यय दिसतात. याच्या-पासून अपभ्रंशद्वारा मराठीतील प्रत्यय निघाले. मराठीतील ‘ऊनि’ आणि ‘औनि’ या प्रत्ययाची वर्णप्रक्रिया अशी कल्पिता येईल—

म० **ऊनि–औनि** < अप० औण्णु–ण्णि
< अप० तुअण्ण–इ
< स० त्वानम् + त्वीनम्

म्हणजे त्वानम् आणि त्वीनम् याच्या सयोगाने मराठीतील प्रत्यय सिद्ध होतात. मराठीतील प्रत्यय—

( १ ) ऊनि, ऊनु : करूनि, म्हणूनि, नेदुनु, पेरुनु

( २ ) औनि–नु, ऊनिया, औनिया : म्हणौनि, करौनि, चेओनिया, म्हणोनिया

‘इ’ व ‘उ’ ही केवळ पादपूरणार्थ आहेत. मात्र, ‘इया’ तसें नाही. संस्कृत ल्यबन्तातील हा अवशेष होय.

स० य > प्रा० इय > म० इया

म्हणजे त्वान > ऊन + य > इया असे हे जोड रूप आहे. प्रो० ब्लोक[2] म्हणतात त्याप्रमाणें याचा सप्तमीशी मुळींच सबंध नसून राजवाड्याच्या म्हणण्याप्रमाणें संस्कृतातील ल्यबन्त-प्रत्यय ‘य’ या पासून निघालेले हे पादपूरक होय. याची रूपे—

करौनिया, लाहौनिया, म्हणौनिया, वगैरे.

( ३ ) महानुभाव ग्रथात ऊन-कृदन्ताचेच एक ‘उं’ रूप आढळतें. त्याची परंपरा ‘ऊन’ प्रमाणेच होय. इतकेंच कीं ऊनमधील नासिक्य वर्ण जाऊन त्याचें अनुनासिकात रूपातर झाले आहे.

---

१ P. L. Vaidya: “A Manual of Ardhamagadhi Grm.” pp. 64

२ La Langue Marathe, 261

ऊन > ऊन् > ऊं : हसून > हसून् > हसूं
हें रूप ज्ञानेश्वरींत नाही. महानुभाव ग्रंथांत, विशेषतः गद्यात हे नित्य येते. एकाच काळातील भाषेचे थर सूक्ष्म भेद कसे व्यक्तवूं शकतात त्याचा हा उत्तम दाखला आहे. ही रूपे ज्ञानेश्वरीत नसल्याने साहजिकच राजवाडे किंवा डॉडेरेट त्याचा उल्लेख करीत नाहीत. ती रूपे येणेप्रमाणे—

" महदाइसे घरातु रीगौं बैसली । " – स्मृ० २३ (=रिगौनि)
" ते बाइ घरातु जाऊ बैसली । " – स्मृ० ५३ (=जाऊन)
" प्रकरणीची लक्षणे केली भटोबासा पुसपुसो । " – स्मृ० १० (=पुसून)
" तेंहि शब्द घडउं घडउं पदे बांधिलीं । " – स्मृ० १७४ (=घडवून)
" भिक्षू तयाते बोलावू बोलावूं विजना नेति । " – स्मृ० ११०
" ते नावे घेवो घेंवो बोलवीति । " – लीला० १–३४
" एरे श्रीकरे भुइचे अनु वेचवेचुं तेथ घालीति । " – लीला० १–५३

पद्यात ही रूपे जवळ जवळ नाहीतच. म्हणजे वास्तविक ऊन मधील नासिक्य वर्णाचा उच्चार व्यजनान्त करण्याकडे कल होता व त्याचेंच रूपातर अनुनासिकात झाले. गद्यात भाषेचें खरे स्वरूप दिसते ते असे.

## § ४९ भविष्य कृदन्तें

( १ ) **तुमन्त** : हे अव्ययी कृदन्त असून त्याची परंपरा अशी—

स० तुम् > प्रा० उम > अप० उ, हु, इवि > म० ऊ

अपभ्रशातील 'उ–हु' प्रत्ययाच्या द्वारा मराठीतील ऊ सिद्ध झाला. क्वचित् पूर्वस्वराशी संधि पावून त्याचा ओ, औ होतो.

| सं० | प्रा० | अप० | मराठी |
|---|---|---|---|
| दातुम् | दाउ–उम | दाउ | देऊं |
| गृहीतुम् | घेत्तुं | घेत्तउं | घेऊं |

अपभ्रंशात 'उं–हुं' प्रत्ययाबरोबर 'इवि' हा निष्ठाप्रत्यय लागूनहि तुमन्त सिद्ध होई. जसें, कहिवि ( कथयितुं )–सावयधम्म० २०१
कड्ढिवि ( कर्षितुं )–णायकुमार० ७–६–२
करिवि, धरेवि – भविसयत्तकहा

म्हणजे एकच भविष्यार्थ अपभ्रंशात 'इवि' व 'उं–हुं' या प्रत्ययांनीं दाखविला जाई, आणि एक निष्ठेचा 'इवि' प्रत्यय भूतार्थी व भविष्यार्थींहि योजिला जाई. यादव-मराठींत हा संभ्रम नाही. एकविधता आल्याचा हा पुरावा होय. पुढें काहीं तुमन्ताची रूपे देतो—

'राहाटो नये।' उद्ध० २९७
'वरू जाये।' ऋ० ३३३
'पुसौं, करौं।' ध० पू० १०
'जेऊं ये' (=जेवता येते) स्मृ० ७२
'बैसों घातले' (=बसावयास) स्मृ० ९७
'स्मशाने वसों आदरिली।' ज्ञा० १३–२५
'वाखाणूं आदरिले।' स्मृ० १२०
'पेवों'। इ० ४१
'पीयो, पेओ।' उद्ध० ७२५
'प्रणूं आला।' ध० पू० ३०
'विटाळूं नेंदावा।' स्मृ० ५०
'नको हों।' (=होऊ नका) स्मृ० ९४
'धूं–धो।' स्मृ० २१
'पीडा हों लागली।' लीला० १–२८

(२) **आव:** (Potential Participle)

सं० तव्य > प्रा० अव्व > अप० एवअ–इवअ > म० आव्
अपभ्रंशात एवअ–इवअ हे प्रत्यय लागून रूपे होतात. जसें—

"वंचेवअ, करेवअ, मारेवअ, दारेवअ" (णायकुमार०)

"अप्पिव्वइ, करिव्वइ, जाणिव्वइ, लाइव्वइ" (भविसयत्तकहा)

मराठीनें अपभ्रंशांतील एकार व इकार न घेता महाराष्ट्री–प्राकृतातील 'अ' दीर्घ केला आहे. म्हणजे 'आव' प्रत्यय मराठींत अपभ्रंशद्वारा न येता साक्षात् महाराष्ट्रींतून आला.

हे व्ययी भविष्य कृदन्त असून लिंगवचनाप्रमाणें बदलतें. याचीं रूपें पुढीलप्रमाणें होतात.

| सं० | प्रा० | मराठी |
|---|---|---|
| हसितव्य | हसिअव्व | हसाव (वा, वी, वें) |
| भवितव्य | होइअव्व | होआव (वा, वी, वें) |

उदा० "जीणावी राज्येंकुलें।"–शि० ४९२
"जीआवें दीसु दोनिच्यारि।"–शि० १३७

या कृदन्ताचा नामाप्रमाणेंहि उपयोग होतो—

"श्रोतेयां विनती : सुआवी न लगे।"–उद्ध० १३
"यदुवशाची वेळुवने : वनवावीं असति।"–उद्ध० ५३
"लाहावेआचें।"–वच्छ० २५३

(३) 'ज' : (< सं० य)

| सं० | प्रा० | मराठी |
|---|---|---|
| गुह्य | गुज्झ | गूज |
| कार्य | कज्ज | काज |
| भोज्य | भोज्ज | भोजे |
| खाद्य | खाज्ज | खाजें (दृष्टान्त० २१) |

ही कृदन्ते यादवकालींच नामे झाली होती.

(४) **आवेया** : हा प्रत्यय लागून 'करावेया, बोलावेया, जावेया' अशी रूपें नित्य होतात. त्याना अर्थ तुमन्ताचा असला तरी त्याची उपपत्ति सस्कृत तुम् प्रत्ययापासून लागूं शकत नाही. राजवाडे या कृदन्ताचा विचार करीत नाहीत. माझ्या मतें ते व्ययी आणि अव्ययी भविष्य कृदन्ताच्या प्रत्ययाच्या जोडाने बनलें आहे.

१ आव <(स० तव्य) + २ इव > इय (अपभ्रंशातील तुमन्त प्रत्यय) अपभ्रंशात "कड्ढवि, परिण्णेवइ, वछइ" अशी तुमन्ताचीं रूपें होतात हें आपण तत्प्रकरणी पाहिलेच आहे. हा 'इवि' प्रत्यय मराठी शुद्ध तुमन्तात लोपला, तरी प्रस्तुतच्या अव्ययी भविष्य कृदन्तात तो दिसतो. जसे,

"कराव" + इवि > इय = कराविय > करावेय–या.

अशा रीतीने ही रूपे सिद्ध होऊ शकतात. तात्पर्य,[१] हे जोड कृदन्त होय. कोंकणीत 'कोर्च्या' या व्ययी कृदन्ताला 'क' हे चतुर्थीचे शब्दयोगी लागून 'कोर्च्याक' असे रूप होते. यादव-मराठीत त्याची चतुर्थी न होता अपभ्रंशातील 'इवि' हा प्रत्यय व्ययी भविष्य कृदन्ताला लागतो. या जोड कृदन्ताची ही उपपत्ति नवीन व स्वतंत्र असून तिला अपभ्रंश-ग्रंथात आधार आहे.

---

१ S. M Katre : Formation of Konkani, B. O. R. I. Vol xx pp. 170

पुढें याचीं काहीं रूपें देतों. कधीकधी हें कृदन्त चतुर्थीचें 'लागीं' हें शब्दयोगी घेतें. तेवढ्यापुरते त्याचें मागें सांगितलेल्या कोकणीतील रूपाशी साम्य आहे.

"भोगावेयालागी।" उद्ध० ३४१ "नमस्करावेया।" स्मृ० ८
"जीणावेया।" मा० स्व० २८ "खावेया।" दृ० ८
"आलिंगावेया।" वच्छ० १७१ "उद्धरावेआ।" वच्छ० ४
"देखावेआ लागौनि।" वच्छ० २१५

## § ५० कांहीं विशिष्ट कृदन्तें

काही कृदन्ताची विशेष रूपे व विशेष अर्थ आढळतात. ती पुढे देतो—

**म्हणौनि :** (=मुद्दाम, आपण होऊन)

"तूं म्हणौनि नको करूं।" स्मृ० २०२

**पौनःपुन्यदर्शक :** "जेवितजेविता, पुसपुसो, वेचवेचुं, घडउघडउ असतअसता, चितीतचितीता, पळपळित वीतुवीतु"

**संयुक्त कृदन्तें :** होत साता-साती–साते
जाला साता, जाली साती-जाले साते.
ठकलीं ठेली (शि० ६१०), करीतसाता (दृ० १०)

**अर्थदृष्ट्या :** "पळपळित निगौनि जाये।" दृ० ८९ (पळतपळत)
"ऐसे असतअसता।" दृ० ९१ (=होताहोता)
"तोचि हूनि जरि बाहिरि जाये।" दृ० ७४
(तो आपण होऊन)

**व्ययी भविष्य कृदन्त + 'नाहीं' :**

"आपण कव्हणा आधीन व्हावे नाही :
आपण आधीन कव्हणा करावे नाही।"–दृ० ६२

**तुमन्ताचें एकाकी रूप :**

"पाणी **पा** दीयाल।"–लीला० १–४५ (=पिण्यास)
सं० पातुम् > पाउअं > पाउं > पा

## § ५१ संयुक्त क्रियापदें ( Compound Verbs )

संयुक्त क्रियापद हे आख्यात विभक्तीचे तिसरें व परिणत स्वरूप आहे. प्रत्ययी आख्यातविभक्ति जाऊन कृदन्ते येणे व शेवटीं या कृदन्तानाच सहाय धातूची जोड मिळून सामासिक आख्यातविभक्ति सिद्ध होणे हा भाषेचा स्वभावच आहे. नामविभक्तीत शब्दयोगीचे जे स्थान तेच आख्यात-विभक्तीत संयुक्त क्रियापदाचे होय. यादव-मराठीत सामासिक क्रियारूपाना आरंभ झालेला दिसतो. यात मुख्य धातूचें कृदन्त रूप व सहाय धातूचे आख्यात-रूप याचा जोड होतो. सयुक्त क्रियापदे मानावीत की न मानावीत या वादात येथे शिरण्याचे कारण नाही. इतके खरे, की सुसंपन्न अशा यादव-मराठीत वर्तमान, भूत आणि भविष्य या तीन काळाचा काटेकोर उपयोग केवळ अशक्य होय. त्या काळाच्या विविध छटा कृन्दतानीच केवळ दिग्दर्शित होणे शक्य नव्हते. त्यामुळे सहाय क्रियापदाची वाण भासू लागली असावी. प्रा० कुलकर्णी[१] सयुक्त क्रियापद मानणाऱ्यापैकी आहेत. ते म्हणतात—" सयुक्त काळ मानावे लागतातच, म्हणून सयुक्त क्रियापदे मानिली पाहिजेत. "

आर्य भाषाच्या इतिहासात सयुक्त क्रियापदाला आरभ अपभ्रशानतर अर्वाचीन भाषाच्या उदयकाळी झाला असेच म्हणावे लागतें. कारण यादव-मराठीत, प्राचीन हिंदीत सयुक्त क्रियापदे आढळतात. परतु अपभ्रंशात मात्र ती नाहीत. अपभ्रशात आख्याते आणि कृदन्ते याच्या एकएकट्या रूपावर काम भागविले जाते. आख्यातापेक्षा कृन्दताचा वापर अपभ्रशात खूपच मोठ्या प्रमाणावर आहे हें खरें; परतु दोहोचा जोड होण्यास आरभ झाल्याची चिन्हे मात्र त्यात नाहीत. यादव-मराठीत व प्राचीन हिंदीत ती चिन्हे आहेत. उदा०

| संस्कृत | अपभ्रश | प्राचीन हिंदी | प्राचीन मराठी |
|---|---|---|---|
| नमति | णमइ | नमता है | नमत आहे |
| नश्यति | णासइ | नसता है | नासत आहे |

तेव्हा अपभ्रंश व अर्वाचीन भाषा यांमधील दुवा कोणता ?

---

१ मराठी भाषा, उद्गम-विकास, पान ३५९

यादव-मराठीत कृदन्ताना अस, आह ( सं० अस् ) व हो ( सं० भू ) या धातूंच्या रूपाची जोड होऊन संयुक्त क्रियापदें बनतात. या धातूंची आख्यात रूपे पुढीलप्रमाणे आढळतात.

## अस ( < सं० अस् )

लट् : १ असें २ असूं – असो ३ अससि ४ असां
५ असे–आथि ६ असती, आथि

विधिलिङ्: असिजे

| | | | |
|---|---|---|---|
| आज्ञार्थे लोट् : | १ असो, असू | २ असों | ३ अस |
| | ४ असा | ५ असो | ६ असतु |
| भूत लङ् : | १ असे | २ असों | |
| | ३ असस | ४ असा, अमा | |
| | ५ असे | ६ असत | |
| भविष्ये लुट् : | १ असताहे | २ असताहों | |
| | ३ असतासि | ४ असताहा | |
| | ५ असता | ६ असते | |
| भविष्ये लृट् : | १ असैन | २ असूं, असो | |
| | ३ अससी–ल | ४ असाल | |
| | ५ असैल | ६ असतील | |
| वर्तमान कृदन्त : | असत | सात | |

## आह ( < सं० अस् )

| | | |
|---|---|---|
| लट् : | १ आहे | २ आहों |
| | ३ आहासि | ४ आहा |
| | ५ आहे | ६ आहेति |

इतर लकार नाहींत.

## हो ( < सं० भू )

| | | |
|---|---|---|
| लट् : | १ होई, होएं, होये | २ होऊं, होवों |
| | ३ होसि | ४ होआ, व्हा |
| | ५ होई, होए, होये | ६ होंति |

| | | |
|---|---|---|
| विधिलिङ् : | होइजे | |
| आज्ञार्थे लोट् : | १ हों, होऊं, होवों | २ होऊं, होवों |
| | ३ हो, होई, होये | ४ होआ, व्हा |
| | ५ हो, होवो | ६ होतु |
| भूते लङ् : | १ होई, होए, होये | २ होऊ, होवो |
| | ३ होस | ४ होआ, व्हा |
| | ५ होई, होए, होये | ६ होत |
| भविष्ये लुट् : | १ होताहे | २ होताहों |
| | ३ होतासि | ४ होताहा, होता |
| | ५ होता | ६ होते |
| भविष्ये लृट् : | १ होईन, होई | २ होऊ, होऊन |
| | ३ होसील | ४ होआल, व्हाल |
| | ५ होईल | ६ होतील |
| वर्त० कृदन्त : | होत | |

वरील रूपे कृदन्ताना लागून संयुक्त क्रियापदे होतात.

१ **वर्तमान कृदन्त + "अस-आह"** :— याची रूपे पुढीलप्रमाणें आढळतात—

'तूं का **जातासि**।' उद्ध० ११३ ; 'स्वरूप निजक्षेत्रीः **असतुचि असे**।' उद्ध० ३००

'वनवावी असती।' उद्ध० ५३; 'तो धडा असे घालिता।' ऋ० ६५

'देती आसी हे।' ऋ० १४६; 'रगमाळिका **सुचिताए** खुणे।' ऋ० ४९१

'कवण साहातु असे घावो।' ध० उ० ३; 'भीक्षा करीते असति।' स्मृ० ६२

'मी जन्म **गमीत असे**।' स्मृ० १६५; 'ते बाई थापनीती होती।' ली० १-१३

'तूं काहा **भीतासि**।' ली० ३-५४; 'का (तूं) **पाजीतीएसी**।' द० ४४

'वर्णना **करावीसे**।' शि० ३२६; 'दोघे...भली **दीसतींति**।' शि० २१४

'का **धावतुसां** वाउगिया।' शि० ६९५; 'साहतीसे, मातलीसी, करीतीसी।' शि० ६९४

'करितु आहों।' ज्ञा० ९–७; 'मिरवत असे।' ज्ञा० १–३

'इच्छितु असे जाणतें।' ज्ञा० १३–६; 'चिंतितु आहासि।' ज्ञा० २–१८०

'हे ड्डुळकीताये तरि का पाजीतीएसि।' दृ० ४४

'काइ **करितासि** : दूध **पीताएं**।' दृ० ४१

वरील रूपे यादव-मराठीतील संयुक्त क्रियापदाची म्हणून तर महत्त्वाची आहेतच; पण त्याचे महत्त्व आणखी एका दृष्टीने आहे. ते असे, की या संयुक्त क्रियापदापासूनच वर्तमान-मराठीतील वर्तमान काळ सिद्ध झाला. राजवाड्यांचे मत असे नाही. त्याच्या मते वर्तमान कृदन्ताला लट्‌चे प्रत्यय लावून वर्तमान-मराठी वर्तमान काळ साधिते. जसे,

| | | |
|---|---|---|
| १ | वट्टउं | वट्टहु |
| २ | वट्टसि | वट्टह |
| ३ | वट्टइ | वट्टंति |

या अपभ्रंशातील रूपाचे '१ उं, २ हुं, ३ सि, ४ ह, ५ इ, ६ ति' हे प्रत्यय राजवाड्याच्या मतें वर्तमान कृदन्ताला लागतात, आणि

करितु + उं = करितो (पु०)

करिती + उं = करित्ये (स्त्री०)

करितें + उं = करितें (नपुं०)

अशी रूपें बनतात. राजवाड्याचे हे मत भाषाशास्त्रदृष्ट्या अयुक्त आहे. वर्तमान कृदन्तांचा क्रियापदासारखा स्वतंत्र उपयोग रूढ असताना पुन्हा त्यांना लट्‌च्या प्रत्ययांची आवश्यकता भासण्याचे कारण नाही. उलट यादव-काळीं संयुक्त क्रियापदें होतीच; म्हणजे सामासिक आख्यात विभक्तीला आरंभ झालेला होताच. याचीच वाढ पुढे वर्तमान-मराठीत झाली. ज्ञानेश्वरींतील पुढील रूपे पहा—

"तूं अझुइं कां न विचारिसि। काइ हें **चिंतितु आहासि**।" ज्ञा० २–१८०

"हें जुंझ नव्हे प्रमादु। येथ प्रवर्तलेया **दीसतसे** बाधु।" ज्ञा० २–३१

"तरि तेचि येतुलां अवसरीं। काय **कीजतसे** येरएरीं।" ज्ञा० १–८७

---

१ ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान ११४–११५

"तैसें **विवरीतु असे** अनंतु । ..." ज्ञा० २–८७

"तेथ बाणवरि धनुर्धर । **वरिषताति** निरंतर ।" ज्ञा० १–१६६

वरील रूपांची मीमासा केली म्हणजे खालील संयुक्त क्रियापदे कल्पिता येतात—

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| १ | मी वर्तत असे, आहे | आम्ही वर्तत आह्यो, असो |
| २ | तू वर्तत आह्यासि | तुम्ही वर्तत आह्या, असा |
| ३ | तो वर्तत असे<br>तो वर्तत आहे | ते वर्तत आह्याति, आति |

यातील कृदन्ताच्या व अस–आहच्या रूपाच्या संयोगापासून वर्तमान मराठीनें वर्तमानकाळ साधला. वस्तुतः तो वर्णप्रक्रियेच्या नियमानींच सिद्ध होतो. वर्तमान-मराठींत एकवचनी 'तो' कसा आला याचे डॉडेरेटने[१] केलेलें विवेचन योग्य आहे. तो म्हणतो—

"It is significant to note that while the plural has practically still retained its archaic form, the 'O' model is already present in the archaic First Person plural. Thus, the 'O' impetus was communicated in a natural mannar from First Plural to First Singular and subsequently to the Second and Third sing. of modern present definite. The 'ta' form of the present participle had nothing to do with the "organic" evolution of the modern present definite."

तात्पर्य प्रो० ब्लोकें[२] मानतात त्याप्रमाणे हा 'तो' म्हणजे 'ता' चा पर्याय नसून त्याची स्वतंत्र सामासिक उपपत्ति आहे. तसेंच राजवाड्यांच्या मताप्रमाणें वर्त० कृदन्त + लट्चे प्रत्यय यापासून वर्तमान मराठीतील वर्तमानकाळाची उत्पत्ति नसून ती यादवकालीन संयुक्त क्रियापदापासून आहे.

---

१ Grammar Of Jnyanesvari, B. S. O. S. Vol. IV, pp.560–67

२ La Langue Marathe, 237

२ **भूत कृदन्त + क्रियापदाचीं रूपें :—**

"(मी) घायेवटला असे।" उद्ध० २३५
"तूं देखिलासी।" उद्ध० २०९
"तुम्ही आले होतेती।" स्मृ० १९८
"तुम्ही म्हणत होतीती।" स्मृ० १९७
"पाहाविले होते।" स्मृ० २२०
"ते धाले जाति।" दृ० ८
"अवघा जनु थकला ठेला असे।" लीला० ३
"मी बोलवीत गेलीये होतीये।" लीला० ३-४७

## § ५२ संकेतार्थ

**प्रथम** संकेतार्थी रूपें देतों—

"हेंचि थोडे गा वानणे। जे **बुझतासि** तूं॥" ज्ञा० १८-१३३१
"जो अभिलाखित मनोरथु चि। **पुरविता**।" ज्ञा० १-२७
"मी **वधिता** हे **मरते**। म्हणतु आहासि।" ज्ञा० २-१३७
"देव न **करिते** बळोबळि : तरि अमृताची पानकेळी : केवि **करिते**।" उद्ध० २२२
"परि **उचावता** त्रीकु : तरि प्रभुस्वरूप **भणतों**।" ऋ० ५४६
"वाटिभरि तुपा **जेवितासि** तरि प्रीतीचे प्रमाण **राखतें**।" स्मृ० ४५
"हेंचि जरि सर्पु **खाता** : तरि कवणि मायेचा पोटीं **रीगतां**।" स्मृ० २५
"कवणु संहारु **करिता** : तरि तेयातें उपाओ **पुसजिता**।" शि० ८४०
"यऱ्हविं थडीए **पडतां** : तरि हाडगुड **नुरतें मरता**।" लीला० १-४७

वरील रूपे संकेतार्थी होत हे स्पष्टच होय. संस्कृतातील लुट् पासून याची राजवाड्यानी लाविलेली उपपत्ति कशी अशास्त्रीय आहे हे मी याच भागांत क्र० ३८ मध्ये दाखविलें आहे. वस्तुतः हीं रूपे म्हणजे संयुक्त क्रियापदेंच मानिली पाहिजेत. त्याची मीमांसा अशीः—

वर्तमान कृदन्त + ‘ हो ’ धातूचीं रूपे = संकेतार्थी रूपें

प्रथम व द्वितीय पुरुषात धातूच्या वर्तमान कृदन्ताला ‘ हो ’ धातूच्या रूपाचा जोड होऊन संकेतार्थ बनतो, तर तृतीय पुरुषात ‘ हो ’ च्या रूपावाचूनच म्हणजे केवळ वर्तमान कृदन्तानेच तो साधला जातो. जसे—

| | | |
|---|---|---|
| १ | पडत + आहे | पडत + आहो |
| २ | पडत + आहासि | पडत + आहा |
| ३ | पडता–ती–ते | पडते-तिया–ती |

वरील उपपत्तीला इतिहासात आधार आहे. महाराष्ट्रीत वर्तमान कृदन्ताला असेच सहाय क्रियापद लागून संकेतार्थ होई. हेमचद्राचे पुढील सूत्र पहा—

“ क्रियातिपत्तेः स्थाने न्तमाणौ आदेशौ भवतः । होन्तो ।
होमाणो । अभविष्यदित्यर्थः ॥ ”–प्राकृतव्याकरणम्, ३-१८०

अपभ्रंश-प्रथातून ही रूपे नित्य येतात. मात्र पुष्कळ ठिकाणी सहाय क्रियापदाचा जोड न करता, केवळ वर्तमान कृदन्तच सकेतार्थी वापरले जाते. उदा०—

“ जइं दउनि तेणसह तउ **करंतु** तो कि असमाहिए सहु **मरंतु** । ”–भवि० २१-१
“ जइं पढमउं **जिहंतु** तुह एहउ तो किर को **मरंतु** मणि रेहउ । ” भवि० २–५

हीच परंपरा यादव-मराठीने पुढे चालविलेली दिसते. म्हणजे वर्तमान कृदन्ताला सकेतार्थ प्राप्त होणे हा आर्य भाषाचा स्वभावच दिसतो. बंगोलीमध्यें हाच प्रकार आहे. एतावता, ‘ भविष्ये लुट् ’ शी या संकेतार्थाचा संबंध नाहीं. दोन्ही सारखे दिसतात एवढेच. प्रो० ब्लोकं यानी साधारणतः अशीच उपपत्ति माडली आहे.

---

१ J. Beames : Comparative Grammar, Vol. III pp. 129

२ J. Bloch : La Langue Marathe, 244–245

## § ५३ सहाय क्रियापदें ( Ancillary Verbs )

यादव-मराठींत संयुक्त क्रियापदें आहेत, त्याप्रमाणे सहाय क्रियापदेंहि आहेत. ही कृदन्ताशीच जोडली जातात व विशेष अर्थ दाखवितात. पुढे काही सहाय क्रियापदें ससंदर्भ देतों—

१ जा( < सं० या )

"भावाचा फुलौरा होंतु जाये। मतिवरी।" ज्ञा० ९-२७
"तो प्राणातें घेऊनि जाये।" ज्ञा० ३-२०९
"एथ चित्तपण समरसे। विरौनि जाये।" ज्ञा० ६-३६७
"पैं आटौनि गेलेया सागर। मग तरंग ना नीर।"–ज्ञा० १५-४७३

१–अ : जाल ( < सं० जात–भूत कृदन्त 'जन्' चे )

"ते विदेहाचा पाटणी : पुर्वी असती जाली।" उद्ध० ३७६
"तो तियें आपेपरु : लाहाती जाली।" ऋ० ९७
"अवधारा कृष्णु ऐसें। बोलते जाले।" ज्ञा० ९–३३

२ ये ( < सं० ज्ञाय–कर्मणि )

राजवाड्याच्यो[१] मते 'ये' हा 'ज्ञा' चा अवशेष आहे. ज्ञाय कर्मणिपासून ते 'ये' हा कर्मणि धातु व्युत्पादितात.[२] त्याचे म्हणणें बरोबर वाटते. महाराष्ट्री अपभ्रंशावरून याला पुष्टि मिळते. पहा—

"अमिअं पाउअकव्व पढिऊं सोऊं अ जे ण आणन्ति।"
( गाथासप्तशती ) १–२

"अमृतं प्राकृतकाव्यं पठितुं श्रोतु च ये न जानन्ति।" (सं०)

अशाच अर्थी ते मराठीत येतें. जसे,

"तरि तें सांडी विखुरी गेले। **म्हणों ये** काइ।"–ज्ञा० ९–३९
"म्हणौनि गुज तऱ्ही तुझा ठाइं। **लपौं नेए**।"–ज्ञा० ९–४१
"तयावरि पावो **देऊंचि न ए** : तथा **ठेऊंचि न ए**।"–दृ० २६
"परि समग्रें अंधकारी : **राहाटों नये**।"–उद्ध० २९७

---

१ 'राजवाडे लेखसंग्रह' भाग २, पान १४–१५

२ ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायाचें संस्कृत भाषांतर, राजवाडेकृत, पान १८ ( धुळें, शके १८५६ )

" तूप रोटिया भरित **जेऊं ये** : आणि माझें **घेऊं नये** । " स्मृ० ७२

" तेथ ब्रह्मचर्याचिये सौरिये : केवि **पुरवाति ये** । " ऋ० ३४७

३ दे ( < सं० दा )

" तुज ज्ञानविज्ञान तैसे । वाटूनि देओ । " ज्ञा० ९–४४

" कफपित्ताचे थारे । उरो नेदी । " ज्ञा० ६–२१७

" सेजे आणिकासि रीगों नेदी । " दृ० ८५

४ घाल ( < ? )

" अमरपण उचिता । देउनि घली । " ज्ञा० १५–५५०

" न न्हाये तरि घालावे । मोकळूनि । " ज्ञा० ६–३८०

५ ठाक ( < सं० स्था )

" देहि जेयाची अहता । बुडौनि ठेली । " ज्ञा० १५–३९४

" तेया पुनरावृत्तीची वाट । मोडोनु ठेली । " ज्ञा० १५–२८८

" तैं होउनि ठाके सवसारु । मोक्षमयु । " ज्ञा० १५–२४

" ते पातेचि ठेली । दुखो ठेले । " लीला० ३

६ लाग ( < सं० लग् )

" जाल पडो लागे कर्मभ्रष्टा । भुलौनिया । " ज्ञा० १५–१६८

" मग लागला जवं पाहो । तवं ज्ञान ते तोचि । " ज्ञा० ६–८८

" मग ते मोहाची तुगुटी । नाचो लागे । " ज्ञा० ६–१२१

" श्रोतेया विनती : सुआवी न लगे । " उद्ध० १३

" सबंधु दीधला देवे : भणौनि लागती वाणावे । " ऋ० ३५५

७ पाह ( < सं० प्रार्थ् )

" म्हणौनि घोटु भरु पाहे एकसरा । आघवेयाचा । " ज्ञा० १५–७०

" दिठी जाकलोनि निगो पाए । ' ज्ञा० ६–२६७

८ राह ( < ? )

" मग सौम्य होउनि राहे । सुषुम्नेपासीं । " ज्ञा० ६–२४०

वर काही सहाय क्रियापदें दिली आहेत. संयुक्त क्रियापद आणि सहाय क्रियापद यांच्यामुळें यादव-मराठी चांगलीच सुसंपन्न झालेली दिसते. श्री० नेने[1]

---

१ ह० ना० नेने : ज्ञानेश्वरकालीन मराठी ( ज्ञा० दर्शन, साहित्यखंड, पान ४५ )

यांनी 'लाग' धातूचीं साधारण २५ विविध रूपे दिली आहेत ती आख्यात-विभक्तीची विविधता दाखवितील. येथवर आख्यातांचें प्रत्ययी, कृदन्तात्मक व सामासिक असें तिहेरी स्वरूप पाहिलें. पुढें क्रियाविशेषणाचा विचार करितों.

## § ५४ निपात

निपाताचे क्रियाविशेषणे, उद्गारवाची, उभयान्वयी व पादपूरक असे भेद राजवाडे करतात ते योग्य होत. यादव-मराठीतील निपात चार तऱ्हांनी सिद्ध होऊं शकतात.

१ विभक्तिरूपापासून—हे बहुधा तृतीया आणि सप्तमी यावरूनच निघतात. जसे – वेगे, विशेषे, स्वभावी.

२ सर्वनामापासून—आनौतें, एउता, जे, कैसे, जैसे, ऐसा.

३ जुन्या निपातापासून—आजि ( < स० अद्य ), पुनै, कीरू.

४ निपातात्मक शब्दापासून—बापु, पहातेआ, वहिले.

राजवाड्याची निपातयादी ज्ञानेश्वरीपुरती संपूर्ण असली तरी तींत उदाहरणें नाहींत. शिवाय महानुभावी ग्रथातून त्याशिवाय अनेक अधिक निपात येतात. तेव्हा दोहोची यादी राजवाडे पद्धतीने खाली देतो—

## § ५५ पादपूरक निपात

| | | | |
|---|---|---|---|
| १ चि | प्रा० | च्चिअ | सं० चित् ( तैसीचि, ठाओचि ) |
| २ हि | प्रा० | भि | स० अपि ( तयाही, जालेयाही ) |
| ३ इ | प्रा० | विवँ | सं० इव ( माझेनि, देऊनि ) |
| ४ पैं | प्रा० | प्पइ | सं० त्वै ( स्मृ० ११४ ) |
| ५ पा | | | स० बत ( ऋ० ४३, लीला० १–१४ ) |

---

१ ही व पुढील यादी म्हणजे राजवाडे यादीच्या ( ज्ञा० व्या०, पा० १३५-१४४ ) नकला नव्हत. राजवाड्यांनीं न दिलेले असे कांहीं ज्ञानेश्वरीतलि व इतर महानुभावी ग्रंथांतील निपात येथें संदर्भासह देत आहें. अपभ्रंश उदाहरणांकरितां 'णायकुमारचरिउ' व 'भावनासंधिप्रकरण' यांचा उपयोग केला आहे.

२ णायकुमारचरिउ, ३-८-३

६ कीरु, की — सं० किल (उद्ध० १६८, शि० १२४)

७ हान — स० हन्त (ज्ञा० ९-४२)

८ तेर — स० तर्हि (उद्ध० ६९४)

९ पुण < पुणअ, पुणउ स० पुनर्

"म्हणौनि मज आत्मारामा : पुण पढियेती।" उद्ध० ८०४

१० तव (स० तावत्) = तर

"सर्वज्ञ तव जाणताति आमुचा। पूर्वापारु।" ऋ० २६७

"उदक तव लागैल।" स्मृति० ६० ६

११ इ (स० अपि-हि-इ) लीला० १-१५

१२ नु (स० नु) शि० ४७०

## § ५६ उद्गारवाची

१ जय (सं० जय) — २ जी (स० जय)[२]–उद्ध० ५८

३ नमो (सं० नमस्) — ४ अगा, हागा, गा –स्मृ० ३६

५ हाहो, हाहोजी – शि० १०३१

६ हे, रे, आरे, ओ, वो, अवो, वा, आहा वा, आरेरे

७ अहो जी. होजी, हाजी–ऋ० ३२६, २७४

८ पा –ऋ० ४३

९ बापु –ऋ० २४

१० कटकटा –ज्ञा० ११ – ३९५, उद्ध० ११४, स्मृ० ९३, १३९

११ उगे

"पुण्याते म्हणे उगे . नाविकवेन्ही" –उद्ध० १८८

१२ ना (सं० न) "म्हणौनि भलेतेया। ज्ञानप्रकाश ना।"

–उद्ध० ६२७; ऋ० २४८

१३ पुरे–"म्हणे स्वर्गसुखाते पुरे।" – ऋ० २१४

१४ आइ —स्मृ० ७७

---

१ सामान्यतः हें उभयान्वयी असतें. पण खालील उदाहरणांत केवळ पादपूरक आहे.
"तर श्रीकृष्णराओ बोलिला।" उद्ध० ६९४

२ राजवाडे 'आर्य' पासून व्युत्पादितात. ज्ञा० व्या०, पान १३६

१५ हारे, व्हो –लीला० १–३३, वच्छ० ८३
१६ हो कां जी –लीला० १–५८
१७ है रे, हा रे –लीला० ३–४९, वच्छ० ९५
१८ ना वो आइ–दृ० ५९
१९ बापु रे चोज–शि० २७८
२० हो काज (= हो काय, जणुं काय)
"कीं हो काज भवज्वरा : शाति जैसी।"–ऋ० ३९५
"भणौनि हो काज घेतले मिषु।"–शि० ८३
२१ आवो आवो –शि० २१८
२२ होहो –ज्ञा० ६–१४२

## § ५७ उभयान्वयी

१ जवं-तवं (सं० यावत्-तावत्) –उद्ध० ५९, लीला० १-६४
२ पुण-णु (सं० पुनर्) –उद्ध० ७०
३ जैं-तैं
४ की (सं० किंवा) –ऋ० १८६
५ के (= आणि) "वच्छपद के समुद्र।" ऋ० २८८
६ तवंचिवेन्ही –ऋ० ११८
७ वरि (सं० उपरि) = शिवाय
"मी सर्वभूती असे अहर्नीसी। वरि देह ते तू नव्हेसि।" –उद्ध० १५५
"ऐसा जात्यधु अधस्तु। वरि भवरोगी ग्रस्तु।"–ऋ० ७
"तो अध्याय सहावा। वरि साहित्याचिया बरवा।" –ज्ञा० ६-१३
ऋ० ३०, ४४५, ज्ञा० ४–१९१
८ नावेकवेन्ही –उ० १८८
९ आनीक (सं० अन्यत्क)
"आनीक आचारे पवित्रता। होए तीर्थकुता।"–उद्ध० २८२
"ब्रह्मासि आणिक जीवा। स्वरूपें भेदु जाणावा।"–उद्ध० ५८६
१० ऐसांही ('ऐस' याची सप्तमी + हि) = असें असतांनाहि
"ऐसांही जीवांसि संसारु। तो येणेंचि कारणें।" उद्ध० ६२०

११ जे ( सं० यत् ) = कारण

"...भीचि गेला बरळु । जे इयेचा मस्तकु तळु । पायेचि ना ।" उद्ध० ७५४

"निकियापरि संतोषला । जे संवादु फावला ।" ज्ञा० ६-८

"न लगे श्रोतेयासि कडसावे । जे अधिकारिये ।" ज्ञा० ६-२७

१२ फुन-पुन ( सं० पुनर् ) ऋ० ४१२ ( शिवाय, वर )

"पुन हे प्रकटली श्रीचक्रपाणी । तो कळसोद्धरू ।" ऋ० १०

१३ पुनै ( स० पुनरपि ) -ऋ० २४३

१४ जे ( स० यत् ) = की; ऋ० २९६

"इये हाचि उपाओ : जे मिळे यादवराओ ।" शि० ८४६

१५ जेव्हळी, तेव्हळी, केव्हळी -धवळे पू० ६०

१६ तव--मा

"आता तव माझिये दसेचा नव्हे : मा तुमचिये दसेचा काइ होइल ।" स्मृ० १९

१७ येवपर्यंत -स्मृ० ३०

१८ येन्हवी ( सं० इतरथा अपि ) स्मृ० ३०

१९ जवजव-तवतव ( द्विरुक्त ) = जो जो - तो तो

" जंव जव जाणता : तंव तंव नेणता ।" स्मृ० ६७

२० मा ( = तर )

" मी काइ चोळीका महात्मा : मा हे आणले असें ।" स्मृ० ९९

"हे नव्हे मा रोकडे ।" ज्ञा० ११-३८६

२१ मगा-आता ( = मघाशी आणि आताहि )

" मगा तरि मगा : आता तरि आता ।" लीला० २-१३

२२ ना तरि -शि० ५९७, ज्ञा० ६-११७

२३ जेवि, तेवि, केवि - वच्छ० २१७

२४ आणि ( सं० अन्यत्क )

२५ का ( सं० किम् ) = अथवा

" दिठीचि पाहता निविजे । का तोंड भरौनि बोलिजे ।" ज्ञा० ६-११७

" तेथ सुहृद आणि शत्रु । कां उदास आणि मित्रु " ज्ञा० ६-९४

२६ तरी करितां

" तैसी गुरुकृपा होए। तरी करिता काय आपु नोहे " ज्ञा० ९-३५

२७ म्हणौनि ( सं० भणित्वा )

" म्हणौनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण। " ज्ञा० ९-४४८

२८ वांचौनि-वाचूनु

" वांचूनु या वेगळे। रूप करणें हे न मिळे। " ज्ञा० १३-८४५

" वारा अभाळचि फेडी। वाचौनि सूर्याते न घडी। " ज्ञा० १८-१२२५

२९ आणि ( = तर )

" गोसावियाचेया जाल आणि ( = तर ) होइल। " लीला० ३-३०

३० तरि ( = सुद्धा, शिवाय )

" कालि तरि कालि आलियात: आजि तरि आजि आलियात। "
( = कालहि, आजहि ) ली० ३-३९

३१ तंव ( = पर्यंत )

" धायतव खाइजे : पाहे तव निजिजे। " लीला० ३-४९

## § ५८ क्रियाविशेषणें

१ माघौते, माघौती, – उद्ध० ५३, ३२३

२ पुडुती – उद्ध० ७८, ज्ञा० ८–२६१, १८–१७८८

३ स्वभावी ( स० स्वभावेन ) – उद्ध० ८०, १३६

४ अवचिते – उद्ध० १०१

५ निन्हा – उद्ध० १३४, वच्छ० ८२, ज्ञा० १७–२४८

६ आद्युइं ( सं० अद्यापि ) – उद्ध० १३५, शि० ७८

७ वेगांचि ( सं० वेगेन ) – उद्ध० १३८

८ मागा – उद्ध० १४०, ऋ० ४९६

९ सवें – उद्ध० १८०, ऋ० ५३९

१० बहुतकरुनि – उद्ध० १८३

११ विशेषता ( सं० विशेषतः ) – उद्ध० २२४

१२ भलेतेया परी – उद्ध० २२६, ३१३

१३ अवचटा ( = अकस्मात् )–उद्ध० २३०, ५१९, द० ७७
१४ सहसा ( सं० ) – उद्ध० ३२९, ऋ० ७८
१५ देखतखेवो – उद्ध० ३६०, ७७०
१६ गरगरा – उद्ध० २०९
१७ आनौते ( स० अन्यतः ) – उद्ध० ३८०, ऋ० ५६७, ज्ञा० १२-७९
१८ वायाचि ( सं० व्यर्थ ) – उद्ध० ३८३, स्मृ० ३२
१९ आतु-बाहिरि – उद्ध० ३८६
२० निडे ( स० निकट ) – उद्ध० ३९८
२१ असासीतु – उद्ध० ४४८, ३२५
२२ वरुती-वरौती ( स० उपरि ) – उद्ध० ४९७
२३ हळु-हळु ( स० लघु ) – उद्ध० ५२३
२४ वायाविण ( स० व्यर्थ + विना ) – उद्ध० ६२६, शि० १३५
२५ घडिभरि – उद्ध० ८०२
२६ निरंतरी – रु, – उद्ध० ७८५, शि० ३६
२७ ऐकेंवेळे ( = एकदम ) – उद्ध० ७५२, शि० १३८
२८ एकाकी – उद्ध० ७२७
२९ वेळोवेळा – उद्ध० ६८६
३० पूर्वी – उद्ध० ६६६
३१ तडकु ( = सपाट्याने )–उद्ध० ६४८ "अधकारु धाडी तडकु : रविराजुचि ।"
३२ फुकाचि – उद्ध० ६१७
३३ रात्रिदेओ ( रात्रि + दी ) – उद्ध० ५०१
३४ जेवि, तेवि, केवि
३५ के – ऋ० २५१
३६ कहीं ( स० कदापि ) – ऋ० २८६
३७ सापे ( < संपई < सप्रति ) – ऋ० १२४, स्मृ० ७१
३८ विपाये – ऋ० १७९
३९ साउमा ( सं० संमुख ) – ऋ० ८२
४० आपेपरु – ऋ० ९७

४१ सुखी (सं० सुखेन) – ऋ० १५५ "रमती सुखी : मानसीं आपुलाचि।"
४२ सैरा ( सं० स्वैर ) – ऋ० ३१३
४३ आपे आपे ( सं० आत्मन् )–ऋ० ३४८
४४ हावा ( = निश्चयाने ) – ऋ० ३६७
४५ सदा ( सं० )
४६ सदाकाळु ( सं० ) – ऋ० ४५२
४७ पुढारा ( सं० पुरतस् ) – ऋ० ५६०
४८ दुरि ( सं० दूर ) – ऋ० ६३४
४९ सरिसु ( = सह ) – धवळे पू० २३
५० जेथ, तेथ, जेथचि तेथ ( = जेथे तेथे ) – धवळे पू० ३३
५१ पुनती पुनती ( स० पुनर् ) – धवळे पू० ५३
५२ तळउपर ( सं० तले + उपरि ) – धवळे पू० ७१, ज्ञा० १३-४१७
५३ मधी ( सं० मध्ये ) – धवळे उ० २८
५४ भलतेधवा – स्मृ० ३४, १३५
५५ वाये वाये ( सं० व्यर्थ ) – स्मृ० ३४, " वाये वाये ओळग्वीचेया घरा न वचावे।" स्मृ० ५८, शि० १०३२
५६ पैल, पैलाकडूनि
५७ पैन्हा – दृ० २९, स्मृ० ८०, लीला० १ – १२, ३–३७
५८ मागीलाकडूनि, मागिलाचि, मागौतिआ – स्मृ० ७९ तें ८४, शि० ९०८
५९ सामोरें ( सं० संमुखर ) – स्मृ० २०४
६० ऐलाडि, पैलाडि – लीला० ३, दृ० ६, ज्ञा० १३-८४०
६१ वरिलाकडे, खालिलाकडे, ऐलीकडे – लीला० १–४८, ज्ञा० ९-५१
६२ आजिलागौनि, तैं लागौनि ( = पासून ) – स्मृ० ८९, १०७
६३ जैं, तैं, तैंहूनि – स्मृ० ११३
६४ दिसवडी ( = रोजरोज ) – स्मृ० १०१
६५ सावेया ( सं० स्वभावतः ) – स्मृ० १२२
६६ आजि ( सं० अद्य ) – ऋ० २१२, शि० ६८

६७ कालि – स्मृ० १६७, लीला० १–१७
६८ बाहीर-बाहिरी (=बाहेरच्याबाहेर) – स्मृ० ९७, १५२, शि० ४९४
६९ भलतेथ, भलतया, भलतैसें – स्मृ० २४१
७० जवळां ( स० युत + ल ) – स्मृ० २६१
७१ लवलव ( स० लघु ) – लीला० १–४
७२ अरुते ( स० अरतस् ) – लीला० ३
७३ परुते ( स० पुरतस् ) – लीला १-२४
७४ काहा, काह्या ( स० किहि ) – लीला० ३-५४
७५ झडती –द० ९८
७६ आतुल-बाहिरिल – द० १-२
७७ नावेक ( स० नामएक ) – शि० १३४, ज्ञा० ७-१८०
७८ स्वभावतू ( सं० स्वभावतः ) – शि० ७१
७९ पुढा ( स० पुरतस् ) – शि० १०७४
८० वरिचा वरि ( स० उपरि ) – शि० १००८
८१ झडकरौनि, झडझडौनि – शि० ५११
८२ जेउती, तेउती, केउती, – शि० ८२८
८३ सहजे ( स० सहज ) – वच्छ० २७, ज्ञा० ९-२६
८४ आधीं ( स० आद्य )
८५ येथौनि, जेथौनि, तेथौनि, कोठौनि
८६ अळुमाळु ( स० अल्पमल्प ) – शि० ४१
८७ नावा नावा ( वारवार ) – ज्ञा० ९-४२, १६–१७८
८८ आहाचु ( वरवर ) – ज्ञा० २–३९, ६–२५
८९ नावभरि ( क्षणभर )
९० खेव वो ( “ देखतखेवो, उदैजतखेवो ” ) – ज्ञा० १६-१४
९१ अऱ्हा-परौते ( इकडे-तिकडे ) – ज्ञा० १५-७५
९२ पुढा माघौतें ( पुढे-मागे ) – ज्ञा० १५-७५
९३ एकसरें ( एकदम ) – ज्ञा० ६-१५५
९४ **चौम्हेरि** ( चतुर् + मेर ) = चहूंबाजूंस –ज्ञा० २-२००
“ ना तरि अरण्यीं शव साडिजे । तें **चौम्हेरि** गिधिं विदारिजे । ”

कोंकणींत 'मेर' हा शब्द 'सीमा, बाजू' या अर्थी आहेच. राजवाडे या निपाताचा उल्लेख करीत नाहीत.

९५ **साविया-संविया** (हें खालील तीन भिन्न भिन्न अर्थी येतें)
(= निःशेष) " मना येया बाहीरिलीकडे। येयावेयाचि सवेचि साविया मोडे।" ज्ञा० ८-१०९
(= योगायोगाने) " परि साव्हिआ हि उंच होइल। तरि आग हान डोलैल।" ज्ञा० ६-१८४
(= तात्काळ) " जें अमृतही परी नावडे। ऐसे सवियांची अरोचक जैं पडे।" ज्ञा० ४-१९५

९६ **झणें–झणि** (नकारार्थी)
" इद्रियाचा चाकवरा: झणें भवसि गरगरा।" उद्ध० २०९
" जरि ब्रह्मयाचेनि सळे : झणें उठीति कव्हणें वेळें।" ऋ० ४३४
" झणी माय करिसी चिंता यादवाचा रावो कृष्ण पाहे वो।" धवळे पू० ३२
" परि पार्था हे झणें। सायास घेसि हो मनें।" ज्ञा० ६-३५
हिंदींत '**झिन**' हे अव्यय याच अर्थी येतें. पहा–
" चल भाई **विलम झिन**"=विलंब करूं नकोस.

९७ **झिन्न** (= चटकन्) यावरूनच आधुनिक 'झाणिं' निघालें. या 'झणी'चा व यादव-झणीचा संबंध नाही. उदा०
" मुरडता झिन्न वेगु : डोळा सुजावती ना।"–शि० १०१२

९८ **ऐसां** (= असें असताहि. 'ऐस'ची सप्तमी)
" ऐसाही झाडिजे तरि घड तुटे परि झडेना।"–दृ० ५६
" ऐसाही मीठ मीरपुडी लाऊनि खाइजे तरि तोडीं खतचि पडे।"–दृ० ३१

---

१ हिरालाल : छत्तीसगडी बोलीचें व्याकरण, पान १४४
२ हें विशेषतः महानुभावी गद्यांतच आढळतें.

९९ **मा** ( त्रिवार )

" तो कहींचि नुधरे : मा नुधरे : मा कहींचि नुधरे । "–स्मृ० ३५

१०० **हों का** : " ना तें हों का सेजार : परसुखाचें । "–ऋ० २२५

यांखेरीज सर्वनामांपासून साधित अशीं अनेक अव्ययें यादव-मराठींत आहेत. परंतु त्याची यादी राजवाड्यांनी समग्र दिली असल्यानें येथें देण्याचें कारण नाही. राजवाड्यांची ज्ञानेश्वरीपुरती निपात-यादी पाहिली म्हणजे महानुभावी ग्रंथात तदितर अनेक निपात येत हे स्वच्छ दिसतें. " झिन्न, तवं–मा, थैक, तडकु " वगैरे निपात ज्ञानेश्वरीबाहेर आढळतात. वर दिलेली यादी अर्थात् संपूर्ण नाही, परंतु निपातांचा विस्तार तीवरून समजेल. अपभ्रंशांत निपात-विस्तार एवढा नव्हता हे " भावनासंधिप्रकरण " व " सावयधम्मदोहा " या ग्रंथावरून दिसते. तरीहि प्राचीन मराठीतील बरेच निपात अपभ्रंशावरूनच सिद्ध होतात हे खरे. अशाची व्युत्पत्ति मी त्या त्या स्थळी दिली आहे. तात्पर्य, निपात-प्रकरण मराठीनें अपभ्रंशद्वारा घेतलें, व स्वतंत्र रीत्या विस्तृत केलें.

# भाग तिसरा
# शब्दसिद्धि, प्रयोग, वाक्यरचना, अर्थप्रक्रिया
इत्यादि

## § १ शब्दसिद्धि

यादव-मराठीत शब्दसिद्धीचे महत्त्वाचे प्रकार खालीलप्रमाणें आढळतात—

| | | |
|---|---|---|
| (अ) | तद्धितप्रक्रिया | Formatives |
| (आ) | ध्वन्यनुकारी | Onomatopoeia |
| (इ) | सादृशब्द | Echo-words |
| (ई) | आम्रेडित | |
| (उ) | सामासिक व द्विरुक्त | Reduplicatives |
| (ऊ) | अकरणदर्शक | Negatives |
| (ए) | नामधातु | Noun-verbs |
| (ऐ) | क्रियानामे | Verbal Nouns. |

## § २ तद्धितप्रक्रिया

यादव-मराठीत साधित शब्दाची संख्या विपुल आहे. ज्या तद्धित प्रत्ययांनीं हे साधित शब्द बनले आहेत ते मुख्यतः महाराष्ट्री व अपभ्रंश यांच्या द्वारा आलेले आहेत. पुढें कांहीं तद्धितप्रत्यय त्यांच्या विशेषासह देतों—

अक (< सं॰ अक) : देशकु, थडक

इक (< सं॰ इक < अप॰ इक्क) : सोइरिक, वऱ्हाडिक, वैसिक, पेखणिक, वारिक

उक (< अप॰ उक्क) : सामानुक, निरवणुक, झळंबुक, जाचणुक

इव : भारिवा, खडीव, आवारिव, राणीव, हस्तीवा, वाठीव, सोलीव, सांभारीव

इउ ( < सं० इव ) : कांतिउ, वोतिउ, थळिउ
आळा : कुरुवाळा, जीवाळा, करुणाळा, काटाळा, पाटोळा, गुंडाळा
आळी : विद्याळी, माचळी, जुआळी, पासाळी
वळ : देशवळु, सेजवळ
आलु : ( सं० आलु ) : पाखालु, उजालु, सियालु, इसालु वेल्हाळ, वंचळ
आळ : घोंसाळ, शिसाळ, चविढाळ, महंचळ, ढसाळ, खडुळ
उत : धडौता
इत : वेळाइतु, रिणाइतु
ल-ली : साइली, माणिकुल, पातुली, इवल, तेथल
ले : ( हीनत्वदर्शक ) : जीयालें, थोकलें, आगलें
ल : ( स्वार्थे ) : एकल, दादुल, बाइल, वडिल, उगेला, माउली
इल : ( सं० इल; प्रा० इल्ल ) : आदिल, वरिल, पहिल, बाहिरिल, पूर्वील
ठा : ( सं० स्थः ) : घरठा, वसैठा, काभिठा, आगिठा, मागठा, चव्हाठा, पाणोठा
डें : ( हीनत्वदर्शक ) : रूपडे, राकडें, बापुडें, थोबडें, निऱ्हावडें
डा : निबरडा, उखरडा, वारुडा, दुधडा, धादुडा, वेगाडा
डी : उत्तरडी, राखौडी, झांपडी, बाधौडी, सेतडी, लहुडी
वट : वायेवट, घडिवट, सीगवट, वळिवट, पायेवट
वड : लळेवडु, वाघवड
अस-इस : डोळस, गोडिस
रा : मोकरा, धुळौरा, फुलौरा, केदारा, उबारा, गोडिरा
री : दातिरी, खुलौरी, उजिएरी
रूं : गोवळरूं, बटिकुरूं, गोरुं, हावरु, पाझरु, उपंढरु, गोवरु ( तासगांव ताम्रपट )

---

१ "कामतामध्यें चव्हवंटा।" – पाटण शिलालेख, ओळ २५

ट : वरवंटु, थेंबटु, घरटी ( स्त्री० ), तांबट, चोखट, वंकट, सानटें, चिरटी, धाकुट, भिंगुरटी, कोनट, थोरट

वन : बोळावन, सांटवन, आंगवण, विसंवण, कालवण, वोल्हावन, माजवन

वाण : लोणवाण, केळवाण

लग : वाणलग, आगलग

णी : चोखणी, चोवणी

वणी : हातवणी, पायेवणी, मुळवणी, बुझावणी, विणावणी

कारू : जीळीकारू, माळेकारू, फुटाणेकारू, मोलकरू, घोडेकारू, कातेकारू, कासोटेकारू

इप : कुळीपु ( शि० ८६१ )

च : ( सं० त्यत् ) गांवच, एथच, तियेच

## § ३ भाववाचक नाम

भाववाचक नाम साधण्याचे तद्धित-प्रत्यय खालील प्रमाणें आढळतात—

१ पण : ( < अप० त्तण-प्पण < प्रा० त्तण < सं० त्व ) चोखाळेपण, पाईकपण, राणेपण, आपुलेंपण, पढिलेपण, दुसुरेंपण, गोडिरेपण, सालेपण, पितेपण, चौरसपण

२ पैं : ( < प्रा० प्य < सं० त्म्य ) : आपणपें < प्रा० आप्पणाप्यं < सं० आत्मात्म्यम्

३ एं : ( < अप० त्तण < प्रा० त्तण < सं० त्व ): रांजवाडे अपभ्रंशात 'प्पण' हा एकच प्रत्यय मानतात. वास्तविक 'प्पण' आणि 'त्तण' अशीं दोन रूपें अपभ्रंशांत आहेत.

---

१ राजवाडे : ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान १३०

उदा० मणुयत्तणु ( मनुष्यत्वं ); पवित्तणु ( पवित्र-त्वं )
यादव-मराठींत वर्णप्रक्रियेनें हा 'एं' होतो. पहा—
" कीं तृष्णेचें **साजणें** "—उद्ध० ३०९ ( सं० सहजन + त्वं )
" मी वर्तें तंव **मऱ्हाटें** वर्तेल।"–स्मृ० ८६ ( = मराठेपण )
" चैद्यें घेतिलें मोक्षाचे **निजवणें**।"–शि० १०८६ ( = आत्म-त्वं )

४ इक : कोंवळिक, जवळिक ( ह० १११ )

५ ई : ( < य )

" नवल **जिंनि** जाली : वैराग्यांसि।" – उद्ध० ४४ ( स० जीवनं चे भाववाचक )
" वेधा **बाहाळी** जाली।" – उद्ध० ४७ ( = विपुलता )
" की आत्मजाची **थोरी**। – ऋ० ३५३
" जवळी " ( ऋ० १७० ); "गुती" ( ध० पू० ४९ ) "खाराणी" ( ह० १०५ )

६ ता-ती ( स० ):

" ना ते मूर्त जाली **संगीता** : चंद्रकीरणींची।" उद्ध० ४२२
" भवावरी पवित्रता : जेथची तीर्थपूतता।" ऋ० २४१
'काकुळती' ( ऋ० ६२६ )

७ इव : ( < अप० व्व < सं० त्व ...? )

" तियेचिये **सिहाणिवेचि** रूढी : मानली तयां।" उद्ध० ४७७
" जे कांडाचेनि आंधारें करिति **रातिवा** : पारिकेआंवरी।" – शि० ९४४ ( = रात्रपणा )

---

१ भावनासंधिप्रकरण ( संपादक, मोदी )

८ त्व : (सं०) " **सौकर्यत्वें** दीसतोसी।" – स्मृ० १२२
" हीरवट आणि **कठिणत्व**।" – द० ६६

९ य : (सं०) " मग **उदास्य** स्विकारिलें।" – लीळा० १-५७

१० आरु : (सं० आचार...?)
" जाणौनि आपुला पतिकरु : तया करावया **पाहुणारु**।"
– उद्ध० ४७८
" तेणें **पुढारु** साचु केला।"–स्मृ० २६१(=पुढारीपण)

११ अविकृत : क्वचित्, तद्धित प्रत्यय न लावता विशेषणेंच भाववाचक नामासारखीं वापरलेली आहेत. उदा०
" **हीरवट** आणि कठिणत्व हे दोन्ही दोष जाती :
**सुरै** आणि मृदुत्व हे गुण एति।" – द० ६६
(सं० सुरभि)

१२ ऐ : (< ई < सं० ता)[१]
" चावटै, एकवंकै, ग्राहकै, राउतै " (शि० १००१)

तात्पर्य, भाववाचक नाम साधण्याचे इतके बारा प्रकार यादव-मराठीत आहेत. ज्ञानेश्वरीत मात्र यापैकीं पांच सहाच आढळतात. येथें महानुभाव-ग्रंथातील प्रत्ययविविधता उघड आहे.

## § ४ द्विरुक्त शब्द (Reduplicatives)

शब्दाची किंवा त्यांतील काही भागाची द्विरुक्ति करून नवीन शब्द वा शब्दांची जोडी साधणें हा यादव-मराठींतील शब्दसिद्धीचा एक महत्त्वाचा प्रकार आहे. द्विरुक्तीच्या या सदराखाली ध्वन्यनुकारी शब्द, सादशब्द, सामासिक शब्द, पौनःपुन्यवाचक शब्द इत्यादि अनेक भाग येतात. हे सर्व प्रकार मराठीनें संस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंश या परंपरेनेंच घेतले आहेत. मात्र सादशब्दांची प्रथा द्राविडीपासून आली. शब्दसिद्धीचे इतर प्रकार संस्कृत-महाराष्ट्रींत आहेतच. संस्कृतांतील 'किकिराकृ', 'मस्मसा कृ', 'घुरघुरायते" 'कोकिल' इत्यादि नादानुकारी व 'प्राचीं प्राचीम्', 'गृहेगृहे', 'उत्तरोत्तर',

---

१ राजवाडे : ज्ञानेश्वरीचें व्याकरण, पान १३०

'पूर्वापूर्व', 'इतरेतर' वगैरे आम्रेडित शब्द प्रसिद्धच आहेत. वैदिक संस्कृतात 'पिब पिब', 'यजस्व यजस्व', 'स्तुहि स्तुहि' इत्यादि द्विरुक्त क्रियापदें आढळतात. संस्कृतातील शब्दसिद्धीच्या या प्रकारांची वाकरनागलें आणि रेनों यांनीं दिलेली उदाहरणें पाहून कल्पना येते. प्राकृतांतील 'अन्नमन्न,' 'एक्कमेक्क', 'खंडाखंडी', 'घुम्माघुम्मी', 'अलट्टपलट्ट', 'वइल्लवइल्ल' हे प्राकृतातील द्विरुक्त शब्द संस्कृत-पालीच्या धर्तीवरच आहेत. प्राकृतातील द्विरुक्त शब्दांची मीमासा डॉ० कात्रे यानी विस्तारानें केली आहे. तीवरून यादव-मराठीनें शब्दसिद्धीची ही साधने परंपरेनें कशीं उचलली याची कल्पना येईल. डॉ० कात्रे म्हणतात—

"All these different types in reality go to form but one category which plays an important role in the development of Middle and Modern Indo-Aryan languages, and the term "Reduplicative" properly expresses the totality of these formations." ४

वर्तमान-मराठींत द्विरुक्त शब्दाची संख्या साधारणत: १५०० पर्यंत मानली जाते. पुढें यादव-मराठीतील द्विरुक्त शब्दाचे प्रकार सोदाहरण व सटीक देतो—

१ **ध्वन्यनुकारी**:—नादानुरोखानें शब्द बनविणें हा प्रत्येक भाषेचा स्वभावच आहे. मराठीनें ध्वन्यनुकारी शब्दाची प्रथा द्राविडीपासून घेतली असावी हें काहीं पडितांचें म्हणणे कसें भ्रात आहे हे मी पुढील भागात विस्तारानें दाखविलें आहेच. संस्कृत-महाराष्ट्रीपेक्षा अपभ्रंशात ध्वन्यनुकारी शब्दांचे प्राबल्य विशेषच आढळतें. उदाहरणार्थ, "णायकुमारचरिउ" या अपभ्रंशकाव्यातील कांहीं शब्द पहा—

---

१ Wackernagal : Altindische Grammatik II. 1, pp 6–9, 329, 143

२ L. Renou, in B. S. O. S. Vol. 10

३ S. M. Katre; Reduplicatives in Indo-Aryan "–Bulletin of the Deccan College Research Inst, Vol, I, No. 1

४ Ibid, pp. 60

"कणगणंति, किलकिलंति, गुमुगुमुगुमंत, जिगिजिगिजिगंत, झलझलइ, झणझणझणंत, टणटणटणंत, ललललंति, सलसलंति" इत्यादि. इतक्या प्रमाणांत जरी नव्हे तरी यादव-मराठीनें अपभ्रंशांचीच परंपरा पुढें चालू केली. येथें द्राविडी संसर्गाचा अगदीं संबंध नाही. काहीं ध्वन्यनुकारी शब्द—

| | | | |
|---|---|---|---|
| झिळिमिळी | उद्ध० ७४ | डुळकणें | दृ० ४४ |
| कडाडिलें | उद्ध० १०१ | झावळें | दृ० १०२ |
| तिडिकाय | उद्ध० १७५ | बाबळैले | शि० ४१ |
| चुडुफाय | उद्ध० १७५ | धुधुवात | शि० ४५५ |
| कुडकुडा | उद्ध० ३१६ | फुफुवात | शि० ४५७ |
| गुळळा | ऋ० ५३८ | कसकुसी | शि० ४३५ |
| झाजरे | ऋ० ५३३ | भडाडु | शि० ४९७ |
| बोंबी | ऋ० ५६९ | धगधगित | शि० ९१४ |
| झळकलिता | ध० उ० ४२ | सनसनिती | शि० ५२२ ते ५२८ |
| गजंबु | ध० उ० ३२ | तराॅरिती | |
| झनानिती | मा० स्व० ३० | घुरघुरिती | |
| कीलुकीलु | लीला० १–२२ | दुमदुमिती | |
| बुडडा | ज्ञा० ७–६७ | घनघनिती | |
| उह्लाल | ज्ञा० ७–७३ | खिनखिनिती | |
| बोंबले | ज्ञा० ७–८५ | डमडमिती | |
| झडझडौनि | ज्ञा० ९–५२१ | कडकडिती | |
| खळाळ | उद्ध० ११० | गिडगिडिआं | |
| झळाळ | उद्ध० १९२ | फडफडिती | |
| कडकडी, गडबडी | उद्ध० २०४ | लफलफिती | |
| झीगीमीगी | उद्ध० ३४० | फगफगिती | |
| खुरखुरित | उद्ध० ३६३ | थैक | दृ० ६० |
| घुरघुरी, खांकरी | उद्ध० ३८५ | खांखाळि | शि० ५०३ |
| थवथवित | उद्ध० ७५८ | धडधडाट | शि० १०५५ |
| टाहुवा | ऋ० ९१ | गजबजाट | शि० १०५५ |

| | | | |
|---|---|---|---|
| मीटिमीटि | ऋ० ५१४ | हिंहिंकारु | शि० १००५ |
| रूं रूं, ठकठक | स्मृ० ६१ | | |
| **पचकरुनि** थुंकली | स्मृ० १०६ | | |
| लवलवौनि | स्मृ० १३१ | | |
| बोबाति | लीला० १–६६ | | |

२ **सादशब्द**[1]:—सादशब्दात पहिल्या शब्दाची संपूर्ण पुनरुक्ति होत नसून किंचित् पुनरुक्ति होते. मूळ शब्दाचा अर्थ व नाद हे सादशब्दांत कायम असतात. परंतु मूळ शब्दातील एका वर्णाचा मात्र सादशब्दांत बदल होतो. (उदा० घोडा-बिडा, घर-बिर). सादशब्दाना 'किंचित् द्विरुक्त' शब्द म्हणता येईल. परंतु मूळ इंग्रजी शब्दाचे 'सादशब्द' हें भाषांतरच मला अधिक बरे वाटते. साद-शब्दाची प्रथा मराठीने द्राविडीपासून कशी घेतली याचें सविस्तर विवेचन मीं पुढील भागात[2] केले आहे. महाराष्ट्री-अपभ्रंशात असे सादशब्द नाहींत. यादव-मराठीत आहेत. मात्र वर्तमान-मराठीत ज्याप्रमाणें 'बि' हा सादवर्ण निश्चित आहे तसा तो यादव-मराठीत नाही. द्राविडी-पासून ही प्रथा नुकतीच घेतल्यानें यादव-मराठी एकच सादवर्ण न वापरतां "त, द, व, प, ग" असे अनेक वापरते. या विविधतेवरून सादशब्दांचा प्रकार बाल्यावस्थेंत असल्याचे स्पष्ट दिसते. कानडीतील 'गि' हा सादवर्णहि वापरल्याचीं उदाहरणे क्वचित् आहेत. सादशब्दाना स्वतत्र शब्द मानावेत कीं नाहीं याविषयीं मतैक्य नाही[3]. पुढे यादव-मराठीतील काही सादशब्द देतों—

| | | | |
|---|---|---|---|
| पाटेफुटे | उद्ध० १२२ | हाडगुड | लीला० १-४७, द० ९२ |
| बळोवली | उद्ध० २२२ | अशेषविशेष | द० १०२ |
| चलवल | उद्ध० ४५२ | उटेरेटे | शि० १३६ |
| जातिजुती | ध० उ० ५४ | पेणोवेणा | शि० ५७६ |
| गीतमातु | स्मृ० ८९ | बाहिरीवाहिरी | शि० ४९४ |

१ Echo-words

२ भाग ४, क्र० ४

३ Jesperson : Language, pp. 313

| | | | |
|---|---|---|---|
| लाळले-ताळले | स्मृ० १७७ | आहाळबाहाळी | शि० ४११ |
| हळवैली पळवैली | स्मृ० १७५ | घडगोड | द० ९४ |
| नेटेंबोटें | उद्ध० ७ | आफळसाफळ | द० ८८ |
| उगुमुगु | लीला० ३-४३ | | |

**३ आम्रेडित** :—या प्रकारात नामें, सर्वनामें, विशेषणे, संख्यावाचक आणि क्रियापदें याची द्विरुक्ति होताना दिसते. व्यापकत्वाचा अर्थ सूचित असतो. उदा०

| | | | |
|---|---|---|---|
| दिहेंदिहूं | शि० ८३७ | आटाआटी | शि० ९८८ |
| लाबलाबै | शि० ८९१ | घालाघाली | शि० १००६ |
| आणआणूं | शि० ८१ | दडवादडवी | शि० ४८० |
| येरझारा | ऋ० २८ | आनानी | उद्ध० ७२८ |
| चडफडीती | ऋ० ६२१ | जएजए | ध० उ० ५८ |
| वळितपळित | उद्ध० ५२१ | खणौखणी | ध० उ० ५७ |
| सीतेंसीतें | ली० १–१९ | दीपोदीपीं | ध० उ० ४१ |
| दरेदरकुटे | ली० १—५ | तीटततीटत | द० ५४ |
| खेंवाखेवी | ली० ३ | आळुमाळु | ज्ञा० ९–५२९ |
| सारवासारवी | शि० ५०१ | पळपळीत | द० ८९ |
| पुसपुसों | स्मृ० १६ | रवरवा | शि० १००४ |
| वाटवाटें | ली० ३ पा० ३४ | वेगेवेगु | ध० उ० १८ |

**४ सामासिक जोडशब्द** :—यादव-मराठींत द्राविडी भाषातून बरेच शब्द शिरले. क्वचित् अशा परकीय शब्दानें अर्थव्यक्तीचें कार्य नीटसें होत नसावें. एतावता, त्याच अर्थाचा एक तत्सम वा तद्भव म्हणजे आर्य शब्द जोडून अर्थ सुस्पष्ट केला जाई. एक स्वकीय व दुसरा परकीय अशा दोन शब्दांची जोड होऊन हा समास बने. उदा० वर्तमान मराठींतील "चिल्लीपिल्ली" हा शब्द पहा—

सं० शाबाल > शावाल > चावाल > चील

\+ तामीळ : पिळ्ळइ

येथें 'चील' व 'पिल्लइ' या समानार्थक परंतु विजातीय शब्दांचा जोड झाला आहे. यासंबंधीं डॉ० चैतर्जी लिहितात—

"This has the form of a compound word, but the idea expressed is only one. This may be called translation compound, and ascribed to linguistic conflict and compromise in Indo-Aryan."

याचीच आणखी उदाहरणे म्हणून डॉ० चतर्जी 'पहाड-पर्वत' व 'इक्षु-गडेरी' हे शब्द सागतात. असले जोडशब्द संस्कृतात नाहीत, परंतु वर्तमान आर्य भाषात मात्र आहेत. इंग्रजीतहि साधारण याच धर्तीवर शब्दाचे जोड बनू शकतात, व क्वचित् दोन समानार्थक शब्द जवळ आल्यास त्याच्या वर्णाची परस्परात भेसळ होऊन स्वतंत्र शब्द तयार होतो. उदा०

| | | |
|---|---|---|
| Blunt | = Blind | + Stunt |
| Glaze | = Glare | + Gaze |
| Knoll | = Knell | + Toll |
| Slender | = Slight | + Tender |
| Slide | = Slip | + Glide |

कु० लुइझा पाउंड हिने अशा भ्रात सयोगाची इंग्रजीतील विपुल उदाहरणें देऊन शब्दसिद्धीचा हा प्रकार विस्ताराने वर्णिला आहे. दोन समानार्थक शब्दाचा सयोग करण्याची ही पद्धति मात्र यादव-मराठीत नाहीं. वर्गीकरणाच्या दृष्टीने भिन्न परंतु अर्थानें अभिन्न असे शब्दाचे जोड यादव-मराठी बनविते. पहा—

पाटपीढी उद्ध० ४७६ ( सं० पृष्ठम् > १ पाट, २ पीढे )
मांदीमेळावा उद्ध० ५३६
दगडगुंडे उद्ध० ७३१ ( तद्भव + देशी )
मार्लीमर्दना ध० पू० ६८ ( तद्भव + तत्सम )

---

१ 'Polyglottism in Indo-Aryan' Dr. S. K. Chatterji, —7 th Oriental Conference, 1933

२ Miss Louise Pound : "Blends-their Relation to English Word Formation," 1914

मळघाणि स्मृ० ७३

कवतिकेंकोडें शि० ९४५ ( तत्सम + तद्भव )

केळिक्रीडा लीला० ३-५९ ( तद्भव + तत्सम )

डाळखांदी द० ११ ( देशी + तद्भव )

घनदाट लीला० ३, पान २४

वरील जोड्यांत दोहीं शब्दांचा अर्थ एकच असून त्यांचीं स्वरूपें मात्र भिन्न आहेत. इंग्रजीतील भ्रांत संयोगाहून हे शब्द वेगळे आहेत. यादव-मराठीनें ही शब्दसिद्धि नव्याने सुरू केली. हिचाच आणखी एक प्रकार यादव-मराठींत दिसतो. वाक्यांतील एका शब्दाचा अर्थ त्याच वाक्यांत दुसऱ्या शब्दानें व्यक्तविण्याची लकब तत्कालीन गद्यात दिसते. म्हणजे दोन समानार्थक शब्दांचा जोड न करिता ते एकमेकापासून अलग ठेवून अर्थव्यक्ति साधली जाते. या प्रकाराला **साभिप्राय समानार्थक शब्द** असे नाव मी देतों. उदा०—

"मग भटोबासीं **संभाषूनि म्हणितलें** ।"—स्मृ० ९५

"हें **आइकौनि परिसौनि** केशवाचार्यें म्हणितलें ।"—स्मृ० ११६

"ऐसें म्हणौनि **म्हणीतलें : आन सांगीतलें** ।"—शि० १-१४

"मिया तुमतें **झांकवीले : चाळवीले** ।"—लीला० ३-२१

"गोसावियासि **मर्दना** जाली : **माजणें** जालें ।"—लीला० ३-२९

"तयावरि पावो **देऊंचि** तथा **ठेऊंचि** नए ।"—द० २६

"**कुंभचासी तथा भार** आथौनि पीके ।"—द० २८

"**सिंचा** वो **सिंपा** कनकधारा ।"—शि० ७०४

"परि कैसीहि कांहीं घृणा **नुपजैचि होए** ।"—लीला० १-२०

समानार्थक शब्दाचा हा वापर खास यादव-मराठीचा होय. कारण तो प्राकृतांत, अपभ्रंशांत नव्हता व वर्तमान-मराठींत नाहीं.

५ **संकीर्ण सामासिक व जोड शब्द** :—वरील चार प्रकारांत जे येऊं शकत नाहींत असे कितीतरी द्विरुक्त व जोडशब्द यादव-मराठींत आढळतात. वर्तमान आर्य भाषांचा व त्यांतील शब्दांचा या वर्गीकरणाच्या दृष्टीनें अद्यापि अभ्यास झालेला नाहीं. तो झाला, म्हणजे आणखी सूक्ष्म

वर्गीकरण करणें शक्य होईल. तोंवर, संकीर्ण जोड शब्दांतच त्याची गणना केली पाहिजे. असे कांहीं शब्द पुढें देतों—

| | | |
|---|---|---|
| रळियारापदळिया | वच्छ० | काजभोज |
| गोरागोमटा धारेधाकुटा | द० १३ | पुडुवाटवा |
| सादीसवडी | द० ४० | पाटाउवे-सुटाउवें |
| सेजियासाइलिया | द० ४४ | दाएपसाए |
| आडीदरडी | द० ४४ | इळाखिळा |
| पालापाणी | द० ९४ | मोडकेतोडके |
| ढळमळीतु | ऋ० ३९४ | सोएरीधाएरी |
| दुनीदेहुडी | शि० ५६२ | वोखटेंगोमटे |
| तिळतेलिण | लीला० १-१८ | पाहानपटी |

**६ विरोधी जोड शब्द**:— परस्पर विरोधी शब्द यादव-मराठी 'अ' किंवा 'उ' या वर्णांनीं दाखविते. पुढील जोड्या पहा—

| | | | |
|---|---|---|---|
| पवाडु-अपवाडु | उद्ध० १४१ | जडे-उजडे | द० १४ |
| वेढा-उवेढा | उद्ध० १०५ | भरे-रीचवे | द० १२ |
| सुचि-असुचि | उद्ध० ४७२ | पहुड-उपहुड | लीला० ३ |
| टाळे-उटाळे | उद्ध० ६८३ | आपें-परु | ऋ० २७२ |
| रंग-उरंग | उद्ध० १४० | रुची-अरुची | ली० ३, पा०२६ |
| आपुलें-परावें | उद्ध० ६१९ | पालाणे-उपलाणें | शिशु० |

**७ अकरणदर्शक शब्द**:—संस्कृतातील 'अ' हा अकरणवाचक उपसर्ग यादव-मराठी नित्य वापरते, यात नवल नाही. परंतु जेथे संस्कृत विरोध-वाचक शब्दांची जोडी तयार आहे तेथेंहि क्वचित् यादव-मराठीनें 'अ' किंवा 'न' कारानें नवीन शब्द बनविला आहे. हा अर्थात् साम्याभास होय. उदा०

'निबल' (= अबल) –द० ७७

'असक्ति' (= शक्तीचा अभाव) –स्मृ० १९८

'अपरीतोषु' (= खेद) –स्मृ० १३९

'आक्रोध' ( = शांत ) –वृद्धा० १३
'अन्हवाणी' ( = वाहाणांवांचून ) –स्मृ० ११८
'अदैव' ( = दुर्दैवी )–शि० ५१६
'निललता' ( = मालिन्य ) –स्मृ० २१७
'असान' ( = मोठें ) –शि० ४७४

## § ५ नामधातु

नामापासून धातु की धातुपासून नाम हा वाद फार पुरातन आहे. यास्काच्या वेळी हा मतभेद निरुक्तांमध्ये रूढ होता. 'सर्व शब्द आख्यातापासून सिद्ध होतात' असें म्हणणारा एक पक्ष आणि 'काहीं थोडे शब्द आख्यातज असून बाकीचे स्वतंत्र आहेत' असे मानणारा दुसरा पक्ष. यास्काचार्यांनीं आपला "आख्यातजानि नामानि"[1] हा सिद्धात प्रस्थापित केला आहे व शाकटायन आणि गार्ग्य याच्यांतील वादाचा निकाल दिला आहे. सर्वच नामें आख्यातज नाहीत या गार्ग्याच्या म्हणण्याला साईसच्या[2] ग्रंथांतून पुष्टि मिळते. परंतु आजच्या शास्त्रीय युगात साईसचा ग्रंथ मान्य नाहीं. आर्यभाषेंतील क्रियापद हे पूर्वी नाम होतें व सर्व शब्द नामें असणे हीच भाषेची प्राचीनतम अवस्था इतके म्हणण्यापर्यंत साईसची मजल जाते. म्हणजे तो मूळांत नामधातुच तेवढे मानतो. वास्तविक शाकटायन आणि साईस या दोघाचीहि मते एकान्तिक आहेत. इतके मात्र खरे, की नामाचेंच मूळ आद्य रूप म्हणजे धातु होय. आधुनिक भाषाशास्त्राला हेंच मत संमत दिसतें. यासंबंधीं प्रो० कुलकर्णी म्हणतात—

"धातूच्या कक्षेच्या[3] बाहेर वावरणारी स्वतंत्र वृत्तीचीं अशी काही नामें सांपडणारच. बहुतेक नामें ही व्युत्पाद्य असतात. त्यांची व्युत्पत्ति

---

१ यास्क : निरुक्त १-१२

२ Sayce : Introduction to the Science of Language Vol. I (Preface)

३ राजवाडे मराठी धातुकोश ( प्रस्तावना, पान ११ )

काढिली, कीं तिच्या मुळाशीं धातु हा असणारच...सर्व नामें धातूंपासून काढणे हे काही बाबतींत हठात् व्युत्पादन होईल."

वरील चर्चेचें तात्पर्य हेंच, कीं धातूंपासून नामें सिद्ध होतात व पुनः नामापासून धातु सिद्ध होतात. नामाचें आणि धातूंचे असे हे रहाटगाडगें आहे. अर्थात् यादव-मराठीत क्रियानामें आढळतात, तसेंच नामधातुहि आढळतात. पुढे यादव-मराठीने बनविलेले काही नामधातु देतों—

आंगवणे ( अगे )[1] – "जेयाचेनि आठवे। शब्दसृष्टि आगवे।" ज्ञा० १३-२

उधवणे ( ऊर्ध्व ) – "कां उधवली आकाशे। शिलाराशी।" ज्ञा० १६-३७७

थोरावणे ( स्थविर ) – "विज्ञाने भलीं थोरावली।" उद्ध० ४७

शिळावणे ( शीतल ) – "सौदर्य शिळावले।" उद्ध० ९८

हातवसणे ( हस्तवश ) – "कवणु विषयवीरु हातवसी।" उद्ध० ५५६

एकवटणे ( एकवत् ) – "पाठिपोट येकवटे।" उद्ध० २०२

पोटाळणे ( पोट ) – "मुंगियें केवि पोटाळे : महदाकाश।" उद्ध० २१५

खाबाटणे ( खाब ) – "ते मुनीमनाते खाबाटी।" उद्ध० ३६५

चौकडणें ( चौ + ? ) – "हरिणु.. मरणाभेण चौकडे।" उ० ३७१

सुखणे ( सुख ), बळणें ( बल ), ज्ञानणें ( ज्ञान ) – "सुख सुखिये : बळ बळिये / ज्ञान ज्ञानियें : जयास्तव।" उद्ध० ३९०

दुरावणें ( दूर ) – "गोडी घेता मोक्ष : दूरावे तया।" उद्ध० ३७५

आधारणें ( आधार ) – "आधारली ब्रह्मेयाची दिठी।" उद्ध० ६७१

बोबडणें ( बोबड ) – "मनु पांगुळैजे : वेदु बोबडैजे। उद्ध० ७९२

डीरणे ( डीरी )[2] – "सर्वेचि दिसे डीरैली : प्रेमलता।" उद्ध० ७९४

---

१ राजवाडे सं० आगन् पासून व्युत्पादितात.

२ राजवाडे मराठी धातुकोशांत या धातूचा उल्लेखच नाहीं.

खालविणें ( खालीं ) – " तैसें जीवमात्र अशेषा । खालविले । " ज्ञा० ९-२२४
उभणें ( ऊर्ध्व ) – " जेआंवरी असे उभिले : असेख ते । " ऋ० ५३७
मोहरणें – ( मुखर ) – " मनबुद्धि मोहरी । अध्यात्मज्ञानी । " ज्ञा० १३-६१८
" दृष्टि न मोहरे । कांहीं केली । " ऋ० ५१३
कालवंडणें ( काळवंड ) – " की उबडला देखौनि सोच्यु : काळवंडैल । " ऋ० ४०७
उंचावणें ( उंच ) – " परि उचावता त्रीकु तरि... । " ऋ० ५४६
येरझारणें ( येरझार ) – " तो एकला प्राण एरझारें । " ऋ० ६२३
नवसणें ( नवस ) – " नवसीली असे मीया अंबीके यात्रा । " ध० पू० ७५
जोहारणें ( जोहार ) – " दोन्ही करीं जोहारिले गोवीदु । " ध० पू० ७८
" मग तैसाचि भेणभेण । पुडती जुहारी चरण । " ज्ञा० ११–४८५
गुढरणें ( गुढर ) – " वारु रथ संजोगीले गुढरीले हस्ती । " ध० पू० ४८
होकारणें ( हाक ) – " कृष्णा म्हणौनि हाकारिजे । " ज्ञा० १०-५४६
आंपलवणें ( आपल ) – " अवघींचि आपलवले । " स्मृ० १९२
( = आपुलकी वाटली )
क्षेमाविणें ( क्षेम ) – " तयातें क्षेमावले । " ली० १-११
सेंवाळणें ( शे-सेवाळ ) – " सेवाळलें खडक असे । " दृ० २६
दुनणें ( दुण-न ) – " मग नागरीजे : दुनीजे । " दृ० २८
सनिपातणें ( संनिपात = एक रोग ) – " पाइकु सनिपातैला असे । " दृ० ३६
जारसणें ( जरा ) – " जारसैले वाळुक । " दृ० ३१ ( = जून झालेलें )
कामाविणें ( काम ) – " की मेरूचा गाभा कामाविला : विश्वकर्मैनी । " शि० ४५
एणायणें ( एणः = हरिण ) – " नेणों तुज जोडला सायासीं :
तरि खडा अेणाअे । " शि० २२१ ( = काळा पडेल )
बालावणें (बाल) – " **बालावेया** पंडुनंदनु : श्रीकृष्णरायां । " शि० ४६२
भगवणें (भगव) – " ना तरि राणीव साडावी : कापडें भगवावीं । " शि० ४७५
वेडणें ( वेड ) – " प्रेमभरें वैडैली : मने... । " शि० ६०७

बरविणें (बरंव) – " राऊतें बरंवतांति।" शि० ५६५ (=शोभतात)
कौतुकणें (कौतुक) – " मग कवतिकैलैनि महाकाळें।" शि० ९३५
डिंहणें (डिंभ) – " महाकाळें काळु : तो डिंहाला।" शि० १०८०
तिखटणे (तिखें) – " तंव तो धारासिंपे तिखटे।" शि० ७११

## § ६ क्रियानामें

यादव-मराठीनें क्रियापदांपासून नामे बनविण्याची पद्धति परंपरेनेंच घेतली आहे. शब्दसिद्धीचें हें एक साधन आहे. पुढें काही क्रिया-नामें देतों—

| | | | |
|---|---|---|---|
| वोडवन | –उ० १२ (वोडवणे) | थलिवं | –ज्ञा० १७–३४२ (उमटविलेलें) |
| चढावा | –उ० २८ (हल्ला) | सागातु | –ऋ० ६१७ (सहवास) |
| पेटवन | –उ० ६८ (इंधन) | आट | –ऋ० ६२४ (आटणें) |
| नागवण | –उ० ८५ | पळ | –ध० उ० ४ |
| गांवघेणी | –उ० ६९ (घेण्याची क्रिया) | | |
| गावघेरी | –उ० १०७ (घेणें) | बैसिक | –ज्ञा० १३–४८४ (बैठक) |
| ताटकाढा | –उ० १६२ (सेवक) | ताटकाढा | –ध०उ०४७ (सेवक) |
| उपेणें | –उ० २१४ (वास) | चोख | –ध०उ०३८ (चोखणें) |
| रीगावा | –उ० २३८ (प्रवेश) | राहावा | –स्मृ० ६५ (मुक्काम) |
| कांतिउ | –उ० २५१ (कांतलेला) | बुझ्ु | –स्मृ० ७२ (बुझ्) |
| वोतिउ | –उ० २५१ (ओतलेला) | हाकारें | –स्मृ० ९१ (बोलावणें) |
| वोहट | –उ० २९४ (उतार) | उठिबैसी | –स्मृ० ९४ (वागणूक) |
| दीवेलावणी | –उ० ३४४ | म्हणिये | –स्मृ० ९८ (काम) |
| निहारु | –उ० ३९९ (न्याहाळणें) | | |
| आधोलि | –उ० ४३७ (आंदोल्) | निरवणुक | –स्मृ० १४५ (निरोविणें) |
| हींडी | –उ० ४७६ (हिंडणें) | पोफळ-फोडणा | –स्मृ० १५८ |

परतनी　–उ० ५२३
आळोंचु　–उ० ५५४ ( आळोचणें )
दारकोंडी　–उ० ५९५ ( कोंडलेली )
उति　–उ० ७३६ ( उत् + इ )
अंकिला　–ऋ० ५९ ( अंक् )
हालिचालि　–ऋ० ११३
खनवादी　–ऋ० १३४ ( खन् )
मोकारा　–ऋ० १६५
निगावा　–ऋ० १७१ ( निर्गम् )
वेंझें　–ऋ० १९३ ( विंधू )
धांवा　–ऋ० २२५ ( धाव् )
उजाळु　–ऋ० २९० ( तेज )
पाएपुसणें　–ऋ० ३३६
घालणी　–ऋ० ३४० ( घाला )
राहाणें　–ऋ० ४०४ ( निवासस्थळ )
सांधनी　–ऋ० ५२८ ( गोष्ट )
ठाउवा　–ऋ० ५४७ ( खूर–सं० स्था )
पहुडु　–ऋ० ५४९ ( झोंप )
सामानुक　–ऋ० ५७१
चढावा　–ऋ० ५८५ ( पुट )

भांडेता　–स्मृ० २१९ ( भांडणारा )
घे–दे　–स्मृ० २२८ ( वादविवाद )
हेला　–स्मृ० २६१ ( अपमान )
मोलकै　–ली० १–३९
वरैत　–द० ५९ ( वृ )
साधुनूक　–शि० ३२८
घालनें　–शि० २६९ ( हन् )
आवगणें　–शि० २६८ ( आत्मीकृ )
कलिलावा　–शि० १२७ ( लग् )
लावकै　–शि० १२९ ( लावालावी )
मानबरळा　–शि० २१८
पागारू　–शि० ५४६ ( पालनकर्ता )
उभनी　–शि० ५६८ ( रचना )
दाहावी　–शि० ६०९ ( दह् )
गुंफीव　–शि० ६३१
पाहिली　–शि० ८६६ ( पहाट )
खाओगिळी–शि० ९०२
काढाओ　–शि० ९५६ ( पळ )

## § ७ समास आणि समासांतर्गत विभक्ति

यादव-मराठींत समस्त आणि व्यस्त अशी दोन प्रकारची रचना आढळते. पैकीं व्यस्त रचना प्रत्ययप्रक्रिया प्रकरणावरून ध्यानांत येईल.

शब्दाला प्रत्यय वा शब्दयोगी जोडून केलेली व्यस्त रचना आढळते. येथें सामासिक रचना देतों—

**समास:—**

| | | |
|---|---|---|
| शरीरसाडोवा | ज्ञा० | ९।३७७ |
| अनुष्ठानभाषा | ज्ञा० | १८।३१६ |
| अंतःकरणकुहरीं | ज्ञा० | ७।१२२ |
| मातुअघडती | ज्ञा० | १।२३५ |
| साडीविखुरी | ज्ञा० | ९।३९ |
| देशधडी | वच्छ० | ४१ |
| मसीटिळा | वच्छ० | ८२ |
| मीमाक्षेपणु | वच्छ० | २५९ |
| आवळेवेलेंआलेंआं | वच्छ० | ३८५ |
| सोनेंकेतकी | वच्छ० | १५६ |
| चेंडुफळी | वच्छ० | ८५ |
| अमृतघोळिलेबोल | वच्छ० | २३६ |
| विखोवेव्हारु | दृ० | ११ |
| कानवाथरु | दृ० | २९ |
| दायेपसाये | दृ० | ४० |
| कूपकाटी | दृ० | ७६ |
| गुरुभाऊ | स्मृ० | १३१ |
| चापैविहिरी | शि० | १०२८ |
| पडवळकाठिया | शि० | १०३४ |
| बाजसूपवती | लीला० | १।६९ |
| डाळखादी | दृ० | ११ |
| साडेपन्हरें | ऋ० | ५८७ |
| बीजनवारे | भ० पू० | ६४ |
| जांबडाहाळा | उषा० | ७६।५४ |
| फुटामुख्य | स्मृ० | १०६ |

**समासांतर्गत विभक्ति :—**

यादव-मराठींत समासातील पूर्वपदाची विभक्ति कायम ठेविल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. परंतु, अशांची गणना अलुक् समासांत करण्यांत येत नाहीं असें दामले[1] म्हणतात, तें युक्तच आहे. ही समासांतर्गत विभक्ति म्हणजे यादव-मराठीचा एक विशेष होय. वर्तमान मराठीत ती क्वचित् आढळते. पुढें उदाहरणें देतों. समासांतर्गत विभक्ति कोणती ते कंसांत दिले आहे.

| | | |
|---|---|---|
| **मोहो**तुरांचेनि गजरें । | उद्ध० ६०० | ( प्रथमा ) |
| तुझिये कथेची **दीवे**लावनि । | उद्ध० १६६ | ( प्रथमा ) |
| तरि **गाभे**वनाचा संपुटीं ॥ | उद्ध० २२० | ( सप्तमी ) |
| या आदिकरूनि **आत्मया**रामा । | उद्ध० ६८८ | ( सप्तमी ) |
| श्री **चक्रधरा**रायाचा संबंधु । | स्मृ० १३० | ( षष्ठी ) |
| **चुनें**जाति निरूपलि । | लीला० १–५६ | ( प्रथमा ) |
| **गोत्रां**कुटुंबातें दाखवावेया । | लीला० १–१६ | ( चतुर्थी ) |
| **इष्टां**मित्रांपुढें सांघों लागले । | लीला० ३–३६ | ( षष्ठी ) |
| **कंठा**पाशिका धरिले । | शि० २१७ | ( चतुर्थी ) |
| **रामे**चापेआंचीं फुलें । | शि० ३०२ | ( षष्ठी ) |
| पिटौनि सूदिला **धुळीं**कोठीं । | शि० ४५२ | ( सप्तमी ) |
| **स्नेहो**दूधभरिता । | वच्छ० ३२२ | ( प्रथमा ) |
| **संसारु**मोचक । | वच्छ० ३२२ | ( प्रथमा ) |
| **भूतां**ग्रामाते । | वच्छ० ३९३ | ( चतुर्थी ) |
| **मनां**पवनाते । | वच्छ० ४१२ | ( चतुर्थी ) |
| **लयां**गतु । | वच्छ० ३२१ | ( सप्तमी ) |

## § ८ संधि

प्राकृत, अपभ्रंशाप्रमाणेंच यादव-मराठींतहि संधि विकल्पानें होतात.

---

१ मो० के० दामले : शास्त्रीय मराठी व्याकरण, पान ६०४

ई (सं० अपि) या अव्ययाचा मागील शब्दाच्या अंत्य स्वराशीं क्वचित् संधि होतो.[1] जसें—

सकलैं, आठै, सातै, चोविसैं, भलतैं (ज्ञा० २।१८१)

क्वचित् नाम-सर्वनामाचा क्रियापदाशीं व क्रियाविशेषणाशीं संधि आढळतो. उदा०

| | |
|---|---|
| "पूतनाणि बकासुरु" | – वच्छ० ९१ |
| "जयाव्यथा" | – वच्छ० ४७५ |
| "कवणुसे" (कवणु असे) | – वच्छ० ४११, शि० १०३० |
| "वाणावेआचेनुमुखे" | – ऋ० ५५५ |
| "आनोबाणित जळु" | – स्मृ० १८५ |
| "तेथुसे" (तेथु असे) | – शि० १०३६ |

संधि न झाल्याचीं उदाहरणे—

| | |
|---|---|
| "मकरंद आस्वादनमिषे" | – वच्छ० १६१ |
| "क्षेणएकु" | – वच्छ० १५७ |
| "उन्मनी अवस्छा" | – वच्छ० १५२ |
| "अनउपम्य रचना देखे" | – ध० पू० १४ |
| "आत्मेआरामा" | – उद्ध० ६८८ |

## § ९ प्रयोग

यादव-मराठींत कर्तरि, कर्मणि व भावे असे तीन प्रयोग होते. पैकीं कर्मणि व भावे हे विवेचनीय आहेत. सर्वांची उदाहरणें व चर्चा पुढें देतों—

### कर्तरि

"हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड **आइका**॥" –ज्ञा० ९।१

"अर्धु बोलाची वाट न **पाहे**।" –ज्ञा० ९।२७

"आतां **जळो जळो** हें जीयालें।" –उद्ध० ४०७

१ "ज्ञानेश्वरीचें व्याकरण" राजवाडे, पान १४६

" **चालती** सीग्रवेगें ब्रह्मादीक देव **करिती** जयजयकारु।" धवळे पू० २८
हा प्रयोग संस्कृताप्रमाणेंच होतो. कर्तरीचे एक रूप विचित्र आढळतें. उदा०

" श्रीकृष्णाचा जांधिवा होइजे : तरि लावण्याचें पडप लाहिजे ।
भणओनि मदनु **सादैजे** : लेंकरूंपणालागी ॥ "–शिशु० ३७०

येथें कर्तरि अभिप्रेत असून साम्याभासानें व यमकाकरिता कर्मणि रूप वापरलें आहे.[1]

## कर्मणि

हा प्रयोग पांच रीतींनीं सिद्ध होई.

( १ ) **व्ययी कृदन्तांमुळें** उत्पन्न झालेला कर्मणि—

' श्रीचरणतीर्थिचेनि ओले : वरील सुख पाहाळी **गेलें** । "–ऋ० ६०६
" ये अर्थी बाळु : मियां **केला** गुरु । " –उद्ध० ४७४

संस्कृतप्रमाणेंच कृदन्त वापरून क्रिया व्यक्तविण्याची पद्धति मराठींतहि आल्यामुळें हा कर्मणि प्राचीन व अर्वाचीन मराठीत वारंवार येतो. अशा प्रयोगात अर्थदृष्ट्या कर्त्याकडे प्राधान्य असल्यामुळे कित्येक वेळां हा कर्मणि प्रयोग मानण्यातहि येत नाही. हे शास्त्राला सोडून आहे. तसेच श्री० दामले[2] हे आधुनिक वैय्याकरण याला " प्रधान–कर्तृक कर्मणि " असे म्हणतात तेहि अयुक्तच होय. भाषाशास्त्राची दृष्टि अर्थापेक्षा रूपाकडेच असावी व अर्थदृष्ट्या कसेंहि असलें तरी स्वरूपदृष्ट्या व व्याकरणतः या प्रयोगाला शुद्ध कर्मणिच म्हणावें. यादव-मराठीनें हा प्रकार परंपरेनें घेतला.

( २ ) ' **इज** ' **कर्मणि**:— या प्रत्ययाची परंपरा अशी–

सं० य > प्रा० ज्ज, इज्ज > म० इज, ज

या प्रकारांत तृतीयान्त कर्ता व प्रथमान्त कर्म असतें. परंतु ' लागी ' हें शब्दयोगी वापरलें असता मात्र कर्म चतुर्थी घेतें. हा कर्मणि बहुशः लट्

---

१ हें यमकावलंबित्वच होय. ' शब्द् ' ( म० साद ) हा धातु संस्कृतांत दशमगणीं असल्यानें,त्या गणाचें ' अय ' हें चिन्ह येथें ' ज ' रूपानें अवशिष्ट आहे असें मानणें चूक होईल. यमकरचनेमुळें असे आभास उत्पन्न होतात.

२ मो० के० दामले : ' शास्त्रीय मराठी व्याकरण ' – पान ७५८

वर्तमाने, लोट् आज्ञार्थे व विधिलिङ् यांत आढळतो. आज्ञार्थांत मात्र 'ओ' हा प्रत्यय 'इज'च्या पुढें लागतो. ( उदा० अवधारिजो, करिजो )

" तरि अवधान एकले देइजे। मग सर्व सुखांसि पत्र घेइजे।" ज्ञा० ९-१

" इया ग्रंथा पुण्यसंपत्ति। सर्वसुखी सर्वभूती। संपूर्ण होइजो। ज्ञा० १८।१७८८

" जेथ मन पांगुळैजे : वेदु बोबडैजे।"–उद्ध० ७९२

" उदैजेति परबिबी। कळिकोळिगा राहिला कोंभी।" ऋ० ५७०

" उद्धरण बोलिजेलें।"–स्मृ० २३ ( वृद्धा० )

" पायवणी **घेइजत असिजें**।"–स्मृ० १२७

" बटिकुरे काइसया **सीनविजतें असिजति**।"–लीला० १-११

" थाटिजेति, कीजेति, सीपिजेति... "–शि० ३१२

वरील उदाहरणांतील जाड अक्षरातील संयुक्त क्रियापदाचे कर्मणि प्रयोग महत्त्वाचे आहेत. ज्ञानेश्वरीतील 'पाहिजे' हे कर्मणि रूप चित्य आहे. 'पाह' धातूत्पन्न या रूपाचा अर्थ बहुशः 'पाहावे' 'देखिले जाते' असा होतो. वर्तमान-मराठीतील या रूपाचा "आवश्यकतेचा अर्थ" तेव्हा इतका रूढ नव्हता.

( ३ ) **'व' कर्मणि :—**

सं० य > प्रा० व्व, व > म० व (किंवा लोप)

मराठीत या रूपाच्या अंती 'व' येतो किंवा त्याचा 'लोप' होऊन तत्स्थानीं स्वर मात्र राहतो. ( जसे, स० रम्यते > प्रा० रम्मइ > म० रमवे. सं० ज्ञायते > प्रा० णव्वइ म० जाणवे. सं० गम्यते > प्रा० गम्मइ > म० गमे ). याची उदाहरणे पुढें देतों—

" परि तेया ही हें क्षेत्र। नेणवे चि।" ज्ञा० १३-६९

" मुंगिये केवि पोटाळे। महदाकाश।" उद्ध० २१५

" मेघांचेनि वडपें : आकाश कहीं न सींपे।" उद्ध० २८०

" एक काइसेनिही बुझावे ना।" द० ९८

" तें दुःख मनां वाचेसीं : अनुवादवे ना।" शि० १०२

" तिये स्थानींची महिमा : केवि वर्णवे प्राकृतां आम्हा।" ऋ० २४५

म्हणजे मूळ संस्कृत ' य ' कर्मणीचें यादव-मराठींत ' ज ' आणि ' व ' कर्मणि असे दोन प्रकार होत.

( ४ ) **' प ' कर्मणि** :— हा प्रकार कांहीं विशिष्ट धातूंपुरताच उपयोगांत येतो. ते धातु असे—

" घे, घाल, म्हण, हार. " या प्रकाराची प्रत्ययपरंपरा

सं० प्य > प्रा० प्प > म० प

अशी असावी. मूळातील ' प्य ' चा प्रयोजकाचा अर्थ लोपून त्याला केवळ कर्मणि-अर्थ प्राप्त झाला आहे. इतकेंच नव्हे, तर ' इज ' व ' प ' कर्मणि हे दोन्ही क्वचित् समन्वयानें वापरलेले आढळतात. हेमचंद्र प्राकृतात या रूपाचा उल्लेख क्वचित् कोठे करतो. अपभ्रंशात क्वचित् एकादें रूप दिसतें. उदा०

" रिउ **जिप्पंति** विइण्णकुसंग वि । " (सं० जीयन्ते) –णायकुमार० ३–२ म्हणजे अपभ्रंशकाली दोहोंत घोटाळा होऊन प्रयोजकाचें रूप शुद्धकर्मणि अर्थानें वापरण्यास नुकता आरंभ झाला होता. अपभ्रंशात क्वचित् येणारें हे रूप यादव-मराठीत काहीं विशिष्ट धातूंचें वारंवार दिसते. त्या त्या धातूंचीं रूपें पुढें देतों.

( १ ) **घे** —या धातूचें ' घेप ' हे रूप ज्ञानेश्वरीत सुमारे ४० वेळा येतें, व ' घेइजे ' हें १० वेळां येते. अर्थात् ' घेप ' असें कर्मणि रूप अधिक प्रचारांत होतें हें निःसंशय. प्राकृतात सं० ' ग्रह् ' याचा कर्मणि आदेश ' घेप्प ' असा होई. पहा– " ग्रहेः कर्मभावे घेप्प इत्यादेशो वा भवति— घेप्पई, गिण्हिजइ । " –हेमचंद्र ८–४–२५६

---

१ राजवाडे या ' प ' व पुढील ' पिज ' कर्मणीचा विचार मुळीच करीत नाहींत. येथें हें विवेचन सविस्तर केलें आहे.

१ हेमचंद्र (प्राकृत–व्याकरणम् ८-४-२४५) " भो दुह्–लिह्–वह्–रुधामुच्चात् । " असा नियम देतो. म्हणजे या धातूंच्या ठायीं " अन्त्यस्य कर्मभावे द्विरुक्त भो वा भवति । " जसें, दुब्भइ–दुहिज्जइ. परंतु या उत्सर्गाचा मराठींतील ' प ' कर्मणीशी संबंध नाहीं. अपभ्रंशांतसुद्धां ' दुह् ' चें कर्माणि ' दुब्भइ ' असेंच होतें. ( णायकुमारचरिउ ९–८–९ )

तसेंच, सं० स्निह् > प्रा० सिप्प, स० आरभ् > प्रा० आढप्प असे आदेश कर्मभावें होत. ( हेमचंद्र ८-४-२५४, २५५ )

अपभ्रंशांतहि 'ग्रह्'चा 'घिप्पो' हाच आदेश आढळतो. जसें—

" गुणगिहिपुरिसु परिक्खिवि **घिप्पइ** । " णायकुमार० ३-३-५

म्हणजे 'ग्रह्' या संस्कृत धातूचे कर्मभावे आदेश प्राकृत-अपभ्रंशद्वारा येऊन मराठीत 'घे' धातूचा 'प' कर्मणि सिद्ध झाला आहे. पुढें यादव-मराठीतील याची रूपे देतो—

" जो कामनामात्रें न **घेपे** । मोहमले न लिपे । " - शि० ३-७१

" परि जें वाहाता विसावेया । मिलैल ते **घेपे** । " - ज्ञा० १८-९३४

" आणि पापपुण्यचीन्ही । **घेपवेना** । " - उद्ध० २८७

" तेहीन्चि **घेपे** तिहींचि **देपे** । " - लीला० ३, पान २४

( येथें 'देपे' हे कर्मणि रूप 'घेपे' या कर्मणि रूपामुळे बनलें आहे. 'दे' धातूचा 'प' कर्मणि आढळत नाही. अर्थात् हे मिथ्यासादृश्य होय. )

" मा तियेचे कार्य कोणे । **घेपे** दीजे कर्म । " - ज्ञा० १८-२६४

( येथें 'प' आणि 'इज' असे दोहीं कर्मणि आहेत. )

(२) **घाल** :—या धातूचें 'घाप' असें कर्मणि रूप ज्ञानेश्वरीत साधारण २० वेळा येतें. प्राकृतांत 'घल्लेइ' असे या धातूचें साधें रूप येतें. अपभ्रंशातहि[२] तेच आहे. अर्थात् या धातूचा 'प' कर्मणि परंपरेने आलेला नाहीं. डॉडेरेट्[३] हा धातु सं० घट् पासून व्युत्पादितात. परंतु त्यापेक्षा सं० क्षिप् > प्रा० घल्लइ > म० घाल हीच व्युत्पत्ति अधिक समाधानकारक दिसते. परंतु प्राकृत 'घल्ल' धातु देशी कीं तद्भव हें निश्चित नाहीं. मात्र मराठी 'घाल' धातु प्राकृत 'घल्ल' पासूनच होय.[४] प्राकृत धातु जर तद्भव

---

१ Hemachandra: " Prakrit Grammar, " 8, IV 322, 422.

२ णायकुमार० ६-१३-२१

३ " Passive Voice in Jnyanesvari "—W. Doderet, B. S. O. S. Vol. IV

४ Sten Konow—J. R. A. S. ( 1902 ) pp. 421

**असेल** व तो संस्कृत 'क्षिप्'पासूनच निघाला असेल, तर मराठींतील 'घाल' धातूच्या 'प' कर्मणीचा एक फार दूरचा धागा संस्कृत 'क्षिप्'मध्यें शोधितां येईल. एरव्ही, या रूपाचा उलगडा होत नाही.

यादव-मराठीतील रूपे—

" यऱ्हवि चांदिणे पिकविजत आहे चेपणी ।
किं वारेया **घापत** आहाति वाणी । " – ज्ञा० ९-२०

" देखैं अगनीमाझि **घापति** । "– ज्ञा०२–३४६

" तरि आत्मा तूं यकसरा । हे इं म्हणों जाता दातारा ।
आतौनि बाहिरा । **घापतासि** । " – ज्ञा० १८-२३

" परि घेउनि स्वासु **घापे** । " – ज्ञा० १६-४०९

( ३ ) **म्हण :** या धातूचेंहि 'प' कर्मणि रूप स्वतत्रच आहे. ते प्राकृत वा अपभ्रंशात नाही. मराठीतील उदाहरणे – ( हे ज्ञानेश्वरीत साधारणतः ३९ वेळां येते. )

" स्नेहालागि माये । **म्हणिपे** तें कीरु होये । "–ज्ञा० २-४२

" देखा षड्दर्शने **म्हणिपती** । तेचि भुजाची आकृति । "–ज्ञा० १-१०

" तो **म्हणिपैल** संवादु : श्रीकृष्णोद्धवाचा । "–उद्ध० ३७

" पींगळा **म्हणिपे** सामान्य रमणी । "–उद्ध० ३७६

( = म्हणून, नावाची )

" उदार देओ दीक्षागुरु : तूं ते **भणिपैं** । "–शि० ४५८

( ४ ) **हार** :—'व्याहृ' या संस्कृततील उपपदयुक्त 'हृ' धातूचा कर्मभावे आदेश 'वाहिप्प' असा होतो. ( हेमचंद्र, ८-४-२५३ ) या प्राकृत रूपांतील 'प' मराठीत अपभ्रंशद्वारा येणे शक्य आहे. परंतु अपभ्रंशात या धातूचें 'प' कर्मणि रूप सांपडत नाहीं. ज्ञानेश्वरींत ही रूपें सुमारें ४३ आहेत. या धातूसंबंधी एक गोष्ट महत्त्वाची आहे. त्याचें 'हारिजे' असें इज-कर्मणि रूप जवळ जवळ नाहीच. म्हणजे हा धातु नियमानें 'प'-रूपच घेई. उदा०

" माझें असतेपण लोपो । नामरूप **हारपो** । " ज्ञा० १३-१९७

"दिशांचे ठाये **हारपले**।" ज्ञा० ११-१८८

"अकालिची अभ्रें जैसीं। ऊर्मीविण आकाशी।
**हारपति** आपैसीं। उदैली सांतीं॥" ज्ञा० ४-११६

"अनंतें **हारपैलीं** ब्रह्माडे।" ऋ० ५४४

क्वचित् या धातूंत 'प' ऐवजी 'त' दिसतो. उदा०

"मुक्तीचा ठेवा **हारतला**।" उद्ध० ८८

या रूपाचा आणखी एक विशेष आहे. यादव-मराठींतील 'घेप, घाप, म्हणिप' हीं रूपें नंतर लोप पावली, परंतु 'हारप' हे 'प-कर्मणि रूप' मात्र वर्तमान-मराठीत शिल्लक उरलें आहे. याप्रमाणेच 'पळिप' (ज्ञा० ४-१२७), 'तळप' (ज्ञा० १३-६०८) ही पान्त रूपें आज रूढ आहेत.

वर दिलेल्या '**घे-घाल-म्हण-हार**' या चार धातूंच्या 'प' कर्मणि रूपापैकीं 'घे'ची संपूर्ण व 'घाल'ची किंचित् परंपरा सापडूं शकते. संस्कृत 'ग्रह्'चा प्राकृत कर्मभावे आदेशच 'घेप्प' असा आहे. 'म्हण' व 'हार' या दोन धातूंची कर्मणि रूपें पान्त का आणि विशेषतः 'हार'ची पान्तच कां याची नीट उपपत्ति लागत नाही.

(५) '**पिज**' **कर्मणि**:—हा प्रकार मागील 'प' व 'इज' कर्मणि याच्या संयोगाने सिद्ध होतो. तेव्हा हा जोड-कर्मणि म्हणावा. हा क्वचित् येतो. उदा०

"तेथ साहंतेनि नवले। **घेपिजे** ना।" ज्ञा० १३-३५१

"दोघींसि हारि आपण। **हारविजे** ऐसें। ज्ञा० १८-१५६६

(प < व)

"तेहींचि **घेपजे** दीजे।" लीला० ३, पान २४

'प' कर्मणि जसा कांहीं विशिष्ट धातूंच्या ठायींच संभवतो, त्याप्रमाणें हा 'पिज' कर्मणिहि प-साधित असल्यानें त्याच धातूंचा होऊं शकतो. ही जोड-कर्मणीची प्रथा यादव-मराठीनें प्राकृत, अपभ्रंशापासून स्वतंत्र बनविली.

वरील पांच प्रकारांखेरीज 'धवळयां'त कर्मणीचा आणखी एक विशेष दिसतो. पहा—

"देवें श्रवणीं झळंबुके **धरीया**: पार्यातकें माथा **भरीया**।"

(धवळे उत्तरार्ध १९)

हीं कर्मणि भूत कृन्दतें हिंदी तत्सम रूपांशीं साम्य पावतात व तीं एकटीं दुकटीं असल्यानें उपेक्षणीय होत.

**भावे**

हा प्रयोग चार रीतींनी सिद्ध होई.

(१) **व्ययी कृदन्तांमुळें** उत्पन्न झालेला—या प्रकाराची उत्पत्ति तत्सम कर्मणि प्रमाणेंच आहे. मात्र भावे प्रयोगाच्या स्वभावानुसार येथें क्रियापद हें कर्तृगामी वा कर्मगामी नसून सदा तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें. उदा०

"मीं एवों इइल" – लीला० १-६१ (भावे भविष्यकृ०)

"का साउली न पाता घातलें। कुहां सिहें।" ज्ञा० ९-१४८

"एसणे असत्य कैसेनि तुम्हा बोलावलें।" लीला० १-१४

(२) '**इज**' **भावे**:—सस्कृतातील कर्मणि 'य' प्रत्ययापासून यादव-मराठींत 'इज' प्रत्यय कर्मणि व भावे प्रयोगांत आला. अर्थात्, याचीं भावे रूपें कर्माणि सारखींच आहेत. वाक्यरचना मात्र प्रयोगस्वभावानुसार भिन्न असते. उदा०

"जेथ मन पागुळैजे: वेदु बोबडैजे।"–उद्ध० ७९२

"तुम्हीं श्रीमंतांचां घरीं जन्मवीजाल।"–स्मृ० १३२

"एथौनि तुमते झकवीजत होते: हासिजत होते।"–लीला० १-१६

"पैं स्थूलदृष्टी देखिजे माते।"–ज्ञा० ९-१४३

(३) '**व**' **भावे**:—कर्मणिप्रमाणेंच याची परंपरा आहे व तशींच रूपेंहि होतात. अंतीं 'व' येणें किंवा त्याचा लोप होऊन केवळ स्वर राहणें ही रूपपद्धति कर्मणिप्रमाणेंच आहे. हा 'व' प्रकार नित्य आढळतो. वरील दोहींपेक्षां याचे प्राबल्य फार होतें. पहा—

"ऐसीं हाव कवणासि बांधवे।" उद्ध० ३८

"परि विषयत्यागाचिये वाटा: कव्हणा जाववे ना।" उद्ध० २३०

"अविद्ये निरवयेवे: जरि ब्रह्म अवछेदवे।" उद्ध० ५८०

"हे आम्हां जिनवती ना।" स्मृ० १३

"तें कोन्हा न मने चि।" स्मृ० ४३

"रुधीपुरीचे भात मज वेळवती ना।" स्मृ० २०१

"वैकुंठा गरुऊ सांडविला।" शि० ३१७

(४) **तृतीयान्त भावे**:—हा प्रयोग म्हणजे संस्कृतांतील भावे प्रयोगाची केवळ छायाच आहे व तो केवळ यादव-मराठीतच आढळतो. पुढें तो लोपला. संस्कृतांतील भावे प्रयोगात उद्देश्य व पूरक दोन्ही तृतीयान्त असतात. तशींच तीं मराठींत आहेत. हा संस्कृत भावे महाराष्ट्रींत वा अपभ्रंशात नाही. यादव-मराठीनें तो साक्षात् संस्कृतपासून घेतलेला दिसतो. यादवकालीं भाषेचें काहीं प्रमाणात संस्कृतीकरण होत होतें त्याचा हा पुरावा आहे. या प्रयोगाचीं उदाहरणें पुढें देतों—

"तिहीं **मनुष्यां** होइजे। मृत्युलोकी॥" – ज्ञा० १४-२७०

"अमरीं **भाटां** होइजे। मग मृत्युलोकातें वानिजे॥"–ज्ञा० ६-४५.४

"तुवा **शरीरपरां** नोहावें। कामनाजात सांडावें॥"–ज्ञा० ३-१८५

"**ब्रह्मायुषां** होइजे। मग निजैलेयाचि असिजे॥"–ज्ञा० १४-१८६

"**अमरां** नव्हीजे"। दृ० २२

"**ऐसेयां** अवघेआं जाणता: गोता कुटुंबा वारिता।"–शि० २११

"जाणतेन गुरू भजिजे। जेणें **कृतकार्यां** होइजे।"–ज्ञा० १-२५

वरील प्रयोगात "मनुष्या, भाटा, अमरां" वगैरे जाड अक्षरांतील पूरकें तृतीयान्त आहेत व ती सदाच आकारान्त असतात. संस्कृतांतील

"येन कृतकार्येण भूयेत।" (जेणें कृतकार्या होइजे)

या प्रयोगाची बरोबर छाया पडून मराठीनें उद्देश्य व पूरक दोन्ही तृतीयान्त ठेविली आहेत. श्री० मोडक वरील अकारान्त रूपें कोणत्याहि विभक्तीचीं न मानता, केवळ क्रियाविशेषणें मानतात.[1] त्याच्या मतें ज्ञानेश्वरींतील "भावे प्रयोगातील पूरक विशेषण नित्य आं-प्रत्ययात असतें." परंतु महानुभाव ग्रंथांतील प्रयोग पाहतां ही रूपें तृतीयेचींच मानलीं पाहिजेत.

---

१ गो० कृ० मोडक: "राजवाडे ज्ञा० चें पुराणत्व" भा० इ० सं० मं० त्रै० व्हॉ० १५, अंक १

शिवाय भावे प्रयोग नसतांना सुद्धां तृतीयेचीं आकारान्त रूपें होतात हें मीं प्रत्ययप्रक्रियेंत (प्र० २) दाखविलेंच आहे. तात्पर्य, संस्कृतातील भावे प्रयोग त्याच्या अंगभूत तृतीयेसह यादव-मराठींत दिसतो.

सं० जनैः अमरैः न भूयेत ।

म० जनी अमरा नव्हीजे ।

हा प्रयोग एकनाथ-कालांत नाहीसा झाल्यावर 'अमरा' हे तृतीयेचें रूप प्रथमेसारखें भासूं लागलें. म्हणूनच ज्ञानेश्वरीच्या एकनाथी प्रतीत ही रूपें प्रथमेसारखीं लिहिलेलीं आढळतात, तीं भ्रष्ट होत.

## § १० सता तृतीया–सति सप्तमी

यादव-मराठीत कृदन्त विशेषणाची स्वयंवर्ती तृतीया व स्वयंवर्ती सप्तमी होई. स्वयंवर्ती चतुर्थी क्वचित् होई. स्वयंवर्ती किंवा सता तृतीया—

१ 'उदैलेनि सुधाकरें' (ज्ञा० ११-२४८)

२ 'कापुरें वेंचलेनिहिं' (ज्ञा० १८-४२०)

३ 'तेणें आलविलेनि' (ज्ञा० १८-११४६)

४ 'पाहालिया सृष्टीचिया पाहाटा' (ऋ० ३२४)

५ 'पाहातीए निशी' (शि० ७७८)

६ 'स्तवितां वेदां' (वच्छ० २९७)

स्ववंयर्ती किंवा सते चतुर्थी—

१ 'आमुतें येतां कां न साहा ।' (शि० ९५७)

स्वयंवर्ती किंवा सति सप्तमी—

१ 'विरूढलेया जोन्हला' (ज्ञा० १४-१२५)

२ 'जैसें प्रगटलेयां गभस्ती' (ज्ञा० २-२६१)

३ 'खाजें खादलेयां क्षुधानिवृत्ति होए' (ह० २१)

४ 'दोघां असतां जवळि : गोष्टि घडे' (उद्ध० ४८२)

५ 'एथ एकलेआं चालतां' (ऋ० २९)

६ 'स्वर्गादि सुखां : रातलेआं जीवां' (ऋ० १७३)

७ 'नसतां संसारां' ( = मिथ्या संसारांत) (ऋ० ५६५)

८ ‘ भटोबासां गेलेयां ’ (स्मृ० ८५)

९ ‘ आम्हा इतुकेया असता ’ (लीळा० १-१९)

१० ‘ कोपलेया महाकाळा ’ (शि० १०२१)

श्री० मोडक स्वयंवर्ती सप्तमी मानीत नाहीत. त्याच्या मतें ही तृतीया होय. परंतु ‘माथा, पाया’ ही सप्तमीची रूपे नित्य आढळणारी असल्याने वरील सति-सप्तमीच मानावी. शिवाय संस्कृतप्रमाणें प्राकृत व अपभ्रंश यातहि स्वयंवर्ती सप्तमी होती. पहा, महाराष्ट्री प्राकृत—[२]

“ विरहे होत्तम्मि को जीअइ ”– (विरहे भवति) गाथासप्तशती २-२४

“ दैवम्मि पराहुत्ते ” (दैवे पराभूते) गाथासप्त० ३-४५

“ पत्ते वि णअरदाहे ” (प्राप्तेऽपि नगरदाहे) गाथासप्त० २-६३

“ नइऊरसच्छहे जोव्वणम्मि ” (नदीपूरसदृशे यौवने) गाथासप्त० १-४५

अपभ्रंश — “ **वयहं गयहं** धम्मु गउ ” – सावयधम्मदोहा २०६

(व्रते गते धर्मो गतः)

“ **वाहिहिं विणिवारयहिं** वेयण होइं न एक्क ”– सावयधम्म० ४३

(व्याधिषु विनिवारितेषु वेदना एकाऽपि न भवति)

“ **अब्भितरचित्ति वि मइलयइं** बाहिर काइं तवेण ”

—पाहुडदोहा ६०

(अभ्यंतरचित्तेऽपि मलिने बाह्यतपसा किम्)

“ **अग्गिहिं उल्हावियहं** अवस ण उट्ठइ धूउ ”

—सावयधम्म० ३९

(अग्नौ आर्द्रीभूते अवश्यं न उत्तिष्ठति धूमः)

म्हणजे स्वयंवर्ती सप्तमी ही परंपरागत आहे. संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश या परंपरेनें कृदन्त विशेषणाची हीं रूपें मराठींत आली.

## § ११ वाक्यरचना

यादव-मराठींत वाक्यरचनेच्या दोन भिन्न पद्धति आहेत—

---

१ भा० इ० सं० मं० त्रै०, व्हॉ० १५, अं० १ – “ राजवाडे ज्ञानेश्वरीचें पुराणत्व ”

२ प्राकृतांतील उदाहरणांकरितां मी श्री० नेने यांचा आभारी आहें. (दृष्टांतपाठ, नेने प्रत, पान १५२)

१ क्रियापदिक — Verbal construction
२ नामिक — Nominal construction

क्रियापदिक वाक्यरचनेंत क्रियापद कर्त्याच्या लिंगाबरोबर न बदलतां अविकृत राहतें व नामिक पद्धतींत तें तसें रहात नाहीं, हा दोहींतील मुख्य भेद होय. अर्थात् पहिली कर्तरि प्रयोगाशीं व दुसरी कर्मणि प्रयोगांतील काहीं प्रकाराशीं निगडित आहे. क्रियापदिक वाक्यरचनेंत सदा क्रियापदाचीं प्रत्ययी रूपें आढळतात, तर नामिक वाक्यरचनेंत कृदन्तांवर काम भागविलें जातें. यादव-मराठी क्रियापदाचीं प्रत्ययी रूपें वापरण्याची पद्धति सोडून कृदन्ताकडे अधिकाधिक कशी वळत होती हें आपण प्रत्ययप्रक्रियेच्या भागांत पाहिलें. कांहीं लकार त्यांतील क्लिष्टतेमुळें व काहीं दोघातील स्वरूपसाम्यामुळें न वापरतां मराठी कृदन्तांचाच उपयोग अधिक करते. तात्पर्य, यादव-मराठीचा क्रियापदिक वाक्यरचनेकडून नामिक वाक्यरचनेकडे कल होता हे स्पष्ट आहे. के० ओक यांनीं केलेलें ज्ञानेश्वरीचें संस्कृत भाषांतर पाहिल्यास हीच गोष्ट ध्यानात येईल. धातूंचीं प्रत्ययी रूपें जात जात कृदन्तें जसजशी प्रचारात वाढूं लागली तसतशी नामिक पद्धतिहि अधिक दिसूं लागली. तरीहि, काही ठिकाणीं कर्ता प्रथमेंत तर क्रियापद कर्मण्यर्थी, व कर्ता तृतीयान्त तर क्रियापद कर्तरि असा विकृत प्रकार दिसतो. उदा०

"भटोबासां ( तृ० ) झोळीया दृष्टीपूत करीती।"–स्मृ० १०७

"मग तिहीं ( तृ० ) कुदळी पाउडें घेऊनि आले।"–लीला० १-११

असेच लिंग व वचन याचेहि घोटाळे क्वचित् आढळतात. उदा०

"तेचि आमुचे गोसावी होए।"–लीला० १-५

( कर्ता अ० व०, क्रिया० ए० व० )

"ते (पु०) [बिंदू] पन्हरेयावरी मानुकुलीं तैसीं मिरवतीं (नपुं०),"
लीला० १-८

"तुम्ही (अ० व०) आदि नको (ए० व०) हों गा।"–स्मृ० ९४

"जे वस्तु (स्त्री) अगाध अलेख। ते कलियुगीं...सुलभु जाला (पु०)
ऋ० २४६

पुढील वाक्यांतील विभक्तींचे कारक अर्थ विशेष पहाण्यासारखे आहेत :—

" कांइ **माझें** घेतलें वीरू । "–उद्ध० ७७ ( अधिकरण )
" हें नव्हे **तुमचें** उचित । "-ध० पू० ३५ ( अपादान )
" **तयासि** तयांवरि लक्षचि नाहीं । "–स्मृ० ११९ ( प्रयोजन )
" गोसावी **आउसेचें** अन्न स्वीकारीलेयावीन आरोगण न करीती । "
–स्मृ० १९६ ( कर्ता )
" **गोसावीयाते** ( =ची ) लेकी वाढत असे । "–ली० १–५५ ( संबंध )
" तयासि कव्हणि ठाइ **सुखासि** न ए । "–द० ८६ ( कर्ता )
" **तुझा** ( = तुझ्याकडून ) जालेआ अव्हेरूं : जो ए दुःखाचा पूरू । "
–शि० १०३ ( करण )
" कर्मफलाचेनि **आंगणें** : रागौं पाती । " –शि० ९२ ( अधिकरण )
" तरि कोपतील **आम्हां** : ब्रह्मवणदूं । "–शि० ३६४ ( अधिकरण )
( संस्कृतांत कुप् धातु सदा चतुर्थी घेतो. जसे,
" कुप्यंति हितवादिने । "–कादबरी १०८. ही संस्कृतची परंपरा यादव-मराठीने राखली आहे. वर्तमान-मराठीने मात्र ती सोडली. )
अशी काही स्थळे सोडल्यास यादव-मराठीची कारकें वर्तमान मराठी-प्रमाणेंच आहेत. वाक्यरचनाहि वरील काही अपवाद सोडल्यास नियमांना धरून होते. हे अपवाद म्हणजे विकृत रचना केवळ गद्यांतच आढळते. ज्ञानेश्वरीसारख्या नागर पद्यात विस्कळित रचनेचे एकहि उदाहरण नाही.

## § १२ तरतमभाव

संस्कृतांतील ' तर–तम ' व ' ईयस्–इष्ठ ' हे तुलनेचे प्रत्यय महाराष्ट्री व अपभ्रंश यानी अपभ्रष्ट रूपात कायम ठेविले होते.

सं० तर > प्रा० अर > अप० आर
सं० ईयस् > प्रा० इअ > अप० इय
सं० इष्ठ > प्रा० अप० इठ

अशा वर्णप्रक्रियेनें जुने तरतमवाचक प्रत्यय अपभ्रंशात जागे आहेत. उदा०
" पहिलारउ ( सं० प्रथमत्तरः ); भल्लारउ ( सं० भद्रतरः )
बलीयउ ( सं० बलीयस् ); पाविट्ठ ( सं० पापीष्ठ ) "[1]

---

१ णायकुमारचरिउ, प्रस्तावना, पान ५४

परंतु यादव-मराठी हे परंपरागत प्रत्यय वापरीत नाही. त्याऐवजीं शब्दयोगी अव्ययें वापरून तरतमभाव व्यक्तविला जातो. कोंकणींतहि असाच प्रकार आहे. पुढें, या कामी येणारी शब्दयोगी व इतर शब्द ससंदर्भ देतों.[१]

**१ पासौनि—**

"तरि आता चंद्रापासौनि निववितें। अमृताहीहूनि जिववितें।" ज्ञा० ९–२४

"तैसा क्षराक्षरा पासौनि। आनुम्चि तो।" ज्ञा० १५–४९८

"तिअे बरवी ओष्ठपूटें : बिंबफळापासौनि"। शि० ४११

"तेणें वैकुंठापासौनि विशाले। मजलागि केलीं राउले।" ज्ञा० ९–३८५

**२ परौत—**

"जो गुरुपरौता। मार्गु नेणे।" ज्ञा० १३–४४४

"परि नीके काय यया परौते।" ज्ञा० २–५२

"तोहि विकुनि जीजे : या परते पाप नाही।" उद्ध० ४०५

**३ होउनि, हूनि—**

"ना तरि काष्टिचा काष्टाहूनि। अनारिसा जैसा वन्हि।" ज्ञा० १५–४९८

"ते पतीहीहुनु काइ न वनिजे। पतिव्रता।" ज्ञा० ६–१२९

"वारेआंपासौनि वेगाडे : पर्वताहौनि दळवाडे।" शि० ९३४

**४ पसि—**

"जाणतेयापसि वर नेणता चाग।" दृ० ५८

"साधनापसि साध्य उत्तम।" दृ० ११४

"गृहस्मरणापासि झाडातळिं मनोरथ आठविसि ते निके।" स्मृ० ३३

**५ पासाव—**

"वज्रापासाव कठीणु : मज दैवहताचें अंतःकरणु।" ऋ० २२१

"ते रंगापासाव उजाळें : अधिक दिसे।" उद्ध० ७९६

---

१ 'वरि' हें शब्दयोगी तरतमभावदर्शक श्री० नेने मानतात. परंतु तें तसें नाहीं. ('ज्ञानेश्वरकालीन मराठी'—ह० ना० नेने, ज्ञानेश्वरदर्शन, साहित्यखंड, पान ३८)

६ यांखेरीज **षष्ठी-सप्तमी** यांच्या विभक्तिरूपांनीहि तरतमभाव दर्शविला जातो. पद्य—

" हे आगाधाचें आगाध कीं : हे विशाळुवाचे विशाळु । " दृ० ५९

" जें सकळ गुह्यां गोसावी । पवित्रा राओ । " ज्ञा० ९-४७

" आणि धर्माचें निजधाम । तेविं चि उत्तमाचें उत्तम । " ज्ञा० ९-४८

७ **स्वतंत्र शब्दांनीं—**

" रंगवाहाळा रूपका : वरि नाचो हे नृत्यनायका । " शि० ६९८

तात्पर्य, परंपरेचे प्रत्यय सोडून यादव-मराठी स्वतंत्र शब्दयोगींच्या साहाय्याने तारतम्य दर्शवी. पचमी ही विभक्ति या कामी प्रचलित दिसते. षष्ठी-सप्तमीचाहि क्वचित् वापर होतो.

## § १३ वाक्प्रचार ( Idiom )

वास्तविक भाषाशास्त्राच्या कक्षेत वाक्प्रचार, म्हणी वगैरे येत नाहींत. कारण कोणत्याहि शास्त्राचे नियम वाक्प्रचाराना लागू नसतात व उलट त्यापासून कोणताहि सिद्धान्त वा नियम बाधता येत नाही, हे खरे. परतु भाषेच्या वाक्प्रचारांवाचून तिचे छद्दत कळणार नाही हेहि तितकेंच खरें. वर्णप्रक्रिया व प्रत्ययप्रक्रिया अभ्यासिल्या असता भाषेचा सागाडा कळेल, परंतु तिचें सम्यक् ज्ञान होऊ शकणार नाहीं. तें व्हावे, यादव-मराठीचा सागाडाच केवळ नव्हे, तर त्या सागाड्याची हालचालहि समजावी एतदर्थ वाक्प्रचार पहाणे आहेत. अर्थात् मागे प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणें, या वाक्प्रचाराची विविधता जितकी गद्यावरून दृष्टींत भरेल तितकी पद्यावरून भरणार नाही. म्हणून पुढें लीळाचरित्र, स्मृतिस्थळ, पूजावसर, दृष्टातपाठ आणि पंचतंत्र या गद्य ग्रंथातून यादव-कालीन मराठी भाषेच्या लकबी देतों. ज्याना म्हणींचें स्वरूप प्राप्त झालें आहे अशाची याद शेवटीं देतों. मग आलेला शब्दसिद्धीचा भाग व हे वाक्प्रचार यांवरून यादव-मराठीची अर्थव्यक्ततेची श्रीमंती डोळ्यात भरेल. प्रथम कांहीं तत्कालीन शब्दप्रयोगों वरील गद्य ग्रंथांतून उद्धृत करितों—

१ **शब्दप्रयोग :**

**दृष्टान्तपाठ : बीजें करणें ( = गमन ); म्हणीयें करणें ( = काम )**

ठाओ घालणें; तनें दाटणें; जिव्हा झडणें; बीरडें लावणें; आधां दांतीं सीस देणें; खंति येणें; तोंड देणें; कूपकाटी करणें; वेंझ देणें; विवळणें ( = उजाडणें ).

स्मृतिस्थळ : वेव्हारु लावणें; वीजन करणें; संपादूं आदरणें; नेम सारणें; अभ्यागता म्हणणें; सुरंग मिरविणें; वडपिंपळीं लावणें; अभंगु देणें; चंद्रमय होणें; भीक्षा करणें (=संन्यास); राहाणें; ताट करणें.

लीळाचरित्र : ( १ ) फुलौर बांधणे; निबंध काढणें (=आधार बघणे ); भुंकों लागणें ( = निंदा ); मोडणें ( = खो घालणें ); मूळ येणें; वास पाहणें.

( २ ) चेवो येणें ( = जागृति ); काळावरी नाव घालणें; ग्रहो फेडणें ( = भूत ); हात वोडवणे; बोबाणें; उधाणी करणें ( = वाद ).

( ३ ) कवाड घालणें; आइती करणे ( = तयारी) आडपालौ वोडविणे; घागरा बाधणे.

( ४ ) खालीं पाहणे ( = लज्जेनें ); डोळा घालणें ( = खुणावणे ).

आचारस्थळ : साडितांहि न संडे; निर्पीनि काढणें; साक्षी ठाकणें; महाराष्ट्रीं असावे; जन्म वोपणे.

पंचोपाख्यान : बोलाचें उनें असे ( = बोल फोल होय ).

पंचतंत्रे : ढाळकरासैंचिया वृत्तीं राहिले; हातु उभारणे; उपदेशु बोलणें; उपजउं लागणें; तुम्हा आम्हां वैर; कळावणें ( प्रयोजक ); प्रत्ययो उपजणें; शून्य होणें.

**२ वाक्प्रयोग :—**

गद्य ग्रंथांतील वाक्यपद्धतीचा विशेष व विविधता पुढील वाक्यांवरून ध्यानांत येतील. ही तेव्हाची ग्रांथिक मराठी बोलीच्या स्वरूपात आहे. अर्थात्

---

१ संपादक—नेने ( भारत-इतिहाससंशोधक मंडळ, त्रैमासिक, वर्ष १९ )

२ संपादक—पोतदार ( भारत-इतिहाससंशोधक मंडळ, त्रैमासिक, वर्ष १ )

बोली भाषेचे सर्व विशेष तींत आढळतात. द्विरुक्ति, रूपांचा सैलपणा, नियमांची शिथिलता, क्रियापदलोप, उद्गारवाचके वगैरे बोलीचीं चिन्हें तींत आहेत. उदाहरणें संकीर्ण आहेत.

स्मृतिस्थळ :

स्मृ०

१ तेणें दुःखगुंफा केली।

२ भटोबासीं तया पीकीचें **ज्ञान केलें** ( = शिकविलें )

१३ दृष्टीचीं **राखणें** घालीती ( = पाळत ठेवणे )

३५ तो कहीचि नुधरे : मा नुधरे : मा कहीचि नुधरे। ( = त्रिवार )

३८ येरां दैन्य जालें। ( = ओशाळले )

८३ देशु उचलला होईल। ( = उध्वस्त )

८९ गीतमातुचा ठाइ बहुत **भरु** धरिला। ( = छंद )

९७ देह थोर तुटले। ( = अशक्त झाले )

१०६ पिंडें पिंड खेळो। ( = विषयसेवन करू )

११४ आम्हीं रायारायाच्या कुमरी। ( = थोरामोठ्याच्या )

१२४ **घे**–**दे** म्हणौनि थोरें जिज्ञासा करीत होते। ( = हिरीरीनें वाद करणें )

१५० त्या **सृष्टिशून्य** जाइल। ( = ईश्वरबोध होणार नाहीं )

१५१ तयाचेया पुत्रासि तयाची **वृत्ति न पाळीतीचि**। ( = वतन सोंपविणें )

१६२ वोहटळीची गोटी वोहटळां येइल की। ( एक म्हण )

१७१ बाइया व्याख्यान न धरे। ( = बाईला ज्ञान होत नाहीं )

१८७ हा अवघा **कानाखुरांसकट** अनुसरला। ( = सर्वस्वी )

१९५ यैसा कोणी मायेंचा पोटीं जन्मला नाही। ( = मायेचा पूत )

१९८ **कटावूनि** म्हणितलें। ( = मुद्दाम )

२०१ पैठण रुधिपुरीचे भात मज वेळवतीना। ( = मला करमत नाहीं )

२०४ तो अर्थपाठु त्याचा **कळांसि** बैसला। ( = बेमालूम )

२०४ श्लोकु वाखाणिला। ( = भाष्य करणें ) सं० व्याख्या।

२१३ अर्धे कुपीं अर्धे सूपी : ऐसें कां करितां। ( = अर्धवट काम )

२२८ थोरी **घे–दे** होत होती ।
२३२ पिस्या पिंपळगांवो काइ दूरि । ( = वेड्याला काय दूर ? )
२५४ एक दीसु ती **बहुत** राहिली । ( = तिचें दुखणें अधिक झाले )
२५९ कोण्हा माझे **वेकास** गेले असैल । ( = उणें अधिक बोललेले )
२६० भटोबासा **ईश्वरदर्शन** जाले । ( = मृत्यु )

वृद्धाचार

९ म्यां तुमची **जाणींव** यापुढे साधीतली[१] । ( = माहिती )
११ त्यासि ते घोकाविणें न बैसेचि । ( = जमेना )
२० सर्पे खादलें । ( = साप चावला )

लीळाचरित्र :

१–३६ बोंब जाली : धावणे नीगाले । ( = धावपळ, धावाधाव )
४२ वाणी पडली आणि म्हैसा आला । ( = बोलाफुलाला गाठ )
५१ गोसावीयाते सभा केले । ( = पच )
७४ ऐसें एइल चोजवित चोजवित । ( = चौकशी करीत )
९२ भुइं काढति जटै । ( = भुईपर्यंत पोचतात )
३–१८ जवं जवं तवं तवं स्थीति होये ।
२४ सभा घनदाट बैसली असे ।
२६ **रूची–अरूचीचिया** गोष्टी होत होत्या । = ( सुखदुःखाच्या )
२७ गावे नाचावे सूपली वाजवावी ।
३१ **नाव नाव** अवघा ठाई राखा । ( = थोडेंथोडें )
३० **पर्थौनि** करूनि दाखविजैल । ( = माझ्याकडून )
३९ कालि तरि कालि आलियांत : आजि तरि आजि आलियात।
४२ ते संध्या करूं करूं आले ।
४५ तैं आपण **किंचित्** होते या । ( = कृश, बारीक )
४७ **एकें पेणोंनि** मागिलीकडौनि । (= एका मुक्कामानें मागें )

---

१ "I have conveyed your knowledge to him," हा इंग्रजी वाक्प्रचार तुलनेकरितां पहावा.

४९ धायतवं खाइजे : **पाहे तवं** निजिजे । ( = उजाडेपर्यंत )

५८ मर मर पोरा : तुझा मढा बाधे घागरा ( एक म्हण )

दृष्टान्तपाठ :

दृ० १४ जेतुलजेतुला प्रपंची जडे तेतुलतेतुला परमेश्वरीं उजडे ।

१७ **ऐसा** सारी : **ऐसा** सारी । ( = उलथापालथ करी )

७२ हातातळीं हात वोडवीती ना । ( = याचनेला हात पुढें करणें )

८२ ते तयासि **तोंड दे** । ( = वाद घाली )

९० बाह्या भरैति, ( = दंड भरून आले )

९३ तयाचे जन्म **कडे** पडे । ( = सार्थकी लागे )

१०५ शौच्य केले । ( = शुद्ध झालो )

पूजावसर : " रात्रि **वडिल** असे : एवढेया वेळा बापुडे वानरे के जाइल । "

" उन्हाळे दीस तरि एकू सोगा एकीकडे : एकू **सोगा** एकीकडे : स्याळे दीस तरि खोल बूथि घालीति : पाउसाळे तरि : चादोवा धरीति । "

" ना तरि धाववीति : पळवीति : जुळवीति : **दरेदरकुटे** बूजवीति । गोसावी म्हणति : मरा मरा पोरे हो : तुम्हापसि **वर** ढोरे चाग : जेचि खाति तेंचि रोवतीति : एथौनि जाइजे । "

पद्यांतील :

' **शीर्शी बैसे** पीक : पुण्यफळाचें । ' उद्ध० १७६

( = कंटाळा आणतें )

' गोष्टी मातु करी वाउगी : वेळु फेडावेया । ' उद्ध० १८७

' **काढति** भुजायुगुलें : जिरति कपोळे । ' उद्ध० २०५

( = हात निखळतात, गाल बसतात )

' जाणतां दिधलें **मेल्हवणें** : संसारासि । ' उद्ध० २४८

( = तिलांजली दिली )

' मग **दिहा धवलेया** : आंतु रीगौनि बळिया । ' उद्ध० ५२५

( = दिवसाढवळ्या )

'तिहीं दीधलें वीश्वासि : **आंगावरि** ।' उद्ध० ६३४
(=अंगावर कर्ज देणें)
'मीचि गेलां बरळु ।' उद्ध० ७५४ (= भ्रांत झालों)
'मी **होडेचा** पांचाखरी ।' उद्ध० ७७३ (= हमखास गुण देणारा)
'जैसा कां गांजिला दे गाऱ्हाणें : समर्थासीं ।' ऋ० २५९
'ना तरि कृपाळुवाचिया सोइरिका : निमित्येवीण ।'
ऋ० २८१ (एक सुभाषित)
'ना तया राजमठा : सदैवी आणिला **दुखवटा** ।' ऋ० ४२६
(सात्वनपर भेट)
'सोनें **पीका** नीगालें ।' ऋ० ५१८ (= उजळले)
'निकुरेनि परतली कस्तुरी : श्रीप्रभूचे कान भरी ।' ऋ० ५९९
(= चहाडी करते)
'रात्री जाली **पाहाती** ।' शि० २२२ (= उजळूं लागली)
'तुम्हा लागीनिलिया गौमासिया : तरि वारा जा का ।' शि० २१९
'**काळरात्री**' उदो भणवीली : रणामाजीं ।' शि० ४४८
(= गोंधळ)
'राया **राणिअंचा जाळा** : जरि घे लोहाचा काटाळा ।'
शि० ४७१ (= बाईलवेडा)
'माझेनि नावे **पाणि जळे** ।' शि० ७५७ (स्त्रियांची एक म्हण)
'हात उभौनि जिंतले ।' शि० ८०५ (= प्रतिज्ञेनें)
'बहुत माणुष **रणां आले** ।' शि० ८७६ (= मेले)
'हा भीमु आपुलेनि नावें : **आणौनि आण** करील ।'
शि० ९२३ (= अचाट करील)
'जेथ मनाची नाखि न लगे ।' ज्ञा० १२-४१
(= प्रवेश होत नाहीं)

---

१ पहा "अंबाबाई उदो" प्रो० पोतदार, भा० इ० सं० मं०, चतुर्थ संमेलनवृत्त, शके १८१८

'तेव्हलिं विजयश्रियेचा। पाटीं एकु चि बैसे॥' ज्ञा०७-१२
'तैसीं बाधलिं सोडितां। बुडाली काढितां।
साकडीं फेडिता। आर्त्तांचिया।' ज्ञा० १६-१९९

## § १४ अर्थप्रक्रिया

भाषाशास्त्राच्या काटेकोर चौकटीत वास्तविक शब्दार्थशास्त्राला स्थान नाही. डॉ० भांडारकर, इतिहासाचार्य राजवाडे किंवा प्रो० ब्लोक यांपैकीं कोणीहि प्रस्तुत प्रकरणाचा विचार करीत नाहीत. भाषाशास्त्राचें लक्ष उच्चारप्रक्रिया आणि प्रत्ययप्रक्रिया याकडे म्हणजे भाषेच्या बाह्यागाकडे असते. उलट, शब्दार्थशास्त्रात भाषेचें अंतरंग पहाणेचे असतें. परंतु भाषेच्या बाह्य आणि आतर स्वरूपाची अशी चीरफाड करूनहि उपयोगाचें नाहीं. म्हणूनच अथप्रक्रियेचें प्रकरण प्रस्तुत प्रबंधात मर्यादित नसून सुद्धां यादव-मराठीचे संपूर्ण आणि यथार्थ दशर्न व्हावे एवढ्याचकरिता शब्दार्थशास्त्राचीं सर्वसामान्य तत्त्वे लावून तत्कालीन शब्दाची मीमासा पुढे करीत आहे.

प्रो० मायकेल ब्रील यानी आपल्या शब्दार्थशास्त्रावरील ग्रंथांत अर्थप्रक्रियेचे काही विशेष प्रकार व त्याची चर्चा दिली आहे. वर्णोच्चारातील फरक काही तरी नियमाप्रमाणे होतात, तसे शब्दार्थातील फरक होत नाहीत. म्हणजे उच्चारप्रक्रियेची कारणमीमासा करता येते, तशी अर्थ-प्रक्रियेची होऊं शकणार नाही, हे खरे. तथापि, प्रो० ब्रील यानी भाषेच्या स्वभावाचे विशेष म्हणून काही दिले आहेत.[१] ते असे...

| | | |
|---|---|---|
| १ | विशेषीकरण | Law of Specialization. |
| २ | विभक्तीकरण | „ „ Differenciation. |
| ३ | सामान्यीकरण | „ „ Irradication. |
| ४ | साम्याभास | „ „ False Analogy. |

शब्दांची अर्थप्रक्रिया वरील चार दिशांनी होत असते व उच्चार-प्रक्रियेशी तिचा मुळींच संबंध नसतो. तेव्हां, भाषेचे हे स्वभावविशेष ध्यानात घेऊन यादव-मराठीत अर्थप्रक्रिया कोणत्या स्वरूपाची दिसते

१ M. Bre'al : Semantics, pp. 1-50, and 60-77

त्याचें विवेचन करतों. यादव-मराठीतील गद्य व पद्य दोन्हीहि समृद्ध असल्यानें व वेदान्त, पौराणिक कथा, आठवणी, चरित्र, स्थलवर्णन इत्यादि विविध विषयांवर ग्रंथरचना झाल्याने साहजिकच अर्थप्रक्रिया मोठ्या प्रमाणात दिसते. अलंकारप्रचुर लेखनशैलीचा परिणाम एतत्प्रकरणी बराच झाला आहे.

( १ ) **अर्थसंकोचः**—शब्दाचा मूळ अर्थ विस्तृत असताना त्याऐवजी तो शब्द संकुचित अर्थाने वापरला जातो. उदा०

**रसाळ** ( < स० रसाल ) " की कोकिळा रसाळी : नेसो दीधलें।" उद्ध० १४ (= आम्रवृक्ष)

संस्कृतातहि क्वचित् हाच अर्थ-सकोच आढळतो. पहा—

" भृंगा रसालकुसुमानि समाश्रयंते।"–भामिनीविलास १–१०

**भूअरी** ( < सं० भ्रम् ) = उटी, उटणे, उगाळण्याची क्रिया.

" अनुलेपनाचिया भूअरी : मी अहंकारातें घोनारी।" उद्ध० १५९

**घालणें** ( < स० घातय् ) = हल्ला, चढाई.

" घालीति वित्तरागां घालणें।" – उद्ध० ४३५

**वोडण** ( वोडणे = पुढे करणे ) = ढाल

" तरि सुई वोडण माझेया जीविता।" – ज्ञा० ११–३७८

**महुरु** ( सं० मधुर ) = आंब्याचा मोहोर

" तया प्रेमाचा महुरु : शाभवसुखापसि मधुरू।"– उद्ध० ७९५

( हें उदाहरण विशेष होय. कारण, येथें मधुर हा तत्सम शब्द मूळार्थी असून महुर हा तद्भव मात्र संकुचितार्थी आहे )

**पेज** ( सं० पेय ) = तादुळाची वेळण – उद्ध० ७८३

**अवगति** ( सं०. अवगत = मिळालेले ) = सोंग, वेष.

" ते अवगती—बरव तोचि जाणे।" उद्ध० ६०३

**फुला** ( सं० पुष्पम् ) = फुलांचा गुच्छ. ऋ० ५११

**जानवसा** ( सं० जन्यवासः ) = वऱ्हाडाचा मुक्काम.

" दीधलें रुखवुत माडीं धवळारीं दीधला जानवसा।"

धo पू० ३०

**राणा-राणी** ( सं० राजन् ) = देवळाचा गुरव, गुरवीण, स्मृति० २, १०५
**अन्याकार** ( सं० ) = निराळे; विषण्ण
" परि नावेक अन्याकार जाले । " स्मृ० ८०
**सलाग** ( सं० सलग्न ) = सासारिक. स्मृ० १६९
**पात्र** ( सं० पात्र ) = व्यक्ति
" कोथळेयासारीखे पात्र जर पाणी पी तरि । " स्मृ० १९३
**लिंग** ( स० लिग ) = स्त्री० लीला० १–११
**सिंचणारा** ( सं० सिंच् ) = कारंज. शिशु० ६४३
**पांखर** ( स० पक्षः ) = झूल. शि० ९६२
**कवळी** ( स० कवलः = घास ) = मिठी, आलिगन
" उच्चपणे देती कवळी : धूमडळासी । " शि० ३२२
**जोडी** ( सं० युत ) = मिळकत. द० ६३
**लोखंड** ( सं० लोहखड ) = शेतीचे हत्यार
" तुमची जेतुली लोखंडे आहाति तेतुकी बाधौनि आमचीये बाजेबुडी ठेवा । " द० ५४

( २ ) **अर्थविस्तार:—**

**वाणें** ( स० वर्णः ) = सणंग, वस्त्र. उद्ध० ५८२
**बावन** ( का० बावन ) = पिवळे
" बावन रूप वेधाचें मूळ स्वभावे : भणौनि साच भणो । "
ऋ० ५३७
**नामना** ( स० नामन् ) = कीर्ती
" तया पुरुषाची नामना सारावी । " स्मृ० १०१
**माझें** ( = माझें येथें )
" तुम्ही माझें मासां दीसां जेवावें ।"–स्मृ० ५६
**पायांचे** ( = पायदळ )
" पायांचें भिडतां : तोडिति जानिवसे जे । " शि० १०४५
**अरल** ( का० अरळु = फूल ) पुष्पशय्या. उद्ध० १३०

(३) **व्यंजना, साम्याभास, अर्थभ्रंश,** वगैरेंमुळें होणारे बदल—

**कासणें** = युद्धास तयार होणें. उद्ध० २५

**वरिपड** (सं० उपरिपत्) = प्राप्त. उद्ध० ५०, वच्छ० १०७

**अवघडा** = संकट (नाम) उद्ध० ५६ 'तरि चुकती अवघोचि अवघडे।'

**विचारणें** = विचार करणे. उद्ध० ६४

**वाणें** (सं० अर्प्) = चाल करणें. उद्ध० ४२८

**हीरवा** (सं० हरित) = घात न करता, शाबूत. उद्ध० ४३९

"तो धरूनि हीरवा : ऋष्यश्रृंग रायापुढे सुआवा।"

**त्यागी** (सं० त्यज्) = देणारे. 'पडपत्यागी' = शोभा देणारे. उद्ध० ६४४

**अवघड** = आवरण्यास कठिण. 'अनादि अविद्या अवघडी।' ऋ० १६२

**जतन** (सं० यत्न) संरक्षण. ऋ० ५७३

**वाहाणें** = रस्ता रहदारीचा असणे. 'परमार्गु वाहाति सदैवें।' ऋ० ६१९

**द्दती** (सं० द्दति = तेज) = रस, चव. ध० पू० ५३

**विणें** (सं० वी) = देणें. "त्या वीतीं वीरगाठी।" ध० पू० ६९

**विस्तारणें** (सं० विस्तृ) = अन्न वाढणें. 'बोनें विस्तारिती नारी' ध० उ० ४४

**सुश्रुषित** = शिष्य. स्मृ० ५०

**चालतें** = वहिवाटींत असलेले. 'चालती घरें, चालती उखळें : चालतीया चुली।' स्मृ० ५१

**व्यवस्था** = हकीकत. 'व्यवस्था सांघीतली।' स्मृ० ९१

**हळु** = हलकें. 'झोळी हळु लागली।' स्मृ० १०७

**विराहित** = न कळत. 'केशोबासां विराहित म्हणितलें।' स्मृ० १३१

**प्रबळ** = पुष्कळ. 'प्रबळ तूप वाढिलें।' स्मृ० १३५

**दूषण** = अडचण. 'बहुत दूषण दाउनि वारिलें।' वृद्धा० ३

**जाणिव** ( सं० ज्ञापय् ) = माहिती. 'म्या तुमची जाणीव साधीतली ।' वृद्धा० ९

**दुभणें** (सं० दुह्=दूध काढणें ) दूध देणे. 'गाए दुभें ।' दृ०५४

**सांडणें** = आडवे होणें, लवंडणें. 'विसंवला प्राणनाथु सांडिजे ।' शि० ६०४

**वाढणें** = पुढे होणें, येणें. शि० ५६५

**जेवनी** ( सं० जेमनम् ) = उजवी, उजव्या बाजूची. 'जेवनी घातली ।' शि० १०२८ 'जेवनीअें भुजे' – शि० ५४७

**वहिला** (सं० प्रथम ) = आवडता. "मनापासौनि वहिला ।" शि० ५१

**एकसर** (सं० एकसर = एकगति ) = संपूर्ण, केवळ. 'तें ब्राम्हण एकसर साबडें'—शि० २०४

( ४ ) खालील **शब्दांचे मूलार्थ** यादव-मराठीत कायम आहेत. परंतु वर्तमान मराठीत मात्र ते बदलले आहेत.

**विज्ञापन** ( सं० ) = जाहीर केलेले, कळविलेलें.

" एथिचेया नामधारका : विज्ञापन परिवारिआ मार्गिका ।" ऋ० ६३६

**अपरोक्ष** ( सं० ) = साक्षात्, प्रत्यक्ष

" आचारतेया पुरुषा शाब्दाचि अपरोक्ष म्हणणें ।" स्मृ० २४८

**चौगुण** ( सं० चतुर्गुण ) = चौपट

" असो हे चौगुणा चढली भरिमळा । " शि० २७३

**दुपाहारीं** ( सं० द्विप्रहरौ ) = दोन प्रहरात ( दुपारीं नव्हे )

" चादिनेयाचिआ दुपाहारीं : वाया निनिली बाहिरी ।" शि० ८३१

याखेरीज ग्राम्यतापरिहार, अकारण गौरव वगैरे अनेक कारणें अर्थ-प्रक्रियेचीं आहेत. परंतु तीं कारणें होत, प्रकार नव्हत. अर्थात् त्याचा विचार

---

१ हिंदींत अद्यापि 'विज्ञापन' हा शब्द 'जाहिरात' या अर्थीं आहे.

प्रस्तुत प्रबंधाच्या कक्षेंत येत नाहीं. भाषेंतील शब्दांचे हे भिन्नभिन्न कल शास्त्राच्या सीमेंत येऊं शकत नाहीत. या संबंधीं प्रो० ब्रील म्हणतात—[१]

"...How should words have tendencies? Nevertheless, we hear of a pejorative tendency, of a tendency to deteriorate, etc. These tendencies must take their place among those 'forces' with which the science of the Middle Ages peopled nature."

एतावता अशा स्वभावविशेषाची नोंद करण्याचे कारण नाही. प्रो० ब्रील यानी एकंदर अर्थप्रक्रियेची केलेली मीमासा प्रस्तुत प्रकरणी उपयुक्त वाटेल म्हणून ती पुढे देतों. ते म्हणतात—[२]

"One fact which dominates the whole subject is that by a necessity our languages are condemned to a perpetual lack of proportion between the word and the thing. Expression is sometimes too wide, sometimes too narrow."

वरील उद्गारात अर्थप्रक्रियेचें ह्लद्गत सागितलेले आहे. यादव-कालीन मराठीच्या अर्थप्रक्रियेची मीमासा अशीच करिता येईल. परंतु अर्थप्रकरण विषय-मर्यादेपलीकडील असल्यानें येथें अधिक चिकित्सा करण्याचे प्रयोजन नाहीं. यादव-मराठीच्या दृष्टीने विवेचन संपूर्ण व्हावे एवढ्याचकरिता वरील उदाहरणें दिली आहेत.

---

१ Semantics : pp. 99
२ Semantics : pp. 106

# भाग ४ था

# परभाषांचा संसर्ग

## प्रास्ताविक

दोन भिन्न भिन्न भाषिकांच्या निकट सहवासाने त्यांच्या भाषांचा एकमेकींवर परिणाम होऊं शकतो. ही अवस्था यादव-कालीन मराठीची झाली. द्राविडी भाषिकांशी तिचा निकटचा संबंध आल्याने काही बाबतीत या आर्यभाषेला द्राविडी वळण लागल्याचे दिसेल. या सान्निध्यजन्य परिणामाचे टिपण करण्यापूर्वी तत्कालीन मराठी भाषेभोवती द्राविडीचे वातावरण कसे पसरलें होतें ते दाखवितों.

कानडी भाषा ही मराठीहून निःसंशय प्राचीन असून तिचा जन्मकाल दुसऱ्या शतकात मानला जातो. कानडींतील पहिला ग्रंथ "**श्री विजय**" हा समंतभद्र श्री विजय नावाच्या जैन लेखकाने इ० स० ४५० त लिहिलों. नृपतुंगाचा **कविराजमार्ग** हा काव्यशास्त्रविषयक ग्रंथ इ० स० ८१४ त झाला. म्हणजे देवगिरीच्या यादवाची राजवट सुरू होण्याच्या फार पूर्वी कानडी भाषा व वाङ्मय ही चांगलीच फोफावली होती व यादव-कालात त्यांचा अभ्यासहि मराठी पंडिताकडून झाला असला पाहिजे. कानडीला म्हैसूरच्या गांग राजाचा आश्रय होता व तसेच देवगिरीकर यादवांची ती राजभाषा नसली तरी त्यांचा ओढा तिकडे असावा. निदानपक्षी ती यादवांच्या दरबारी सन्मान्य होती हे खचित. हळेबीडचे होयसळ यादव हे तर पूर्णतः कन्नडिग असून त्यांचा तसा उल्लेखहि गदगच्या शिलालेखात (इ० स० ११९१) येतो.[२] देवगिरीचे कृष्णदेव (इ० स० १२४७–६०) व महादेवराय (इ० स० १२६० ते ७१) यांचे कन्नडप्रेम त्यांच्याच प्रधानांच्या मल्लीशेट्टी, चौंडिशेट्टी, कामय्या नाइक या कानडी नावावरून दिसतें. सिंघणाचा (इ० स० १२१०–३८) बीचण्ण हा हस्तक असून

---

१ द० रा० बेंद्रे : "ज्ञानेश्वरपूर्वकालीन कानडी वाङ्मय" (म० सा० पत्रिका, व्हॉ० ७

२ राइस : "कन्नड शिलालेख"

त्यामार्फतच त्यानें म्हैसूर व कर्नाटक हीं जिंकलीं. यावरून त्याकाळीं कानडीचा विस्तार कसा व किती होता हें दिसेल. आणखी पुरावा शिलालेख व ताम्रपट याचा देतों. येथें भाषा व लिपी ही बहुशः कानडीच आढळतील. आजचे मराठी प्रांत यादवकालीं कानडी असावेत असें कांहीं शिलालेखांवरून वाटतें. भाषा संस्कृत व लिपी कानडी, भाषा कानडी व लिपी देवनागरी, आणि भाषा मराठी तर लिपी कानडी असे त्रिविध प्रकार या शिलालेखात आहेत. त्याची यादी खालीं देतों.

१ तेरचा[1] शिलालेख, इ० स० १०७८

भाषा कानडी आहे. तेर बार्शीजवळ असून तेथें गोरोबा कुंभाराची समाधि आहे.

२ गोमांतकी[2] मराठी ताम्रपट, इ० स० १३००

लिपी कानडी, भाषा मराठी.

३ तिसरा गोविंद राष्ट्रकूट याचा मंडळ[3] ताम्रपट, इ० स० ८१०

भाषा संस्कृत, परंतु कानडी छटा.

४ चिक्क-बागेवाडी ताम्रपट, इ० स० १२४९

भाषा हळेकन्नड.

५ मंगळवेढें[4] शिलालेख, इ० स० ११०३

भाषा मराठी व कानडी.

यांवरून असें दिसतें की **यादवकालीन महाराष्ट्राच्या सीमा आजच्याहून भिन्न होत्या.** बदामीच्या चालुक्यांपासून कल्याणीच्या कलचुरी घराण्यापर्यंत महाराष्ट्रावर कन्नड राजांचा अंमल होता आणि या कालांत ती राजभाषा असल्यानें कानडीची सावली महाराष्ट्रातील मराठीवर पडली असलीच पाहिजे. कानडीचा संपर्क टाळणे हे त्या मराठीला शक्य नव्हतें,

---

१ Dr. Barnett : Epigraphia Indica, xix 39. Cousins and Bourgess : Archeological Survey of India, pp. 199 (1902-3)

२ भारत-इतिहाससंशोधक मंडळ, वार्षिक १९१५

३ ,, ,, ,, ,, त्रैमासिक, व्हॉ० १ :

४ खरे : द० म० इ० साधनें.

इतक्या त्या दोन्ही एकमेकींत मिसळल्या होत्या. नृपतुंग हा कानडी कवि तत्कालीन तिरुळ् कन्नडच्या म्हणजे गाभ्याच्या कानडी भाषेच्या कावेरी-पासून ते गोदावरी नदीपर्यंत सीमा सांगतो त्या अशा—

किसवोळल्[1] ( = विजापूर जिल्ह्यांतील पट्टकदल )
कोप्पणनगर ( = कोप्पळ, रायचूर जिल्हा )
पुलिगेरे ( = लक्ष्मेश्वर, धारवाड जिल्हा )
ओकुंद ( = ? बेळगाव जिल्हा )

जुन्या कानडीच्या या सीमावरून मराठीचा या भाषेशी असणारा निकटचा संबंध अजमाविता येतो.

आणखी एक प्रमाण या विषयासंबंधी देतों, आणि ते म्हणजे **पंढरपूरच्या श्री विठ्ठल संप्रदायाचें.** हा संप्रदाय मूलतः कानडी दिसतो. चौंडरस, पुरंदरदास, कनकदास इत्यादि प्राचीन कानडी संतकवींचें विठ्ठल हेच एकमेव दैवत होते. इ० स० १३०३ च्या सुमारास होऊन गेलेला चौंडरस हा कानडी कवि आपल्या "अभिनव दशकुमारचरिते"[2] या ग्रंथांत एक विठ्ठल-स्तुतिपर अष्टक घालतो व पंढरपूरच्या विठ्ठल-मंदिराचें वर्णन करितो—

"मेरेव चेन्निग विठ्ठलरायनेप्पिदं ।"

पंढरपूरच्या देवळातील कानडी शिलालेखात[3] ( इ० स० १२३७ ) पंढरपूर या ऐवजी 'पंडरगे' असा उल्लेख आहे. अविधेय राष्ट्रकूटाच्या इ० स० ५१६ तील ताम्रपटांत[4] "पाडरंगपल्ली" हें नाव येतें. पंढरपूरचा हा सर्वात प्राचीन उल्लेख होय. यावरून पंढरपूर हे नाव संस्कृत पाडुरंगपूर यापासून न निघता कानडी 'पंडरिगे' यापासूनच निघूं शकतें हें श्री० खरे[5] याचें मत सिद्ध

---

१ नृपतुंग : "कविराजमार्ग" इ० स० ८१४

२ नरसिंहाचार्य : 'कर्नाटक कविचरिते' भाग १ पान ४०३

३ ग० ह० खरे : 'श्री विठ्ठल आणि पंढरपूर'

४ Report of Mysore Archeological Department, 1929 pp. 198

५ ग० ह० खरे : 'श्री विठ्ठल आणि पंढरपूर'

होतें. तसेंच 'विठ्ठल' हा शब्दहि संस्कृत 'विष्णु' याचा कानडी अपभ्रंश आहे, प्राकृत अपभ्रंश नव्हे.

सं० विष्णु > का० बिट्टु

> का० विट्टु + 'र' (कन्नड मानार्थी अ० व० प्रत्यय)

> म० विठ्ठु + ल

डॉ० भांडारकर[१] याच्या मतेंहि हा शब्द मूळ संस्कृतचा कानडी अपभ्रंश आहे. म्हणजे मराठी 'विठ्ठल' हा शब्द संस्कृतातून कानडीच्या द्वारा आला. मॉ० झिलस्की हे तर विष्णु या देवतेस द्राविडी मूळ व ऑस्ट्रो-एशियाटिक नाव सुचवितात[२] (ऑस्ट्रो-एशियाटिकमध्ये 'ष' आणि 'ठ' या वर्णांची अदलाबदल होते. त्याप्रमाणें विष्णु >विठु असें रूप होईल.)

विठ्ठल-पंढरपुराचे हे सारे उल्लेख आणि या शब्दाची व्युत्पत्ति यावरून विठ्ठल संप्रदाय कानडीच होता असें अनुमान निघतें. हंपी (विजयनगर) येथील विजयविठ्ठलाच्या मंदिरात आज पंढरपुरात असलेली विठ्ठलमूर्ति होती हा आणखी एक पुरावा आहे. डॉ० नारायणरांव हे आपण विजयानगरच्या विठ्ठलमंदिरातील अवशेषात डाव्या कडेवर रुक्मिणीची सूक्ष्म आकृति असलेली एक विठ्ठलमूर्ति पाहिल्याचें सांगतात. ही मूर्ति बहुशः मूळाची प्रतिकृति असावी व या विधानाला नामदेवाच्या "वामार्गी रखुमाई दिसे दिव्य शोभा" या प्रसिद्ध उक्तीमुळे बळकटी येते. तात्पर्य, यादव-कालीन विठ्ठलसांप्रदायी मराठी कवींना विठ्ठल हें दैवत व मूर्ति हीं कानडी आहेत अशी जाणीव असावी. रा० आवटे याचा 'सकलसंतगाथा' तर ज्ञानेश्वराचा म्हणून एक संपूर्ण कानडी अभंग देतो. तो अभंग असा—

१ Dr. Bhandarkar : "Vaishnavism and Shaivism."

२ M. Zilleski : Archiv Orientalene, Vol, IV No.2 Translated into English by Mythic Society, Banglore.

३ Dr. C. Narayanrao : Summary of papers—8th Oriental Conference, Mysore, pp.114.

"आकानि केळले चिकाना तुमा । भारले धसिणे मरुळादने ।
चलुवाने पंढरीराया चलुवाने । यह्ले दोनर्कवाने ।
पुंडलीकने भक्तिबंदा । रखुमादेवीवर विठ्ठलुने ।" १०१
(आवटे-प्रत, १९२४)

हा अभंग प्रक्षिप्त म्हणून संशयास्पद मानला तरी इतर ठिकाणी विठ्ठल हें दैवत कानडी असें ज्ञानेश्वर मान्य करतात. उदा०

"**कानडा हा विठ्ठलु** कर्नाटकु । तेणें मज लाविलें वेधीं ।"
ज्ञानेश्वरीतहि कानडे म्हणजे कठिण या अर्थी प्रयोग आहे. पहा—

"आता केती नावा नावां गूज ।
म्हणता कानडे हान आवडैल तुज ।" ज्ञा० ९-४२

या नंतर पुढें तीनशे वर्षांनी सुद्धा महाराष्ट्र कवींत ही जाणीव कायम होतीच. एकनाथाचा पुढील अभंग पहा—

"**तीर्थ कानडें देव कानडे** । क्षेत्र कानडे पढरीये ।
**विठ्ठल कानडे** भक्त हे कानडे । पुंडलीकें उघडे उभे केले ।
एका जनार्दनी भक्ताचिया चाडा । **विठ्ठल कानडा** विटेवरी ।"

एतावता आपला संप्रदाय, आराध्य दैवत, मूर्ति आणि क्षेत्र हीं सारीं मुळात कानडी असल्याची साक्ष महाराष्ट्र-कवि देतात. यादव-कालीन मराठीवर कानडीचा परिणाम होण्यास वरील गोष्टीची मदत झाली असावी. यादव-कालाच्याहि पूर्वीचा कानडीचा विस्तार, ताम्रपटाची स्थळें व स्वरूपें, आणि विठ्ठल संप्रदायाचे मूळ या तीन प्रमाणावरून मराठी-कानडीचा संपर्क अजमाविता येतो. भाषिक देवघेव ही तेव्हा टाळतां येण्यासारखी नव्हती.

हा परिणाम भाषेच्या चार प्रांतात झाला—

१ शब्द
२ उच्चारप्रक्रिया
३ प्रत्ययप्रक्रिया
४ वाक्यरचना

तो अनुक्रमें पुढें देतों—

## § १ शाब्दिक संपर्क

यादव-कालीन मराठीनें कानडीपासून अनेक शब्द साक्षात् वा संस्कृत-प्राकृतद्वारा उचलले आहेत. पैकीं दुसऱ्याचा विचार विषयमर्यादेंत येत नाहीं. संस्कृतातील द्राविडी शब्दांचे मान, संस्कृत-भाषाशास्त्रकार पहातील. येथें फक्त जेवढे द्राविडी शब्द साक्षात् मराठीत आले तेवढ्यांचाच विचार करणें आहे. शिलालेखापासून आरंभ करतो. यादव-कालीन मराठी शिलालेखात खालील कानडी शब्द आहेत—

(१) "गंगाराजें **सुत्तालें** करवियलें" (श्रवणबेळगोळ इ० स० ९८३)
का० सुत्ताल = देवळाभोंवतालचा कोट.
(या शब्दाचा अर्थ सुतानें, मुलानें असा कै० भावे आदिक करतात, तो बरोबर नव्हे.)

(२) "अर्धमापहारी रूपाचे **सूंक**" (पाटण, इ० स० १२०६)
का० सूंक = जकातपट्टी.

(३) "देवस्छलासि गुरवि **ओडेरि**
सत्रस्छलासि ब्राह्मणु **ओडेर**।" (तासगाव ताम्रपट[1], इ० स० १२५०)
का० वोडेयर = मालक, अधिपति.

(४) '**ससदवरु**' (पीरवाडी ताम्रपट[2], क्रमांक १, इ० स० १२०४)
का० देवरु (रु-रि हा कानडींत मानार्थी प्रत्यय आहे.)

(५) "पुराणवृत्ति भूमि **सर्वनमसेन**" (नेवासे, इ० स० १२३९)
का० सर्वनमस्य = बक्षीस.

यांपैकीं 'देवरु' हा शब्द जरी मूलतः कानडी नसला तरी सं० देव याला लागलेला 'रु' हा अ० व० मानार्थी प्रत्यय कानडीच आहे.

---

१ भारतइतिहाससंशोधक मंडळ, त्रैमासिक व्हॉ० १५

२ इ० स० १२०४ मधील तीन ताम्रपट–राजवाडे, भारतइतिहाससंशोधक मंडळ, वार्षिक १९१४

**ज्ञानेश्वरींतील कानडी शब्द[1] :—**

| अध्याय | ओवी | शब्द | कानडी शब्द व अर्थ |
|---|---|---|---|
| १ | ९ | चोखाड | चोक्कळ = शुद्ध |
| १ | ९ | मिरवणे | मेरे = चकाकणें |
| १ | ५२ | कडसणे | कड = घुसळणें |
| १ | ८५ | मातु | मातु = शब्द |
| | | | ( तेलुगू–माटा = भाषा, गोष्ट ) |
| १ | ११६ | पन्नासणें | पण्ण = माडणी करणें |
| १ | २३३ | किडाल | किडु = बिघडणे |
| २ | ३३९ | अडदरु | अड्डु = अडथळा |
| ३ | २१ | भीड | भिडे = विनय |
| ३ | १०० | ओलग | ओळग्गिसु = सेवा करणें |
| ४ | १०६ | ओगर | वोगर = भात |
| | | | ओरग्गियसु = खाणें |
| ६ | २५ | आडणे | आट्टिसु = अडथळा करणें |
| ६ | ३१४ | आटु | ” ” |
| ६ | ९८ | भांगार | भागार = सोने |
| ९ | २१२ | पौलि | पौलि = आवार |
| ११ | ३५८ | हुडा | हुडा = बुरुज |
| १२ | ७० | बोचर | बोच्चु = दंतहीन |
| | | | ( तेलुगू–बोक्की ) |
| १२ | २१० | विढार | बिडार = रहाण्याची जागा |
| १२ | ५२ | आडवंक | अड्डवंक = दांडा, गज |
| १३ | २६ | लांचकरु | लंच = लांच |

१ या यादीकरितां प्रा० जोशी यांच्या ओरिएंटल कॉन्फरन्स ७ वी (१९३३) मधील लेखाचा उपयोग झाला. परंतु प्रो० जोश्यांनीं दिलेले बरेच शब्द कानडी नसून तद्भव आहेत. ते अर्थात् मीं गाळले आहेत.

| अध्याय | ओवी | शब्द | कानडी शब्द व अर्थ |
|---|---|---|---|
| १३ | २४३ | बाग | बगे = रीत, पद्धति |
| १३ | ३३५ | हरलु | हरळु = खडा |
| १३ | ४१८ | हडपु | हाडिपु = नोकर |
| १३ | ४१८ | उलिग | ऊळिग = सेवा |
| १३ | ५६९ | मुरकुंडी | मुरि = वाकविणे |
| | | | ( ते० मुरिकोन्नु = मोडणे ) |
| १३ | ५४१ | सूड | सूडु = जळणे |
| | | | ( ते० सुडिचु = द्वेष करणे ) |
| १३ | ४१८ | उगालु | उगुलु = थुंकणे |
| १३ | ६३२ | आडसो | अडसु = रेटणें, ढकलणें |
| १३ | ५५० | केळवणें | केळे = काळजी घेणे |
| १४ | १४० | तूंक | तुकमु = वजन करणें |
| १५ | १५० | टका | टक्के = निशाण |
| १५ | ९२ | बेबल | बेबळ = जोर |
| १६ | १५१ | साटी | साटी = सारखेपणा |
| | | | ते० साटी = बरोबर |
| १७ | १६३ | मेचु | मेच्चु = स्तुति करणें |
| १७ | ४०४ | वोरकल | ओरेकल्लु = कसोटीचा दगड |
| १७ | ४१५ | चडकणा | चटकाणी = थापड |
| १८ | ६८७ | मदवी[1] | मदवी = लग्न |
| १८ | ४८९ | आकसाला | अंगसालेर = सोनार |

१ ‘मदवी’ हा शब्द मराठींत अर्थ बदलून आला. पहा–
“आतां अविद्येचां गांवीं । मोहाची वेढूनि मदवी”। ज्ञा० १८।६८७
“सुभाक्षणीं नीचनवी । हरयाची चोख मदवी ।” अमृ० ७।१२६
येथें अर्थ ‘वरणें’ असा असून मूळ कानडींत “लग्न” हा आहे.

| अध्याय | ओवी | शब्द | कानडी शब्द व अर्थ | |
|---|---|---|---|---|
| **अमृतानुभव** | | | | |
| १ | ३६ | बोणें | | |
| ७ | १२६ | मदवी | | |
| ७ | १११ | बरड | बरड्डु | = माळजमीन |
| **उद्धवगीता** | | | | |
| | १९ | तोवरु | ओत्तु | = बहर |
| | २८ | हेवा | हेव | = मत्सर |
| | १७० | भागार | भागार | = सोने |
| | १८२,४३४ | उलीगवाडी | उळि | = चोर |
| | १३० | अरल | अरळु | = फूल |
| | ४५५ | चडकणा | चटकाणी | = थापड |
| | ५२० | काडगुंडा | गुंडा | = दगड |
| | ५४३ | तुकाआगळा | तुका | = वजन |
| | ५४७ | वोरकल | ओरेकल्लु | |
| | ५९४ | भैरवगुडा | गुडा | |
| | ५२३ | अडण | अड्डु | = भय |
| | ४९१ | खोपा ( घरटे ) | कोप्पे | = पिशवी |
| | ६३८ | वोळग ( सेवा ) | | |
| | ७३१ | दगडगुडा | दक्कड + गुंडा | |
| **ऋद्धिपूर वर्णन** | | | | |
| | ४५ | बावने | बावन | = चंदन |
| | ५१ | वोळगवट | वोळग | = सेवा |
| | २८ | सगर | सग्गर | = पायवाट |
| | १३४ | गुंडा | गुंडा | = दगड |
| | १७८ | तुकमठ | तुक | + मठ |
| | २०४ | उलींग | उळिग | = काम, सेवा |

| ओवी | शब्द | कानडी शब्द व अर्थ |
|---|---|---|
| ३१९ | बोरा | बोरु = खडा |
| ३८६ | हावरु | हेव + रु |
| ५१७ | इडरी | इड्डुली = एक पक्कान्न |
| ५०९ | वोगर | ओग्गर |
| ४४२ | अरवारु | अरलु |
| ४९३ | उलंगिया (सेवक) | उळिग |
| ५४२ | एळा | यालक्की = वेलदोडा |
| ५७० | कळिकोळिगा | कोळग = भ्रमर |
| **शिशुपालवध** | | |
| ६०,५२७ | गुढी | गुड्डि = पताका |
| १३३ | चाहाडाचाहाडी | चाडिचुकली |
| १६० | उरगुढें | उरु = खेडे, + गुढे = देऊळ |
| ४०७ | दळभिड | भीडे |
| ४४० | ओगरु ( घास ) | वोग्गर |
| ५७० | गुढरूं | गुडर = सतरंजी |
| ५१० | आगिटोपरें | टोप्पा = शिरोभूषण |
| ६१५ | चविनट | चवि = चव |
| ७९८ | अरुवारु | अरळु |
| **धवळे** ( महदंबा ) | | |
| पूर्वार्ध | | |
| १७ | वोळग | वोळग |
| २९ | कुडगी | कुडगी = हातांतील दागिना |
| ४७ | गुढर | गुडर |
| ५४ | तुकणें ( हालविणें ) | तुक |
| ५६ | वोजा | ओजे |
| ४५ | केळवणें | केळे = स्नेह |

| ओवी | शब्द | कानडी शब्द व अर्थ |
| --- | --- | --- |
| ६९ | आडा ( ओळ ) | अड्डु |
| ७३ | अंदु | अंदु = पायांतील दागिना |
| ७३ | कळाविया ( हस्तभूषणें ) | कै = हात |
| उत्तरार्ध | | |
| ८ | ओघमान | ओग्गु = अतिशय |
| ४२ | मुडे | मुडि = हस्तभूषण |
| ४२ | मफौरे-मुप्पुरि ( तीनपेडी माळ ) | ( मूरु = तीन + हुरि = पीळ ) |
| ४२ | एरणी | ऐरणी = हाराडेरा |
| ६० | धीर्वदा ( एक पेय ) | पीर्वदु = हीर्वदु[1] |
| **स्मृतिस्थळ** | | |
| २८ | बोडी ( डबके ) | बोड्डि |
| ९७ | तोडगळसुरी | तोड्डु |
| १७९ | गारी | गारी ( खड्डा ) |
| २१९ | हावरु ( हुंदका ) | हाव |
| **वृद्धाचार** | | |
| २३ | बहळ | बहळ = विपुल |
| **दृष्टान्तपाठ** | | |
| १७ | बोडी | बोड्डि |
| २८ | कुंभचासी | सं० कुंभ + का० तास = शेत |
| ५८ | कोल | कोल्लु = काठी |
| ६८ | आळि | आळु = रडणें |
| ९२ | हाडगुड | हाड + गिड |
| १०६ | झळका ( चकाकी ) | झळका |

---

१ "The 'P' period and 'H' period in Kannad"
Kannad–English Dictionary ( Rev. Kittel )
—Preface, pp. iv

**लीळाचरित्र भाग १**

| | | |
|---|---|---|
| पृष्ठ ३६ | चडकणा | चटकाणी |
| ३८ | तराळु (पहारेकरी) | का० ते० तलीर |
| ४७ | हाडगुडें | स० अस्थि > हाड + कानडी 'गि' हा सादशब्दाचा[1] वर्ण. येथे मुख्य शब्द तद्भव असून त्याचा प्रतिध्वनि कानडी आहे. |
| ६४ | लवलव ( घाईनें ) | का० लघुलघु ( क्रि० वि० ) अर्वाचीन मराठींत 'हलु' ( सं० लघु ) याला अर्थ उलट आहे. अर्थात् 'लवलव' या शब्दावर कानडीची छाया आहे. |
| भाग ३ | चीरकुट | सं० चीर + का० गुट्ट |

**तामीळ शब्द** :—यादव-कालीन मराठीने तामीळ भाषेतून दोनच शब्द घेतलेले दिसतात.

१ **पेंव** < ता० पयंबु = खळगा

"किंबहुना जे पेव । विंचुवाचें" ज्ञा० ८।१४३

२ **पिलूं-पिलें** < ता० पिलु

"व्याधापासौनि सुटलें । आर्तु पक्षिणीचें पिलें ।" ऋ० ३८५

**तेलुगू शब्द**:—तेलुगू भाषा ९ व्या शतकात जन्मली, आणि तिचे व मराठीचे प्रांत लागून असल्यानें साहजिकच काही शब्द तिजपासून मराठीनें घेतले. अर्थात् हे ऋण कानडीच्या द्वारा आलें. म्हणजे तेलुगू-कानडी-मराठी अशी परंपरा आहे. यादव-मराठीचा तेलुगूशी निकट संबंध आला असावा असें 'पंडिताराध्यचरित्र[2]' ( इ० स० १३०० )

१ मागील प्रकरणांतील सादशब्द-विचार पहावा.

२ "ज्ञानेश्वरकालीन तेलुगू ग्रंथांतील मराठी गाणीं" प्रा० पोतदार, भा० इ० सं० मं०, त्रैमासिक, व्हॉ० ११

या तेलुगू ग्रंथातील मराठी गाण्यावरून दिसतें. त्या मराठी गीतातील 'अप्पुले लिंग,' 'अत्तु' 'घेत्त' यातील द्वित्त व्यंजने ही निःसंशय द्राविडी होत. तेलुगू शब्दः—

१ **बुरी** ( चिखल ) < ते० बुरड

" वोढालाचा सुरी । आखरु आते बुरी ।" ज्ञा० १३–५५७

२ **उबात** ( उकाडा ) < ते० उब्ब

" का उबातेंनि वस्त्र फेडिले ।" ज्ञा० ८–६५

३ **येकवंकी** ( एकपणा ) < ते० वंकबंकी ज्ञा० ४।१२

४ **जाकळणें** ( व्यापणे ) < ते० जागिलि

" दिठी जाकलौनि निगों पाए ।" ज्ञा० ६–२६७

" मग जाकलिला ढेकरे : तृप्तु जैसा ।" ज्ञा० १८–१७

५ **टाळें** ( कुलुप ) < ते० टाळमु

" फेडावेआ गुणचित्ताचे टाळे ।" उद्ध० ६८३

" कामकळिकेसि टाळी घातली ।" शिशु० १९०

६ **जाडी** ( कांबळे ) < ते० जाडी

–स्मृ० ८, लीळाचरित्र १–६६

७ **तूप** < ते० तुप्प

८ **गदारोळु** < ते० गंदरगोळयु ( का० गद्दल )

" साडौनि गदारोळु : मज एणे घातला आळु ।"–शि० १९२

येथवर यादव-मराठी आणि द्राविडी यातील शब्दसाम्य पाहिलें. परंतु भाषाशास्त्रात, विशेषतः भाषिक परिणामासंबधीच्या चर्चेत, तौलनिक शब्दकोशाचा पुरावा तितका सबळ मानला जात नाहीं. परकीय भाषेपासून अनेक शब्दाचें लोण घेऊनसुद्धा मूळ भाषेचा स्वभावसिद्ध सांगाडा अविकृत राहूं शकतो. म्हणून तौलनिक शब्दकोशावर न विसंबता वर्णप्रक्रिया व प्रत्यय-प्रक्रिया तपासल्या पाहिजेत.

## § २ वर्णप्रक्रिया

वर्णप्रक्रियेसंबंधी पाहता, प्रत्येक भाषेला तिची स्वतःची अशी परंपरा असते व तिला धरूनच भाषेच्या वर्णांत बदल होत असतात, हे लक्ष्यांत आणलें पाहिजे. या नियमाप्रमाणें, यादव-मराठी ही संस्कृत, प्राकृत

व अपभ्रंश यांचीच वर्णप्रक्रिया पुढें चालविणार हें स्पष्ट होय. परंतु परंपरेव्यतिरिक्त इतर परिणाम भाषेच्या वर्णप्रक्रियेवर होऊंच शकणार नाहींत हें मात्र खरें नव्हे. शब्दऋण शक्य व उच्चारऋण अशक्य हें विधान पूर्णपणें सत्य नव्हे. आजहि आपण इंग्रजीच्या सहवासामुळें मराठींत 'फ' चा 'f' असा दंत्योष्ठ्य उच्चार आलेला पहातोच कीं नाहीं? फारशीमुळें अंतर्गत 'अ' चा एक विशिष्ट निभृत उच्चार व अल्पप्राण 'ह' चें प्राबल्य हीं मराठींत शिरलीच कीं नाही? आणि असें असूनहि मराठीनें पूर्वपरंपरा सोडली असें नाहीं. हीच गोष्ट यादव-मराठीची होय. तिनें अपभ्रंशाचें वळण कायम ठेवून शिवाय काहीं द्राविडी विशेष उचलले. दक्षिणेकडील पाड्याचा व आर्यांचा संबंध तिसऱ्या शतकापासून[1] आला, व साहजिकच आर्य आणि द्राविडी भाषांचा संपर्क इतका जुना तरी खचित असला पाहिजे. तेलंगणांत व कर्नाटकात इ० स० २५० च्या सुमारास महाराष्ट्री-प्राकृत वा तत्सम भाषा बोलली जात असावी असें राईसनें[2] प्रसिद्ध केलेल्या शिलालेखांवरून दिसतें. कृष्णस्वामी आयंगार[3] हे या विधानाला पुष्टि देतात व एका अति प्राचीन शिलालेखामुळे[4] त्याला निश्चिति येते. या ८०० हून अधिक वर्षांच्या संबंधामुळे खालील परिणाम यादव-मराठीवर द्राविडीचे उच्चारदृष्ट्या झाले आहेत.

(१) **य्–व् या अर्धस्वरांचें बाहुल्यः**—अपभ्रंश स्वरांच्या जागीं यादव-मराठीत बरेच वेळां 'य्–व्' हे अनुक्रमें तालव्य व ओष्ठ्य अर्धस्वर येतात. जसे—

सं० दानप्रसाद

> अप० पसाअ (णायकुमारचरिउ २–६–१०)

> म० दायपसाय (धवळे पू० ४, ज्ञा० १८–१७७२)

---

१ चिं० वि० वैद्य : "द्रविड देशांतील आर्यांचा प्रसार" भा० इ० सं० मं०, त्रैमासिक, व्हॉ० १

२ एपिग्राफिआ कर्नाटिका, व्हॉ० ७, पान ६.

३ 'Beginning of the History of South India.'

४ Jagayyapeth Stupa : Ind. Antiquary Vol. 11

तसेंच, सं० सुभग > अप० सुहअ ( णायकुमार ३-५-१० )
> म० सुहाव ( ऋद्धिपूर २०५ )

अशींच सं० तत् > म० त्यें, सं० एक > म० येक ही सर्वनामांचीं उदाहरणें प्राचीन मराठींत आहेत. भूतकर्मणि कृदन्तें पहा— सं० विद्ध, कृत, > म० वेधियले, करियेली. ही 'य' श्रुति व 'व' श्रुति द्राविडीद्वाराच आली. द्राविडीच्या संसर्गानें ती अपभ्रंशातसुद्धा दिसते. द्राविडी भाषात मध्यस्वराच्या जागी 'य्-व्' सहज येतात. उदा० ' वर - एळ्ळ्इ = वरवेळ्ळ्इ
पुलि - इल = पुळियिल

हीच प्रक्रिया अपभ्रंश व प्राचीन मराठी यानी उचलली.

(२) मराठीनें **मूर्धन्य व्यंजनें** द्राविडीतून घेतलीं की काय यासंबंधीं आजवर बरीच चर्चा झाली आहे. डॉ० काल्डवेलच्या मतें[1] इंडोआर्यनमध्ये ही मूळची नव्हती. हे विधान काही प्रमाणात एका 'ळ' पुरते तेवढे खरे आहे. परंतु बाकीचे 'ट, ठ, ड, ढ, ण' हे वर्ण प्राचीन इंडो-आर्यनमध्यें मूर्धन्य म्हणूनच होते.[२] 'ळ' मात्र द्राविडीपासूनच येणें संभवनीय आहे हे मी वर्णप्रक्रियेच्या प्रकरणात दाखविले आहे. वैदिक ळँ हीमू ळ 'ड' किंवा 'ढ' ची प्रक्रिया होय, व त्याचा येथे अर्थात् अगदी संबध नाहीं. मराठी 'ळ' द्राविडी व स्कायदियन[४] भाषापासून आलेला दिसतो.

---

१ Dr. Caldwell: Dravidian Grammar, pp. 70–74

२ "The original Aryan sound was a semi-cerebral (if not a pure one), which has in India only varied in two directions, so as to become the true cerebral and the true dental respectively." Hoernle: Grm. Gawdian Langs. pp. 10

३ Max Muller: 'Sanskrit Grammar' No. 4

४ "Cerebral sounds are peculiar to the Tartar or Finnish class of languages. Really, the Dravidian languages are of Tartar origin; or at least, their phonetic and grammatical affinities are Tartar."
——Mr. Norris's paper on 'The Languages of the Scythian tablets of Behistun.'

(३) **शुद्धतालव्य वर्णांपासून भिन्न असलेले 'चे छे जे झे,' हे दंत्यतालव्य** वर्ण मराठीनें द्राविडीपासून घेतले. देशी शब्दात आणि काही विशिष्ट अपवाद सोडून (या अपवादाची चर्चा वर्णप्रक्रियेंत आली आहे) तद्भव शब्दात हे दंत्यतालव्य वर्ण मराठी वापरते. प्रा० दिवेटिया[१] याच्या मतें शुद्धतालव्याचा हा अर्धतालव्य उच्चार मोंगलाच्या संपर्कामुळें आला. परंतु प्राकृतातसुद्धा हा उच्चार होता हे कबूल करून नंतर तो मोगलापासून आला हे म्हणण्यात विसंगति नाही काय? प्राकृतकाली हा दंत्यतालव्य उच्चार होता[२]. वररुचीच्या[३]

" चवर्गस्य स्पष्टता तथोच्चारणः।"

या सूत्रातील 'स्पष्टता' या शब्दातील सूचितार्थाबद्दल वाद असला तरी तत्कालीं 'च' वर्गाचे भिन्नाभिन्न उच्चार महाराष्ट्री प्राकृत व मागधी प्राकृत यात होते हे खरे. तात्पर्य हा उच्चार प्राचीन असून ज्या अर्थी तो प्राकृतकाली अंशमात्राने का होईना पण होता, त्या अर्थी तो यावनी नाही. तेलुगू भाषेत 'इ, ई, ए, ऐ' खेरीज करून सर्व स्वराच्या मागचा 'च' हा 'त्स' सारखा उच्चारला जातो. तुळू बोलीत हाच प्रकार आहे[४]. तेव्हा दन्त्यतालव्य द्राविडीतून प्राकृतद्वारा मराठीत आला हेंच खरे.

यादव-मराठीवर उच्चाराच्या दृष्टीने द्राविडीचे एवढेच परिणाम झालेले दिसतात. द्राविडी भाषाचे वैयाकरण आणखी अनेक बाबी आधुनिक इंडो-आर्यन भाषानी द्राविडीपासून घेतल्या असें प्रतिपादितात. डॉ० काल्डवेलच्या मतें 'क, च, ट, त, प' या कठोर वर्णाच्या जागी 'ग, ज, ड, द, ब' हे मृदु वर्ण येण्याची प्रक्रिया द्राविडीमुळें होय. तामिळीमधील आणि अर्वाचीन इंडो-आर्यनमधील स्वरभक्ति, यांत काही

---

१ Divetia : 'Wilson Philological Lectures' Vol. I pp. 349

२ Dr. Grierson : Prakrit Palatals'- J. R. A. S. (1913) pp. 391

३ प्राकृतप्रकाश : ९–५.

४ Dr. Caldwell : Dravidian Grammar, pp. 25

५ Ibid : pp. 21

तरी संबंध असावा असें मत डॉ० चतर्जी[1] याचें आहे. तामीळमध्ये, 'श्री > तिरु, स्नेह > सिनेगम, मित्र > मित्तिर' अशी प्रक्रिया होते. पण तेवढ्यावरून आर्य भाषानी ही लकब द्राविडीपासून उचलली असे नव्हे. खुद्द ऋग्वेदकालीं विश्लेप होता. तात्पर्य, वरील प्रक्रिया म्हणजे एका भाषेचा दुसरीवर परिणाम नसून ती केवळ साम्ये आहेत. खरी गोष्ट ही, कीं संयुक्त वर्णांचा विश्लेप होणे हा भाषावृद्धीचा एक स्वभावच आहे व त्यानुसार आर्य आणि द्राविडी भाषांतून तो बरोबरीनेच रूढ झाला. जसा आर्य भाषात वैदिक काळी तो दिसतो तसाच प्राचीन द्राविडीमध्येहि तो आहे. उदा०

प्राचीन तामीळ 'द्राविड' > दरामिळ > दआमिळ > दामिळ > तामिळ.

तात्पर्य, विश्लेषासारख्या उच्चारप्रक्रिया यादव-मराठीत परंपरेनें व स्वभावाने आल्या; त्याकरिता द्राविडीच्या संसर्गाची आवश्यकता मुळीच नव्हती.[2]

## § ३ प्रत्ययप्रक्रिया

प्रत्ययप्रक्रियेवर परभाषाचे होणारे परिणाम तपासताना तर अत्यंत दक्षता ठेवली पाहिजे. नामाची आणि क्रियापदाची रूपे म्हणजे भाषेचा प्राण असून ती शतकानुशतके आपले रंगरूप अविकृत राखतात. उच्चारप्रक्रिये-प्रमाणेच या प्रांतातहि बाह्य साम्यावर विसंबता कामा नये. त्याबरोबर, परभाषेचा परिणाम व्याकरणदृष्ट्या होणारच नाही असेहि नव्हे. निकट सहवासामुळे आपला जन्मसिद्ध सांगाडा कायम ठेऊनसुद्धा एक भाषा दुसरींतील काही लकबी उचलूं शकते. आजसुद्धा इंग्रजी वळणाची एक विशिष्ट वाक्यपद्धति मराठीत रूढ झाली आहेच की नाही? विष्णुशास्त्री चिपळोण-करासारखा खास मराठी वळणाचा लेखक देखील ती दृष्टिआड करूं शकत नाही. तरी समतोल बुद्धीने व निरीक्षणानें परभाषेचा व्याकरणावरील परिणाम पाहिला पाहिजे.

---

१ Origin and Development of Bengali–Appendix B.

२ J. Bloch's—'Les consonnes intervocaliques en Tamoul'–translated in Indian Antiquary (1919) pp. 191

**१ नामविभक्तिः—**

( अ ) डॉ० काल्डवेलच्या[१] मतें यादव-मराठींतील 'उ' काराचें प्राबल्य हा द्राविडीच्या संपर्काचा परिणाम होय. कानडींत 'उ' किंवा 'वु' शब्दान्तीं येतो. उदा०

का० केळ–वु ( थोडें )
का० पल–वु ( विपुल )
सं० वाक्–का० वाकु

प्राचीन मराठीत पुल्लीगी नामाच्या एकवचनीं प्रथमेलाच केवळ नव्हे, तर क्वचित् निपाताना, कृदन्ताना व सप्तमीला देखील 'उ' कार लागे. (जसें, पैलु, निरंतरू, मारुनु, पाणियातु, वगैरे) परंतु, ही साधी साम्याभासाची उदाहरणें होत. प्रथमेचें 'उ' कारान्त रूप परपरेनेच सिद्ध होतें. अर्थात्, काल्डवेलचें म्हणणें सर्वथा भ्रात आहे.

( आ ) शब्दयोगी अव्ययानी विभक्तिरूपे साधण्याची यादव-मराठीची पद्धति काल्डवेलच्या[२] मते मूळची द्राविडी होय. प्रा० जागिरदारांच्या[३] मतेंहि मराठींतील सामासिक विभक्तीवर द्राविडीचा व विशेषतः कानडीचा परिणाम झालेला आहे. "सहितें, वाचूनि, पासूनि, वरि, सवे, वीण ही" ज्ञानेश्वरीतील शब्दयोगी अव्ययें त्याच्या मतें जरी संस्कृतोद्भव असली, तरी ती वापरण्याची क्रिया मात्र कानडी आहे. सामासिक विभक्तिरूपाकडे कल असणें हा प्रत्येक भाषेचा स्वभाव आहे, एवढेच नव्हे तर विकासाची एक दिशा आहे. अतएव प्रा० जागिरदाराचे विधान एकागी वाटते. प्राचीन इंडोआर्यनचें प्रत्ययी स्वरूप विस्कळित होत होत वर्तमान देशी भाषात तें सामासिक होणें, म्हणजेच प्रत्ययाच्या ऐवजी शब्दयोगी वापरांत येणें, हें भाषाशास्त्राला धरूनच आहे. हा बदल भाषेच्या हाडामासात खिळलेला,

---

१ Comp. Grammar of Dravidian Languages, pp. 17–18

२ Ibid. pp. 59 ( Introduction )

३ 'Kanerese Influence on old Marathi'
——Annals of B. O. R. I. Vol. XI part 4

अंतस्थ आहे, बाह्यतः होणारा नव्हे. एक बाब मात्र विचारार्ह आहे. अर्वाचीन इंडो-युरोपीयन भाषांनीं शब्दयोगी हीं नामाच्या पूर्वी लावण्याची पद्धति उचलली असतां वर्तमान इंडो-आर्यन भाषा मात्र तीं नामाच्या पुढेंच ठेवितात[1]. उदाहरणार्थः—

"तैं नित्ययाग**सहितें**। सृजिलीं भूतें समस्ते।" ज्ञा० ३।८६

"स्नेहा**लागि** माये। म्हणिपे तें कीरु होये।" ज्ञा० २।४२

"मनोरथा**पासि** निद्रा कीजे।" स्मृति० ३३

इंडो-युरोपीयन भाषांच्या उलट मराठीनें ही 'उत्तरपद' शब्दयोगी-साधित विभक्ति द्राविडीपासूनच घेतली काय? परंतु हाच स्वभाव सर्व अर्वाचीन आर्य भाषांचा असल्यामुळें निश्चित मत देता येत नाही.

( इ ) **'वरि' हें शब्दयोगी** यादव-मराठीत दोन अर्थानी वापरलें जाते–एक नेहमींच्या 'वर' या अर्थी, व दुसरे 'पर्यंत,' 'तोवर,' अशा अर्थी. उदाहरणार्थः—

"नावेकवेऱ्ही" ( = क्षणभर, थोडा वेळपर्यंत ) –उद्ध० १८८

"आगे घेतुसे उफाळा : सिगेवरी" –ऋ० ५१०

"गावोवरि एति" ( = पर्यंत ) –लीळा० ३, पा० ५७

"हा ठावोवेऱ्ही" –ह० ८७

हें 'वरि' कानडी 'वरम' पासून व्युत्पादिता येतें. जसें—

"कावेरियिंदम आ गोदावरि वरम इर्द नाडदाकन्नडदोळ्"

( = गोदावरी पर्यंत ) –नृपतुंग–कविराजमार्ग.

येथील 'वरम'चा अर्थ व उपयोग मराठींतील 'वरि' शी जुळतो.

**२ आख्यातविभक्तिः—**

( अ ) प्राचीन मराठींत जुन्या कर्मणीला विध्यर्थाचा एक वेगळाच अर्थ प्राप्त झालेला दिसतो. उदाहरणार्थः—

"तोंड अबद्ध तरि **वाचिजाये** : पोथी अबद्ध तरि **फाडिजाये**।"

–स्मृ० १७२

---

१ Post-positional as against pre-positional declension.

"तंव तेहीं म्हणितलें-**पइजो** जा।"-लीळा० १-४८
या नव्या विध्यर्थाबरोबर जुना साध्या कर्मणीचा अर्थ अर्थात् कायम आहेच. उदाहरणार्थ:—

"सामथयाची अणी : सेवुनि **वोविजे** मुक्तामणि" -उद्ध० २०

"गोसावी ओळखिती तरि **वोळखिजे**।"-लीळा० ३

म्हणजे, यादव-मराठीत परंपरागत कर्मणि रूपांना एक साधा व दुसरा विध्यर्थाचा असे दोन भिन्न अर्थ आहेत. पैकीं पहिला प्राकृत-अपभ्रंशद्वारा 'इज्ज' या कर्मणि प्रत्ययाची प्रक्रिया होऊन आलेला आहे.[१] प्राकृतात कर्मणीला विध्यर्थाचा अर्थ नव्हता. अपभ्रंश-काली तो द्राविडीच्या संसर्गानें प्राप्त झाला. कारण रूप कर्मणि परतु अर्थ विध्यर्थाचा अशी उदाहरणें अपभ्रंश काव्यातून आढळतात. पहा—

"विरइज्जइ", "पाविज्जइ" ३-२-१४

"णासिज्जइ", "संतोषिज्जइ" ३-३-१०

(णायकुमारचरिउ)

प्रो० जागिरदार[२] यांच्या मतें हा कानडीचा परिणाम होय. हळेकन्नड (प्राचीन कानडी) मध्यें सकर्मक क्रियापद अकर्मक समजून वापरणे हा कर्मणि प्रयोगाचा एक प्रकार आहे.[३] उदा० ओडे (सकर्मक) = मोडणे.

"अवम (तो) अदम (ते) **ओडेवम**"। (मोडतो)

परंतु, "अदम (ते) **ओडेदुड**।" (मोडलें जाते)

"कळिदवर्ग-**अळवुदु** अळ्तोडवरेळवोडम अंतवरिं।"[४]

(= ओरडलें जाते)

येथेंहि 'अळवुदु' हें सकर्मक क्रियापद अकर्मकवत् वापरून कर्मणि साधला आहे. म्हणजे 'डदु' हा एकच प्रत्यय दोही ठिकाणी वापरून प्रथम

---

१ Sir George Grierson: J. R. A. S. (1910) pp. 163

२ Annals of B. O. R. I. Vol XI part 4

३ Dr. Caldwell: Dravidian Grammar, pp. 315

४ 'Adi-puran,' quoted in Kavi-Charite, pp. 30 (Vol. I) (Ed. R. Narsinhacharya, 1908)

आख्यात व विध्यर्थ सिद्ध होतात. साहजिकच दोहोंत घोंटाळा होतो. ‘अळवउदु’ याचा अर्थ ओरडावें हा आहे की ओरडले जातें असा आहे, याचा उलगडा संदर्भाशिवाय होऊं शकत नाही. प्राचीन मराठीनें हीच लकब कानडीपासून उचलली.

(आ) हळेकन्नडमध्ये विध्यर्थ्याचे अकरणरूप मूळ धातूच्या तुमन्ताशी ‘बा’ (येणे) या सहाय-धातूचे अकरणरूप जोडून दाखविलें जाते. जसे,

‘उच्चारिस बारदु’ (= उच्चारूं नये)

(‘उच्चरिस’ हे ‘उच्चरिसु’ याचे तुमन्त)

प्राचीन मराठीत हीच रीति आहे—

“तैसी सद्‌बुद्धि हे थेकुटि : **म्हणों न ये**।” ज्ञा० २–२३८

म्हणजे ‘म्हणो’ हे तुमन्त + ‘न ये’ अशा जोडाने विध्यर्थ्याचे अकरणरूप होतें. ‘येणे’ या धातूचा हा विशिष्ट उपयोग म्हणजे प्रो० जागिरदाराच्या मते कानडीचा परिणाम होय.

याखेरीज कानडीच्या ज्ञानेश्वरकालीन मराठीवर परिणाम म्हणून दोन तीन बाबी तरी प्रो० जागिरदार देतात, व हळेकन्नडच्या आणि यादव-मराठीच्या व्याकरणविशेषाची तुलना करून पहिल्यापासून दुसरे निघाले असें प्रतिपादितात. विशेषतः मराठीतील संयुक्त रीति-वर्तमान किंवा लट्‌चा एक विशिष्ट प्रकार कानडीवरून आला असें प्रो० जागिरदाराचें ठाम मत आहे. वास्तविक तो परंपरागत आहे, शुद्ध आर्य आहे, परभाषेच्या संसर्गानें आलेला नाही, हे मी आख्यातविभक्ति प्रकरणात दाखविलें आहेच. दोन भाषातील साम्य वेगळे व त्याचा एकमेकीवरील परिणाम वेगळा. परंतु ‘साम्या’ लाच ‘परिणाम’ समजल्याने डॉ० काल्डवेल व प्रो० जागिरदार याची विधाने नीट पारखून मगच ग्राह्य वा अग्राह्य ठरवावीत.

## § ४ वाक्यरचा, वाक्प्रचार वगैरे

उच्चार व व्याकरण या बाबींसंबंधीं परभाषासंपर्क विशेष नसला तरी वाक्प्रचारांबाबत मात्र तो विपुल आहे. यादव-मराठीनें कानडीपासून उचललेले वाक्यरचनाविशेष व शब्दसिद्धीचे प्रकार पुढें देतों.

(अ) मराठींत 'म्हणौनि' हें रूपदृष्ट्या वास्तविक अव्ययी भूत कृदन्त आहे, परंतु यादवकालीं आणि आतांहि त्याचा उपयोग एक उभयान्वयी निपात असा होतो. असाच उपयोग कानडींत व तामीळमध्यें 'एंदु' व 'एन्रू' या कृदन्तांचा आहे. मराठींत कृदन्तांखेरीज वर सांगितलेला निपातार्थ पहा—

"हाटुवेळु नव्हे **भणौनि** वृक्षा एका तळीं नीजे।" द० ११

"**म्हणौनि** कुळें जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण।"

ज्ञा० ९-४५२

'भण्' धातूत्पन्न कृदन्ताचा हा विशिष्ट उपयोग संस्कृतास वा प्राकृतास ठाऊक नाहीं. मात्र, कानडींत 'एन्नु' (= बोलणें) धातूचें 'एंदु' हें भूतकृदन्त असून त्याचा उभयान्वयी निपाताप्रमाणें वापर होतो. उदा०

"सरित्तटवनलतागृहदोळ् सीते वळ्दळ् **एंदु**

विश्रमिसि सुखं ईर्पुदु।"—पंपरामायण, २२२

(= सीता दमली होती आणि म्हणून...विश्राति घेत होती)

यादव-मराठींत याच कृदन्ताला 'असें' किंवा 'इति' असा दुसरा अर्थ आहे. उदा०

"पुरुषु आपुलें करणीयें **म्हणौनि** प्रवर्ते" (= इति) लीळा० १-२९

कानडींतील एतदर्थी प्रयोग पहा—

"पाताळलंके **एंब** पुरम्।"—पंपरामायण २२३

येथें 'एंब' हें भूत कृदन्त नसून वर्तमान कृदन्त आहे. 'म्हण' धातूच्या वर्तमान कृदन्ताचा असाच प्रयोग अद्यापिहि कर्नाटकस्थ मराठीयाच्या बोलण्यांत येतो. पहा—

"रामा म्हणणारा मुलगा आला होता" (रामा नांवाचा). असा प्रयोग महाराष्ट्रीय कन्नडिग करतांना ऐकूं येतात. तात्पर्य, 'म्हण' धातूचीं वर्तमान व भूत कृदन्तांची रूपें भिन्नार्थी वापरण्याची लकब यादव-मराठीनें कानडींतून घेतली.

(आ) कांहींच्या[1] मतें **ध्वन्यनुकारी शब्द** वापरण्याची प्रथा मराठीनें द्राविडी व कोळ भाषापासून उचलली. हे विधान असत्य आहे. कारण संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश या तिहीत ध्वन्यनुकारी शब्दयोजना आहे. 'णायकुमारचरिउ' या अपभ्रंश काव्यातील

"जिगिजिगिजिगंत, ललललंति, धगधगंति"

हे शब्द पहावेत. नादानुकारी शब्द बनविणें हा प्रत्येक भाषेचा धर्म आहे. प्रो॰ मॅक्स म्युल्लरची 'डिंग-डॉग' उपपत्ति प्रसिद्धच आहे. यादव-मराठीनें नादानुकारित्व द्राविडीपासून घेण्याचें यत्किंचित् कारण नाही.

(इ) यादव-मराठीतील पुढील वाक्प्रचार पहा—

"कवाड दाटुनि **घातलें**।" लीळा॰ १-६६

"चौकीचें कवाड **घातलें**।" स्मृ॰ २१६

"कवाड घालणे" (= कवाड लावणें) हा वाक्प्रचार म्हणजे कानडीचें शुद्ध भाषांतर होय. कानडीत,

"बागला **हाकु**" (= घालणें = लावणें)

"बागला **तगि**" (= काढणें = उघडणें)

अशी लकब आहे. अद्यापिहि, कर्नाटकस्थ मराठीयाच्या तोंडीं 'दार घाल, दार काढ' असा प्रयोग ऐकूं येतो. हें ऋण थेट यादव-कालापासून चालत आलें आहे.

(ई) **साद-शब्द**: —वर्तमान भारतीय आर्य भाषांत साद-शब्द[2] साधण्याची रीत द्राविडीपासून आली आहे. साद-शब्द म्हणजे मूळ शब्दाची किंचित् द्विरुक्ति असून, नवीन बनलेल्या शब्दाचा नाद व अर्थ मूळासारखाच असतो. साद शब्दांतील किंचित् द्विरुक्तीचा सादवर्ण प्रत्येक

---

१ B. C. Muzumdar : 'Study of some Onomatopoeic Desi words'—J. R. A. S. 1905, pp. 555

P. O. Bodding : 'Materials for a Santali Grammar' Vol. I pp. 31

२ Dr. S. K. Chatterji : 'Echo-words'—Origin and Development of Bengali, Appdx. B

भाषेपुरता स्वतंत्र ठरलेला असतो, व त्याचा उपयोग 'वगैरे बगैरे' चा अर्थ ध्वनित करण्याकडे होतो. वर्तमान भाषांतील कांहीं साद-वर्ण पहा—

| | | | |
|---|---|---|---|
| मराठी ... | बि | : | माणसंबिणसं, आंबेबिंबे, साबूबिबू. |
| बंगाली ... | ट | : | घोराटोरा |
| हिंदी ... | उ | : | घोडाउडा |
| गुजराती ... | बो | : | घोडोबोडो |
| तामीळ ... | कि | : | नीरुकीरु |
| कानडी ... | गि | : | कुडिरे गिडिरे, नीरुगिरु |

सादशब्द बनविण्याची ही लकब संस्कृत, प्राकृतांत नाहीं. मराठीत ती द्राविडीपासून आली. यादव-मराठीत तर कानडीचा 'गि' हा सादवर्ण वापरून साधलेले दोन सादशब्द मी टिपले आहेत.[1] ते असे—

" यऱ्हविं थडिये पडता : तरि **हाडगुड** नुरतें : मरता।"

लीळा० १-४७

" सभेकडे पाहे तो पडे : तयाचें **हाडगुड** नुरे।" दृ० ९२

" **गीतमातुचां** ठाइं।" स्मृ० ८९

(का० 'मातु'-का० सादशब्द 'मातगीत'-म० गीतमातु) येथें मूळशब्द आणि सादशब्द दोहीं कानडी आहेत. फक्त मराठीनें त्याची उलटापालट केली आहे. आतां, द्राविडी धर्तीवर बनविलेले इतर शब्द पहा—

" आमतें गोसावी **लाळले ताळले**"–स्मृ० १७५

" **हळवैली पळवैली**"—लीळा० ३, पा० ३८

" **पाटेफुटे**"—उद्ध० १२२

" **झींगिमिंगि**" – उद्ध० ३४०, ६४४

"सेवटीं नैंति भणौनि आपैसी : **गजबजीनिली**।" –शि० ८६

वरील सादशब्दात सादशब्द साधण्याचें साधन, म्हणजे सादवर्ण, वर्तमान मराठीप्रमाणें एकच नाहीं, तर ते 'त, प, ब, फ, म,' असे विविध आहेत.

---

१ अद्यापिहि कर्नाटकांतील महाराष्ट्रीयांत "खुर्ची-गिर्ची, मराठी-गिराठी, मास्तर-गिस्तर" असे प्रयोग ऐकू येतात.

वर्तमान मराठींत 'ञि' वापरण्याची एकविधता आहे तर यादव-मराठींत विविधता आहे. तात्पर्य, कानडीपासून मराठीनें तत्कालीं ही साद-शब्द-सिद्धि नुकतीच घेतली होती, व अनेक वर्णांचे प्रकार यादव-मराठी करून पहात होती. पुढें यांतील 'ञि' निश्चित होऊन इतर वर्ण गळले.

## § ५ नंदभाषेंतील शब्द

येथवर द्राविडी भाषांचा परिणाम पाहिला. नंद भाषेतील कांहीं शब्द तत्कालीन मराठीत उतरले होते. नंदभाषा ही व्यापारी लोकांची एक सांकेतिक भाषा समजली जाते. विसोबा खेचराच्या पुढील अभंगांत नंदभाषेंतील काही शब्दात्मक संकेत उतरले आहेत.[1] वास्तविक हा परभाषेचा परिणाम नव्हे. परंतु विषयपूर्तीकरिता हा अभंग देतों.

" **मुळ** ( ५ ) वदनाचा **उद्रानु** ( ३ ) नेत्राचा
**अंगुळ** ( १० ) हस्ताचा स्वामी माझा ।
मुगुट जयाचा **केवळया** ( १ ) आगळी काठी
पवित्र तळवटी चरण ज्याचे ।
**सेलीते** ( ६ ) भागली **पोकु** ( ४ ) वेडावले
**अंगुळ** ( १० ) मागी झाली थकित तथा ।
**ढकारा** ( १००० ) वदनाचा आला वर्णावया
जिव्हा चिरलिया न कळे त्यासी ।
सद्भावें शरण **अवारु** ( २ ) जोडोनि
खेचर विसा चरणीं विनटला ॥ "

## § ६ फारसी शब्द

ज्ञानेश्वराच्या आणि तत्समकालीन लेखकाच्या मराठी भाषेंत फारसी शब्द नाहींत असा सर्वत्र समज आहे, व राजवाडे[2] तर तशी ग्वाही देतात. परंतु यादव-मराठीला फारसीचा संपर्कहि नव्हता हे म्हणणें

---

१ कृ० पां० कुलकर्णी : विविधज्ञानविस्तार ( १९२५ ), अं० १२

२ ज्ञानेश्वरी–प्रस्तावना, पान १०३

अवास्तव आहे. इतिहास आणि यादव-कालीन मराठी भाषा हीं त्याच्याविरुद्ध जातात. उत्तर कोंकणच्या किनाऱ्याशीं अरबांचा व्यापार ७ व्या शतकापासून सुरू होता, आणि साहजिक तत्कालीन कोंकणी प्रांतिक बोलींत कांहीं अरबी शब्द शिरले असले पाहिजेत. या दृष्टीनें इ० स० १३६७ च्या नागांव शिलालेखांतील 'हिजरत, भाई, दार्यु, म्सदे' वगैरे फारसी शब्द विचारणीय आहेत. 'महिकावतीच्या बखरी'त[1] यादवाचा वंशवृक्ष आला आहे. त्यांत

"१७ रामराजा तुर्काण जालें।"

असें वाक्य येतें. मोंगलांच्या देवगिरीवरील स्वारीचे असेच उल्लेख तत्कालीन महानुभावीय गद्यग्रंथातून येतात. हा ऐतिहासिक पुरावा झाला. आता शाब्दिक देतों. यादव-मराठींत खालील फारसी शब्द आढळतातः—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पोतडी | (ज्ञा० १४–१७) | फा० पोतेह् |
| २ | निसाण[2] | (ज्ञा० ९–२१६, उद्ध० ४४) | फा० निशान |
| ३ | मालकै | (शि० ७२६) | फा० मालिख् |
| ४ | पेरोज | (धवळे उत्त० ५) | फा० पेरोज् (मोती) |
| ५ | तेजी[3] | (शि० ९३७) | फा० ताझी |
| ६ | रुका | (स्मृ० ११०) | अर० रुक्आ |
| ७ | रुखवत | (ध० पू०) | फा० रुषवत् (=देणगी) |
| ८ | सुलतान | (स्मृ० ८३) | फा० सुलतान् |
| ९ | तुरुक | (स्मृ० ८५) | फा० तुरुख् |

वरील फारसी शब्दच मात्र यादव-मराठींत आले. वर्णांच्या उच्चारांवर व भाषेच्या सांगाड्यावर फारसीचा परिणाम अगदी नाहीं.

## § ७ ग्रीक शब्द

ग्रीकचा भारतीय आर्य भाषांशीं संबंध संस्कृतापासूनच आला.

---

१ "बिंबाख्यान किंवा माहिकावतीची बखर"

२ राजवाडे हा शब्द सं० निःसाण (?) पासून व्युत्पादितात.

३ हा शब्द 'अभिलषितार्थचिंतामणी' (इ० स० ११२९) मध्यें येतो.

अलेक्झांडरच्या स्वारीपूर्वी, ( म्हणजे ख्रिस्त शकापूर्वी ३३७ वर्षें ) ग्रीसचें हिंदुस्थानशीं दळणवळण होतें व तें थेट ३ ऱ्या शतकापर्यंत चाललें. साहजिकच संस्कृत, प्राकृत, अपभ्रंशद्वारा कांही ग्रीक शब्द यादव-मराठींत शिरलेले दिसतात. ते असे—

१ **सेवैयां—सरवलैया** ( स्मृ० ४१ )

ग्री० सेमिडालिस > सं० समिता–दा

> प्रा० सिमिद > म० सेवैया

हा शब्द बंगालीत ' सेवो ' आणि हिंदींत ' सिवइ ' या रूपांत आहे.

२ **दाम**— ' म्हातारदाम ' ( = पेन्शन ) स्मृ० १०७

'**दाम**नियाचे **दाम** करा'–लीळा० १-५८. '**दाम** च्यारि' द० ४०

ग्री० ड्राक्मे > सं० द्रम्य > प्रा० दम्म > म० दाम-दमडी

३ **यवन**—ग्री० आयोनिअन > सं० यवन

> प्रा० योन[२]

> म० यवन

वरील शब्द यादव-मराठींत परंपरेने आले, साक्षात् आले नाहींत.

---

१ Indian Vermicelli ( Grk. " Semidalis " )

२ अशोकाचा शिलालेख

# वर्णप्रक्रियेची शब्दसूचि

**टीपः—**१ वर्णप्रक्रियेच्या भागांत यादव-मराठींतील जे विशेष शब्द उदाहरणांदाखल वापरले, त्यांची सूचि पुढें देत आहें. तींत वर्तमान मराठीहून ज्यांचें स्वरूप भिन्न आहे असे केवळ यादवकालीन शब्दच बव्हंशी येतील. तत्कालीन, परंतु आजसुद्धा नित्य वापरांत असलेले शब्द अर्थात् या सूचीत नाहींत.

२ उदाहरणांकरिता सर्व महानुभावीय ग्रंथ व नमुन्यादाखल म्हणून ज्ञानेश्वरीचा समग्र नववा अध्याय याची सूचि पुढे आहे. ज्ञानेश्वरीच्या इतर अध्यायांतीलहि शब्द आहेत, परंतु नवव्यांतील विशेषत्वाने आहेत. जेथें अध्यायाचा आकडा नाही तेथें ९ वा अध्याय समजावा.

३ सूचीतील संक्षेपचिन्हे अशीं :—

उ = उद्धवगीता; ऋ = ऋद्धिपूर–वर्णन; स्मृ = स्मृतिस्थळ; दृ = दृष्टांतपाठ; ली = लीळाचरित्र; शि = शिशुपालवध; व = वच्छहरण; धपू = धवळे पूर्वार्ध; धउ = धवळे उत्तरार्ध; मास्व = मातृकी रुक्मिणी-स्वयवर; चो = चौभा उषाहरण; ज्ञा = ज्ञानेश्वरी; शिला = शिलालेख; ता = ताम्रपट.

४ शब्दसंदर्भ एक किंवा दोन प्रत्येकी दिले आहेत. ही तौलनिक व सर्वसंग्राहक सूचि करण्याचा उद्देश नाही. केवळ वर्णप्रक्रियेच्या प्रकरणाला आधार व संदर्भ म्हणूनच ती आहे.

### अ

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अखळ (र) | – शि ६७९ | | अढाळ | – | शि ७२६ |
| अचवटें | – स्मृ ५३ | | अतिशो | – | ज्ञा ९।६९ |
| अठवरां | – शि ७२० | | अतीत | – | स्मृ ६९ |
| अडकणिया | – शि ५९१ | | अंतुरें | – | धउ ४८ |

